श्री·

# आर्यासंग्रह.

सर्वसंग्रह मासिकपुस्तकांतील

भाग १ ला.

हें पुस्तक

रावजी श्रीधर गोंधळेकर

याणीं

विद्वान् मंडळीच्या साह्यानें तयार करून

आपल्या जगद्धितेच्छु छापखान्यांत छा० प्र० केलें.

ता० २८ फेब्रुआरी.

१८८२

आवृत्ति १ ली.

पुणें पेठ शनवार मेहुणपुरा.

# प्रस्तावना.

ह्या पुस्तकांत भक्ति ज्ञान आणि वैराग्य यांस अनुलक्षून अनेक कवींच्या आर्या संस्कृत व दुर्बोध असल्यामुळें त्या सामान्य विद्वानांसही समजण्यास कठिण याजकरितां विद्यार्थ्यांस व ह्या विषय पाहणारे इतरांसही अडचण पडूं नये ह्मणून विद्वान् शास्त्रीमंडळीकडून यांचें मराठी भाषांतर करून कोणते पदाचा कोणता अर्थ हें स्पष्ट समजण्या करितां आर्येवर अन्वयाचे अंक घालून त्याच क्रमानें खालीं मराठींत अर्थ लिहिला आहे. ह्या पुस्तकांतील द्रौपदी वस्त्रहरणाच्या आर्या मात्र प्राकृत असल्यामुळें त्यांचें भाषांतर न करितां दुर्बोध ठिकाणीं टिपा घातल्या आहेत.

ह्या पुस्तकाचा विद्यार्थी विद्वान् व समंजस लोक यांस चांगला उपयोग आहे याजकरितां यांचा सर्व लोक संग्रह करितील अशी आशा आहे. संग्रह करणारास सुगम व्हावें ह्मणून याची किंमत १८५ व टपाल खर्च ८२ ठेविली आहे.

तारीख २८ माहे फेब्रुआरी
सन १८८२ इसवी.

रावजी श्रीधर गोंधळेकर.



# अनुक्रमणिका.

श्री

# आर्यासंग्रह.

## मुद्गलाचार्यकृत आर्या.

### प्रारंभः

त्वयि विमुखे मखमुख्ये सख्येनान्यस्य कस्य जीवामि ॥ जीवामि तु भवदर्पितवसनाशनमात्रजीवनाः सर्वे ॥१॥

अर्थ.- हे रामचंद्रा तूं सर्वांतर्यामी ईश्वर असल्यामुळें सकल यज्ञांत पूज्यत्व व कर्मफलदातृत्व यानीं मुख्य आहेस असें असून मी श्रवणादि नवविध भक्तीनें तुझें आराधन केलें नाहीं यास्तव तूं मजविषयीं कृपादृष्टीनें अनुकूल जर नसशील तर मी अशा तुज देवाधिदेवास त्यजून कोणत्याही अन्यदेवतेच्या अनुकूलतेनें जीवन पावणार नाहीं तर केवल तुझ्याच सख्यानें मी स्वकीय प्राण धारण करीत आहें. असा मीच एक तुमच्या योगानें जीवन पावतों असें नाहीं तर आपण अर्पण केलेल्या वस्त्र भोजन मात्रें करूनच जीवन धारण करणारे सर्व प्राणी आहेत. असा तूंच सर्व प्राण्यांचा योगक्षेम निर्वाह कर्ता आहेस तस्मात् आह्मां भक्तांचाही योगक्षेम निर्वाह करणारा तूंच आहेस हें काय सांगावें.

परितः पश्यसि परितः शृणोषि परितो जगत् विजानासि ॥ मां राम किं न दृष्टं न शृणोषि न वीक्षसे न वा वेत्सि ॥२॥

अर्थ.- परंतु हें मूग तुला मी पहात नाहीं तुझें भाषण मी ऐकत नाहीं व मी तुला जाणत ही नाहीं असें असून माझ्याच अनुकूलते विषयीं तूं किमर्थ प्रार्थितोस असें आपण कदाचित् ह्मणाल तर त्या विषयीं मी विनंती करितों कीं, हे रामा, तूं सर्व जगास अवलोकन करितोस, सर्वत्र श्रवण करितोस व आसमंतात् सकल विश्वास तूं जाणीत आहेस. त्या विश्वांतच मी आहें आणि हे रामा तूं सर्वज्ञ असून मला कसें जाणीत नाहींस, मला कसें-

अवलोकन करीत नाहींस व करुणा रस युक्त माझी प्रार्थना रूप वाणी कसा श्रवण करीत नाहींस तर आपण सर्वज्ञ असल्यामुळें मला पहातां, माझें प्रार्थना वचन ऐकतां व मला जाणतां अतएव मी तुह्मासच विज्ञापना करितों.

**जानाति भूप मर्त्यो नो त्वं जानासि भूप इत्येतत्॥ उचितं संकल मैविज्ञ सर्वज्ञे त्वयि यतेः कथं श्लाघ्यं ॥ ३॥**

**अर्थ-** परंतु लोकांत अशी स्थिति आहे कीं, सर्व साधारण जन थोरांस जाणतात आणि मोठे लोक सामान्य जनांस जाणत नाहींत याशीतीप्रमाणें तूं जरी मला जाणतोस तथापि मी तुला जाणीत नाहीं असें कदाचित् आपण ह्मणाल तर त्या विषयीं विनंती करितों कीं, जो दरिद्री असतो तो सार्वभौम राजास जाणतो परंतु तो राजा त्या दरिद्री जनास जाणत नाहीं हा सर्व प्रकार अज्ञ राजाच्या ठिकाणीं उचितच आहे कारण तो सर्वज्ञ नाहीं आणि आपण सर्वज्ञ आहां यास्तव सर्वांस न जाणणें हें आपणा विषयीं कसें योग्य होईल. तस्मात् सर्वांचें अनुसंधान राखणें हेंच तुह्मांस योग्य आहे.

**अर्थिनि विलसति लिप्सा दातरि दित्सा तु दूरतो पास्ता ॥ आस्तां कृपणकथेयं रमापते राम नो चिंता भवति ॥ ४॥**

**अर्थ-** पुनरपि आचार्य, लोकदृष्टांता वरूनच शंकाकरून विज्ञप्ति करतात कीं, याचकाच्या अंतःकरणांत आपणास बहुत द्रव्य प्राप्त व्हावें अशी इच्छा उत्पन्न होते परंतु दात्याच्या मनांत तर दान करण्याची इच्छा मुळींच नसते असे लौकिक दृष्टांतांतील दाते कृपण असल्यामुळें त्यां विषयींची कृपण कथा असो तथापि ही कृपण कथा तुजविषयीं संभवत नाहीं, कारण हे रामा तूं लक्ष्मी पति असल्या मुळें औदार्य शक्तीनें पूर्ण आहेस यास्तव ही कृपण कथा तुजला योग्य नाहीं.

**अपि रंके संकुचितः प्रार्थयमानो भैको लभेते ष्टं॥ कष्टं बत जगदुद्भव भवंदकगतो लभे न तत् भ-**

वत: ॥५॥

**अर्थ-** आतां पुनः लौकिक दृष्टांतानें संभव दर्शवून प्रार्थना करितो कीं, कोणी बालक आपल्या दरिद्री पित्याच्या अंका ( मांडी ) वर बसला असून तो आपल्या दरिद्री पित्यास कांहीं इष्ट प्राप्ती विषयीं जी प्रार्थना करतो ती प्रिय वस्तु त्यास त्या दरिद्री पित्या पासून ही प्राप्त होते हें तरीं क्लेशकारक आहे. आणि हे रामा, तूं सकल जगाच्या उत्पत्तीला कारण भूत असल्यामुळें जगाचा पिता आहेस व मी तुझ्या अंकावर असून ही मला तुझ्या प्राप्तीचें इष्ट तुज पासून प्राप्त होत नाहीं हे तर महत्कष्टच आहे.

आशापाशनिबद्धं कारागारे कलेवरे निहितं ॥
यदि मोचयसि न मां त्वं कुरु नहि स्वात्मनेव मे
वृत्तिं ॥ ६॥

**अर्थ-** आतां स्वामि सेवक भावानें प्रार्थना करतात कीं, जसें लोकांत जो महान् अपराधी असतो त्यास बद्ध करून कारा गृहांत टाकतात महत् कारागार ( बंदिशाळा ) सदृश या अति दुःख कारक शरीरांत मी आशा रूप पाशानेंच अत्यंत बद्ध होऊन पडलों आहें तस्मात् हे रामा, अशा या कुत्सित कलेवर रूप कारागृहांतून मला तूं जर मुक्त करणार नाहींस तर तूंच स्वतः माझ्या जीवनाचा उपाय कर. यांतील तात्पर्य असें आहे कीं, तुझ्या भजनाच्या अनुसंधानानेंच माझ्या जीवनाचें सार्थक ज्या रीतीनें होईल तसें तूंच संपादन कर. ६

अनुचित मिदं मेवा दौ श्रीमद्द्वारि स्थितो प्यहं
दीनः ॥ व्यर्थयति कथं नहि त्वां मम वृत्ति स्त्वद-
नु मानवाधीना ॥७॥

**अर्थ-** आचार्य पुनरपि प्रार्थना करतात ती अशीकीं, हे रामा, आपण सर्व संपत्तीनीं परिपूर्ण भगवान् असून आपल्या सन्निधानीं मी सेवकत्वें करून सर्वदा स्थित असून ही माझे मनोरथ पूर्ण न झाल्यामुळें मी अत्यंत दीनत्वानें राहिलों हें आरंभींच तुह्मास अनुचितच आहे. त्याचप्रमाणें हे रामा, मी तुझा सेवक असून ही तुझ्या ईश्वर रूपाहून हीन जे मानव त्यांच्या आधीन माझें जें जीवन आहे तें तुमच्या चित्तास व्यथा क-

सें उत्पन्न करीत नाहीं तस्मात् तूं माझ्या जीवनाची चिंता करीत नाहींस हें तु-
जला सर्वथा अनुचितच आहे हा यांतील भाव आहे.

**त्रिभुवनपालनदीक्षित रक्षणशक्तिस्तथा पूर्ण-
ता पीयं ॥ सामान्यमिव विशेषं किं मां परित्यज्य सर्वतः स्फुरति ॥८॥**

**अर्थ-** आतां भगवानाचें सामर्थ्य कथन करून आपल्या प्रार्थनेचा संभ-
व दर्शवितात कीं, हे श्रीरामा, तूं त्रिभुवनाच्या पालना विषयीं दीक्षित अ-
सून तुझी जी पालन कर्तृत्व शक्ति ती नाश रहित पूर्ण असल्या मुळें हे प्रभो,
तूं सकल जगत्पालना विषयीं समर्थ आहेस व तुझी शक्तिही परिपूर्ण आहे
असें असून जसा लोकांत सामान्य शास्त्रादिकांचा त्याग करून विशेष शा-
स्त्रादिकांचा अंगीकार करतात तद्वतच मज सामान्याचा त्याग करून विशे-
षभूत सर्वजगाच्या रक्षणा विषयीं तुझी शक्ति स्फुरण पावत आहे हें काय?
आतां यांतील सामान्य विशेष भावाचें एक उदाहरण देतों तें असें कीं, (न
हिंस्यात् सर्वभूतानि) ह्मणजे सर्वभूतांची हिंसा करूं नये असा या वाक्या-
चा अर्थ आहे तेव्हां हें सामान्य वाक्य आहे आणि (अग्नीषोमीयं पशुमा-
लभेत) ह्मणजे अग्नि व सोम यांच्या उद्देशानें पशूचें हनन करावें हा याचा-
अर्थ आहे यावरून हें विशेष वाक्य आहे यास्तव या पुढील विशेष वाक्या
नें मागील सामान्य वाक्याचा बाध होतो तेणें करून असें झालें कीं, प्राणिमा
त्रांची हिंसा करूं नये असें प्राप्त झालें होतें त्याचा बाध विशेष वाक्यानें हो-
ऊन त्यांतील कांहीं एक यज्ञार्थ पशूंची हिंसा करावी हें जसें सिद्ध झालें तद्वत्.

**यदि पुनरपराधानां कोटिभिरंतर्विषाद मा-
यासि ॥ पत्तोडिता पिं बाले रुष्यति किं मितीह मानुषी जननी ॥९॥**

**अर्थ-** परंतु तूं केवल अपराधांचा राशिरूप आहेस यास्तव मी तुझी उपे-
क्षा करतों असें कदाचित् आपण ह्मणाल तर त्या कारणानें ही माझी उपेक्षा
करणें आपणास उचित नाहीं अशा आशयानें आचार्य भाषण करतात कीं,
हे रामा, यद्यपि माझ्या अपराधांच्या समुदायानीं तूं अंतःकरणांत क्रोध आ-
णशील तर हें तुजला योग्य नाहीं; कारण तूं परम दयालू आहेस. आणि हे-

रामा लोकांतही असें दृष्ट आहे कीं, बालकानीं आपल्या जननीला पायानीं ताडन केलें तरीं ती त्याजवर रुष्ट होत्ये काय ? नाहीं तर ती मानुषी असून ही बहुशः संतोष पावून अत्यंत कृपेनें त्या बालकास स्तनपानादि करित्येच आणि तूं तर देव आहेस यास्तव माझी उपेक्षा करणें हें तुला युक्त नाहीं हा यांतील भाव आहे. ९

अयि वद राघव नथ्यं कोपो यं केन मदपराधेन॥ शपथस्ते दाशरथे दशरथपदयो र्यदन्यथा ब्रूषे॥ १०॥

अर्थ- आतां आचार्य आपल्या ठिकाणीं अपराधित्व स्वीकारून माझा अपराध कोणता आहे तो मला स्पष्ट सांग अशा अभिप्रायानें रामास प्रश्न करतात कीं, हे राघवा, तुला हा निर्दयत्व कारक कोप माझ्या कोणत्या अपराधानें प्राप्त झाला तो अपराध मला तथ्यत्वें करून सांग. आतां माझा अपराध सांगण्या विषयीं जर तूं सत्यभाषण न करशील तर हे दाशरथे (दशरथनंदना), तुला दशरथाच्या चरणाची शपथ आहे यास्तव तुला कांहीं एक अपराध नाहीं असें ही तूं अन्यथाभाषण करूं नयेस हा यांतील भाव आहे. परंतु कौसल्यादिक माता व वसिष्ठादिक गुरु यांस सोडून दशरथाच्या पायांचीच शपथ मला घालतोस याचें कारण काय असें कदाचित् तूं म्हणशील तर तूं राज्याभिषेक प्रसंगीं कौसल्यादिक माता व वसिष्ठादिगुरु यांची आज्ञा नमानितां दशरथाचीच आज्ञा अति आदरानें अंगीकारून राज्यादिवैभवाचा त्याग करून वनवासाप्रत गेलास तेणें करून पुत्रधर्म पूर्ण दर्शविलास तस्मात दशरथाची शपथ घातली असतां तूं अनृत भाषण करणार नाहींस या अभिप्रायानें हीच शपथ घातली हा यांतील भाव आहे. आणि लोकांत ही पुत्रास पित्याची शपथ देतात हें प्रसिद्ध आहे. १०

मामिह कृपण मनाथं क्लेशै र्व्याप्तं रमेश निःशेषैः॥ लोलद्भुजपदमस्तक मवलोक्य कथं स्थितो सि तूष्णीं त्वं॥ ११॥

अर्थ- आतां आपणच मर्याचे आत्या न दयालू आहां यास्तव माझे क्लेश अवलोकन करून मजवर दया अवश्य करावी अशा आशयानें रामास आचार्य प्रार्थना करतात कीं, हे रमापते श्रीरामा, या संसारांत मी दरिद्री असू-

न मला तुह्यांवांचून अन्य स्वामीही नाहीं आणि मी नर अविद्यादि समग्र क्लेशानीं व्याप्त असून नम्र झालेले हस्त, चरण व मस्तक इत्यादि अष्टांगां सहित नमस्कार करीत आहें अशी माझी अवस्था अवलोकन करून ही तुह्मी उगाच कसे राहिलां तस्मात् अहो दयानिधे तुह्मांला हें योग्य नाहीं.

करुणाकर इत्याद्या नं रंथे, रूपयाति बिरुदमाला नें ।। शरणागत मतिरूपणं किं मा मुपेक्षसे रघूत्तंस ।। १२ ।।

अर्थ- परंतु माझ्या स्वरूपीं दयालुत्व आहे असें तूं कशावरून जाणलें स अशी आचार्य स्वतः शंका करून प्रार्थना करतात कीं, अहो रामा, करुणाकर दीनदयाकर इत्यादिक पुराण प्रसिद्ध ज्या तुमच्या बिरुद माला-ह्मणजे अनेक ब्रीदांचे समुदाय आहेत ते अति भारभूत असल्यामुळें रथानें वहाण्या विषयीं अशक्य आहेत यास्तव हे रघुकुल भूषणा मी तुमच्या स्वरूपाच्या ज्ञाना विषयीं सर्वथा अभिज्ञ नसल्या मुळें केवल दीन भावानें शरण आलों असून तुह्मीं माझी उपेक्षा कां करितां. १२

कुरु राघव करुणां मयि दीने त्वां शरण मापन्ने ।। शरणागतवत्सल इति विष्टपगीतं जहीहि वो बिरुदं ।। १३ ।।

अर्थ- आणि तुमचे करुणादिक गुण बहुत असून ते श्रुति स्मृति पुराणांत गायन केलेले आहेत. यास्तव आपण मजवर दया अवश्य करावी अशा अभिप्रायानें प्रार्थना करतात कीं, अहो राघवा, तुह्मीं असे करुणादि गुणांचे सागर स्वरूप आहां आणि मी दीन असून तुह्मांला शरण आलों आहें यास्तव मजवर करुणा करा. आणि मज शरणागतावर दया न कराल तर देवानीं गायन केलेलें शरणागत वत्सल हें तुह्मीं आपलें बिरुद (ब्रीद) सोडून द्या.

सेवा मपेक्ष्य दाता नहि दाता किंतु वेतनादाता ।। सेवाहीने दीने पल्वल इवे धीहि जीवनं घनवत् ।। १४

अर्थ- आतां सेवा केल्या वांचून मीं कोणास ही किमपि देत नाहीं असें जर कदाचित् आपण ह्मणाल तर त्याविषयीं विज्ञापना करितों कीं, सेवा

करून घेऊन जो देतो त्यास लोकांत दाता असें ह्मणत नाहींत तर जशी ज्याची सेवा (चाकरी) होईल तदनुसार मासिकादि रीतीनें तो वेतन (धनादिक) दाता असें त्यास ह्मणतात. तर दातृत्व कशास ह्मणावें अशीशंका आली असतां सांगतात कीं, जो सेवा रहित अनाथास देतो तोच दाता समजावा. याविषयीं दृष्टांत असाकीं, बुद्धि पूर्वक न खाणलेलें असून उदक रहित अशा अल्प सरोवरांत मेघ जसा जीवनाची (उदकाची) वृष्टी करतो तद्वत् अहो रामा, आपण ही माझ्या सेवेची अपेक्षा नधरितां मजवर कृपादृष्टी करावी हा यांतील भाव आहे.

सेवकवंशोभवत्वा दपेक्षसे चे न्मया कृतां सेवां॥
अलसं सेवकंसुत मेंपि राघव परिपालयंति पृथ्वीशाः ॥१५॥

**अर्थ-** परंतु तुझ्या पूर्वजानीं सेवा करूनच मजपासून किंचित् फल संपादन केलें यास्तव मी तुझ्याही सेवेची अपेक्षा करतों असें कदाचित् ह्मणालतर त्या विषयीं विज्ञापना करतों कीं, अहो रघुनाथा तुमच्या सेवकांच्या वंशांत मी उत्पन्न झालों ह्मणून आपण मजकडून कर्तव्य सेवेची अपेक्षा करीत असलांतर हें तुह्मांस योग्य नाहीं; कारण पृथ्वीपति मोठमोठे राजे ही आपल्या सेवकाचा पुत्र आलस्य युक्त असल्यामुळें आपली सेवा करण्या विषयीं अयोग्य असला तरीत्याचें परिपालन करतात. आणि अहो राघवा, तुह्मीतर त्रिभुवनाधीश आहां यास्तव आपण माझें सेवे वांचून ही अवश्य संरक्षण करावेंच हें यांतील तात्पर्य आहे.

नहि निजजाठरवन्हे र्जय्राय मत्पूर्वजार्जितो सि त्वं॥ किं त्वज्ञालससंतति संतर्त पीडापरंपराशांत्यै ॥१६॥

**अर्थ-** अहो रामचंद्रा, माझ्या पूर्वजानीं केवल आपल्या उदर पोषणार्थच तुमची आराधना केली असें नाहीं तर त्यानीं स्वकीय संततीच्या रक्षणार्थ ही तुमची सेवा केली अशा अभिप्रायानें प्रार्थना करतात कीं, माझ्या पितृपिता महा दिकानीं आपल्या जठराग्नीला अन्न पानादिकानीं केवल तृप्त करण्या साठींच अहो रामचंद्रा तुमची उपासना केली असा अर्थ नाहीं तर-

त्यानीं ज्ञानरहित असून आलस्य युक्त अशा आपल्या संततीला सतत होणारी जी अन्न वस्त्रादि निमित्त मनःपीडेची परंपरा तिच्या शांत्यर्थ तुमची आराधना केली आहे. १६

चित्तचमत्कृतिकारण मिदं मिह नाथ द्रवंस काठिन्यं॥ तदनु च सेवकलोके लोकेश कथं कठोरतां यासि ॥१७

**अर्थ-** परंतु अहो रामा, आपण दयानिधि असून तुमच्या ठिकाणीं जें माझ्या विषयीं काठिन्य आहे तें तर मला अति आश्चर्य कारक भासतें अशा आशयानें विज्ञापना करतात कीं, आपण श्रीमान् असून आपले चित्तांतें मजविषयीं निर्दयत्व आहे हें मात्र आतां माझ्या चित्तास आश्चर्य कारक आहे परंतु माझ्या ठिकाणीं निर्दयत्व नाहीं असें तुह्मीं बोललेत तर अहो त्रिभुवन पालका तुमचा मी सेवक जन असून तुह्मीं मज विषयीं निर्दय तेला कां प्राप्त होतां तस्मात् तुह्मां सर्वेश्वरास हें सर्वथा अनुचित आहे. ह्या यांतील भाव आहे.

अंके तव गतपंके लंकेशारिपो तिपोष्य मासीनं॥ त्वन्मुखसौरभचर्चित तांबूलाशं शिशुं प्रभो पाहि ॥१८॥

**अर्थ-** आतां आपण माझे पिता आहां व मी तुमचा बालक आहें असें मानून माझें इच्छित पूर्ण करा अशा भावानें प्रार्थना करतात कीं, अहो प्रभो लंकेश रावण शत्रो रघुनाथा तुमच्या मुख संबंधि सुगंधानें युक्त जो तांबूल त्याची आशा धरून मी तुमचा अवश्य पोष्य बालक तुमच्या अति निर्मल अंका (मांडी) वर बसलों आहें यास्तव आपण माझें संरक्षण करावें.

चुंबुकं सम्मुखंनाये करेण कर्षत मर्भकं मातः॥ सिंदूराचलवासिनि मां मिह रामाभिधे पाहि॥१९

**अर्थ-** आतां आचार्य रामास जननी रूपानें स्तवितात कीं, हे अरुणाचल वासिनि राम नामक मातः मी तुझा बालक असल्या मुळें तुझी हनवटी स्वकरानें मी आपणा कडे सन्मुख करण्या साठीं आकर्षण करीत आहें.

कारण लोकांतही असें दृष्ट आहे कीं, माता जर बालकाकडे पहात नसलीतर ते बालक आपणाकडे मातेनें पहावें या साठीं आपल्या हातानें तिचें मुख आपणाकडे करितात हें बालकांचें कृत्य स्वभावसिद्धच असतें. यास्तव हे आई तूं मजकडे दयार्द्र दृष्टीनें अवलोकन करून या संसारांत मला रक्षण कर.

उचिता त्वय धृष्यता ते प्रत्यर्थिनृपेषु ना र्भकेपि मयि ॥ वत्सलताधृष्यतयो र्गोव्याघ्रस्येव वैतते वैरं ॥ २० ॥

अर्थ— परंतु मी जगदीश्वर असल्यामुळें सर्वांस असत्य आहें यास्तव तूं माझ्याजवळ इतका धीटपणा करतोस हें योग्य नाहीं असें आपण कदाचित् ह्मणालतर त्या विषयीं विज्ञापना करतों कीं, आपलें शत्रुत्व करणारे जे राजे आहेत त्यांविषयीं आपली जी अधृष्यता ( जवळ बसून संभाषणादिक न करणें ) ती उचितच आहे परंतु ती मजविषयीं योग्य नाहीं; कारण मी तुमचा पोष्य बालक आहें यास्तव मजविषयीं आपलें वात्सल्यच असलें पाहिजे. आणि गाई व व्याघ्र यांचें जसें वैर निरंतर तें आहे तद्वतच वात्सल्य व अधृष्यता यांचा परस्पर वैरभाव आहे. अतएव हीं दोन्हीं एकत्र करण्यास अशक्य आहेत आणि मीतर वात्सल्य पात्र आहें यावरून मजवर अधृष्यता करणें संभवत नाहीं.

पितरौ यत्र विभिन्नौ तत्रा न्यतरेण जीवनं हि शिशोः ॥ उभयं त्वमेव मे तत् त्वयि निष्करुणे करोमि किं राम ॥ २१ ॥

अर्थ— आतां आचार्य लोक दृष्टांतावरून प्रार्थना करतात कीं, अहो रामा, जेथें मातापितर भिन्न असतात तेथें उभयतांतून एक उदासीन असला तरी माता अथवा पिता यांतून एकाच्या योगानें बालकाचें पालन होतें; परंतु माझे मातापितर हे दोघेही आपण एकच आहां असें असून तुह्मी जर मजविषयीं करुणा रहित झालां तरमी आपलें दुःख कोणापुढें निवेदन करावें.

न शृणोषि दीनभाषित मिति सर्वज्ञे न शक्यते वक्तुं ॥ श्रुत्वा स्थितो सि तूष्णी मित्यपि वचनं दयो-

निधो निंद्यं ॥ २२ ॥

अर्थ:- त्या प्रमाणें आपण सर्वज्ञ आहां या वरून तुह्मीं माझें दीन वचन श्रवण करीत नाहीं असें प्रतिपादन करणें अशक्य आहे तसेंच मज दीनाचें प्रार्थना वचन श्रवण करून तें मनावर न घेतां आपण स्वस्थ बसलांत हेंहि भाषण तुह्मां विषयीं अयोग्यच आहे; कारण तुह्मीं करुणा समुद्र आहां आणि लोकांत ही जे करुणाशील समर्थ असतात तेही दीनांची वाणी श्रवण करून उगीच बसत नाहींत तर ते त्या दीन जनांवर कांहीं तरी स्वशक्त्यनुसार उपकार करतात असा अनुभव आहे. हें यांतील तात्पर्य समजावें.

किंवा तद्गुरुकार्यं यद्व्यासंगेन जानकीजाने ॥ दीनोनि मे वचांसि प्रकटं नो यांति कर्णमार्गं ते ॥२३॥

अर्थ:- परंतु यद्यपि कोणी प्रभु दयालु असले तथापि ते अन्यकार्यासक्त असतां त्या कालीं इतरांचीं भाषणें ऐकत नाहींत असें कदाचित् आपण ह्मणाल तर त्या विषयीं मी विज्ञापना करतों कीं, हे जानकीपते आपण ज्या कार्या विषयीं आसक्त असल्यामुळें माझीं दीन वाक्यें तुमच्या कर्णमार्गावर स्पष्ट रीतीनें प्राप्त होत नाहींत असें आपलें महत्कार्य कोणतें आहे.

प्रायो राक्षसयुद्धे श्रांतः शेषे निशं ञ्रवेव शेषे ॥ य उज्जल्पतो भृशं मे करुणानि वचांसि नो वधारयसि ॥ २४ ॥

अर्थ:- परंतु मला प्रायः असें वाटतें कीं, अहो रामा, आपण पूर्वीं लंकेंत गेलां होतां त्या कालीं तुह्मीं राक्षसांशीं केलेल्या युद्धांत बहुत श्रमलां असाल ह्मणून सांप्रत आपण त्या युद्धश्रम परिहारार्थ शेष पर्यंकावर स्वस्थपणें अहोरात्र निद्राच केली असेल अत एव मी अतिशयें प्रार्थना करीत असून ही माझीं दीन भाषणें आपल्या श्रवणांत येत नाहींत, कारण लोकांतहि असाच अनुभव आहे कीं, जो अत्यंत श्रमानें निद्रित होतो त्यास लोकांच्या भाषणांचें श्रवण होत नाहीं. व तो कांहीं एक लोक व्यवहार ही त्या कालीं जाणत नाहीं.

अपि दलंति वज्रहृदयं मद्वचनेन रोदिनो वं पाषाणः ॥ किंवा मयो परोक्षं येन करुणाब्धि भवा

नुदासीनः ॥ २५

अर्थ— यद्यपि वज्राच्या अंतर्भागाचें विदारण होणें व पाषाणानें रुद-न करणें या दोन्हीं गोष्टींचा असंभव आहे तथापि माझ्या दीन वचनानें व-ज्राचें हृदय विदारण पावतें व पाषाणही रुदन करीत आहे किंकाय असें भा-सतें आणि अहो रामा आपण तर करुणा समुद्र असून अशा मज अतिदी-ना विषयीं उदासीन झालां या वरून मी आपला अपराध काय केला असे-ल तो असो तस्मात् हें महदाश्चर्य आहे.

जल्पंत मल्पबुद्धिं पश्यंत स्त्वत्कृपा मपश्यंतः ॥
मा मुपहसंति लोकाः शोकारे रामे तत् तवा श्लाा-
घ्यं ॥ २६ ॥

अर्थ— त्याच प्रमाणें हे शोकापहरण समर्थ श्रीरामचंद्रा मी वारं वार दीन-वचनें उच्चारीत असून अल्पबुद्धि आहें अशा मज अज्ञ दीनावर तुझी कृपा क-टाक्ष होत नाहीं अशा भावानें मजकडे पाहून स्थूल बुद्धि लोक माझा उपहास करतील हें तुजला श्लाघ्य नाहीं यास्तव आपण स्वकीय अनन्य सेवकरूप-मजवर शीघ्र कृपा करावी. हा यांतील भाव आहे.

क्षीरेण दग्धजिव्ह स्तक्रं फूत्कृत्य पामरः पिबति॥
दंभिन मवलोक्य जन स्तद्व न्मां शंकते त्वया-
त्यक्तं ॥ २७ ॥

अर्थ— जसे मूढ लोक आपली जिव्हा उष्ण दुग्धानें पोळली असतां ते त्या दुधासारख्या शुभ्रवर्ण तक्रास पाहून त्या वर्ण साम्या मुळें तें ताक शीतळ-असलें तरी त्या समुखांतील फूत्कार वायूनें थंड करून प्राशन करतात. तद्वत्च तुह्मीं माझा त्याग केला असतां सर्व लोक दांभिक जनांस अवलोकन क-रून मजवर तुमचा अनुग्रह नसल्यामुळें मी ही दांभिक भक्तच आहें असें मला मानितील.

मयि करुणामृदुभावा द्यदि नो मोक्षं करोषि मा-
कुरु तत् ॥ स्वस्वामिभाव मीश स्वीयं प्रकटीकुरु-
ष्व दाशरथे ॥ २८ ॥

अर्थ— तसेच आपण करुणेच्या योगानें मृदु स्वभाव असून मला प-

स्वकीय मानून जरी माझें इच्छित पूर्ण न कराल तरी तें मला इष्ट असल्या-मुळें करूं नका; परंतु अहो दशरथ राजकुमारा प्रभो, तुमचा मी सेवक आहें यास्तव तुह्मीं आपला स्वामित्व धर्म मज स्वकीय सेवका विषयीं अवश्य प्रगट करावा.

पायेस इव राम सर्पि र्भस्मनि निहितं करोति किं नाम ॥ तद्वत्तव मंत्रजपः पापिनि मयि किं करोति वा भीष्टं ॥ २९ ॥

अर्थ- परंतु माझ्या मंत्राचा जपच तुझें इष्ट मनोरथ पूर्ण करील तेव्हां माझी प्रार्थना किमर्थ करतोस असें आपण कदाचित् ह्मणाल तर त्या विषयीं विज्ञापना करतों कीं, अहो रामा, पायसान्नांत (क्षिरा) घृत घातलें असतां तें जसें मनुष्यांस पुष्ट्यादि कार्य दायक होतें तसें तें घृत भस्मांत घातलें तर तेथें त्या पासून जसें किमपि कार्य होत नाहीं तद्वतच तुमच्या रामनाम रूप मंत्राचा जप मज पापिष्ठाचें इष्ट कार्य काय करणार आहे तर किंचिदपि करणार नाहीं हें सिद्ध आहे.

संतप्तायसपिंडे वार्यपि भस्मीभवत्युपक्षिप्तं ॥ नित्याशौचे तद्वत्त्वयि मंत्रजपोपि भस्मसाद्भवति ॥ ३० ॥

अर्थ- परंतु हे मूढा माझें नामरूप उदक तुझ्या पाप स्वरूप अग्नीला शांत करील असें जर आपण मानीत असाल तर त्या विषयीं पुनरपि-आचार्य स्वकीय दोषोद्घाटन पूर्वक विनंति करतात कीं, अहो श्रीरामचंद्रा अत्यंत तप्त झालेल्या लोहमय पिंडावर उदक टाकलें तरी तें ही जसें तत्काल भस्म प्राय होतें तद्वतच तुमच्या नाम मंत्राचा जपही मज विषयीं शुद्धिकारक होणार नाहीं; कारण मी निरंतर अपवित्र रूपच आहें.

मालिन्य दोषभीत्या पृथक् विधेयं नु माषराशेः किं ॥ मत्तः पापशरीरात् पापं किंवा जपः करोति पृथक् ॥ ३१ ॥

अर्थ- परंतु इष्ट प्रति बंधक पापानेंच तुझी मनोरथ सिद्धि होत नाहीं असें असेल तर तूं माझ्या मंत्र जपानें त्या पापाचें निराकरण कर

ह्मणतं त्या योगानें तुझी इष्टसिद्धि होईल असें आपण कदाचित् ह्मणाल तर-मी स्वभावतःच पापी आहें यास्तव तुमच्या मंत्राचा जप माझें पापांस काय दूर करणार आहे अशा अभिप्रायानें आचार्य विज्ञप्ति करतात कीं, हे रामा, मलिनत्व दोषभयानें माष (उडीद) राशीचा स्वभावसिद्ध कृष्ण वर्ण जसा दूर करण्यास अशक्य आहे तद्वतच मी केवळ पापशरीर रूपी आहें यास्तव तुमच्या मंत्राचा जप माझ्या अशा पापशरीरापासून पाप पृथक् काढण्याविषयीं कसा समर्थ होईल. तस्मात् माझें पाप मंत्र जपास अपरिहार्य आहे हें सिद्ध झालें यास्तव आपण केवळ कृपादृष्टीनेंच माझा अंगीकार केला पाहिजे.

**माकुरु साहसमित्थं जल्पन् पक्षी भिनत्ति पाषाणं ॥ तद्वत् सहजे दोषैः पापं निंदामि राम कुर्वे च ॥ ३२ ॥**

**अर्थ—** अरे तूं आपल्या अंगीं अनिवार्य दोष आहेत असें ह्मणतोस परंतु त्या दोषांचें आचरण कां करितोस असा आपला अभिप्राय असेल तर त्याविषयीं अशी रीति आहे कीं, जो पापिष्ठ असतो तो पापाचरण करूं नये असें लोकांसमक्ष मात्र भाषण करतो तथापि तो स्वयें पाप करीतच असतो अशा आशयानें आचार्य विनंति करतात कीं हे रामा, कांहीं जातीचे पक्षी स्वभावेनें आपल्या पक्ष्यांस ह्मणतात कीं, अरे साहस करूं नको असें बोलून ही तो स्वतः आपल्या जाति स्वभावामुळें पाषाणाचें विदारण जसें करीतच असतो तद्वतच मीही पापकुत्सित आहें अशी पातकाची निंदा करीत असून ही मी स्वकीय दुष्ट स्वभावामुळें पुनरपि त्या पापकर्माचें आचरण स्वतः करीत आहें.

**मृगमदभूमौ जनितो जहाति दोषं निजं पलांडुः किं ॥ तद्वत्तव दासो हं त्यजामि दोषं न जातु देवेश ॥ ३३ ॥**

**अर्थ—** परंतु चंदन वृक्षाच्या समागमानें मलयपर्वतावरील अन्य वृक्षही चंदन रूप जसे होतात तसा तूंहि माझ्या मंत्राच्या जपादिकानें माझा संग तुझ्या अंतःकरणांत प्राप्त झाला असतां तूं निर्दोष होशील असें आपण कदाचित् मानीत असाल तर त्या विषयीं असें आहे कीं, स्वभावसिद्ध

जे दोष आहेत ते शतशः प्रयत्न केले तरीं त्याउपायानीं ही अपरिहार्य आहेत अशा आशयानें आचार्य प्रार्थना करतात कीं, हे देवेश रामचंद्रा, पलांडु ( दुर्गंध कंदविशेष ) कस्तूरीच्या केलेल्या आळ्यांच्या भूमींत उत्पन्न झाला तरी तो स्वकीय दुर्गंधरूप दोषाचा त्याग करतो काय? तर तो जसा स्वदोषाचा त्याग करीत नाहीं, तद्वतच मी तुमचा दास जरी झालों तथापि आपल्या जाति स्वभावामुळें स्वदोषाचा कदापि त्याग करीत नाहीं.

सुकृतिन इषत्पापे प्रायश्चित्तं रघूत्तम प्रोक्तं ॥ अपयाति मां समुदीक्ष्य प्रायस्तदपीह गौरिव व्याघ्रं ॥ ३४

अर्थः– परंतु तूं जर अत्यंत पापिष्ठ असलास तर द्वादशाब्दादि प्रायश्चित्तानीं तुझी शुद्धी होईल असें आपण कदाचित् ह्मणाल तर तेंही मज विषयीं संभवत नाहीं अशा आशयानें आचार्य ह्मणतात कीं, हे रघूत्तमा, बहुपुण्यवान् पुरुषास किंचित् पाप घडलें असतां त्याच्या परिहारार्थ धर्मशास्त्रांत प्रायश्चित्त सांगितलें आहे यास्तव तें प्रायश्चित्त ही प्रायः मला अवलोकन करून अतिदूर पलायन करतें; कारण माझें पाप महत् असल्यामुळें तें मला शुद्ध करण्या विषयीं समर्थ होत नाहीं या विषयीं दृष्टांत असा कीं, गाय व्याघ्रास अवलोकन करून जशी पलायन करित्ये तद्वत्.

परिगणना भगणानां भविता यदि वा समंततोणूनां ॥ राघव पापचयानां न मत्कृतानां भवेदियं कृचन ॥ ३५ ॥

अर्थः– परंतु तूं आपल्या पाप संख्येशीं समान प्रायश्चित्त कर ह्मणजे तेणें करून तुझ्या सर्व पापांचा नाश झाला असतां तूं कृतार्थ होशील असें जर आपण कदाचित् ह्मणाल तर माझे पापांची संख्याच होणें अशक्य आहे अशा अभिप्रायानें आचार्य विज्ञापना करतात कीं, हे राघवा, नक्षत्र गण व सर्व परमाणु यांची गणना कदाचित् होऊं शकेल परंतु मी केलेल्या पापांच्या समुदायाची ही गणना कदापि होणार नाहीं; कारण माझीं पापें अपरिमित आहेत.

सर्वज्ञेता श्रुता ते सत्यं वद राम किंकरोहं ते ॥ मत्कृतदुष्कृतसंख्या यथार्थतो वेत्सि किं न वा वे-

स्मि ॥ ३६ ॥

**अर्थ.-** आतां आचार्य रामचंद्रास विनय पूर्वक प्रश्न करतात तो असा कीं, हे रामा, तुमचें सर्वज्ञत्व श्रुति स्मृति द्वारा आह्मांस श्रुत आहे यास्तव मी तुमचा सेवक आहें किंवा नाहीं हें सत्य सांगा. आणि आपण सर्वज्ञ आहां-याच कारणास्तव मी केलेल्या पापांची संख्या तुह्मीं यथार्थ रीतीनें जाणतां. किंवा नाहीं हें हि मला सांगावें.

अपरोधिनमपरोधिनमपराधिनमर्भकं रघूत्तंस ॥
पालय पालय पालय जननि श्रीराम नार्थये किं-
चित् ॥ ३७ ॥

**अर्थ.-** आतां बहुत प्रार्थना करून काय कर्तव्य आहे कारण स्वामीनीं अवश्य पालन करण्या विषयीं मी पात्र आहें अशा आशयानें आचार्य प्रार्थना करतात कीं. हे रघुकुल भूषणा, मी सर्वथा अतिशयित महान् अपराधि बालक आहें असें त्रिवार सत्य सांगतों, आणि हे श्रीरामरूप जननी मी तुझा बालक आहें यास्तव तूं आतां माझें त्रिसत्य पालन कर; कारण मी अन्य कार्या विषयीं तुजला प्रार्थीत नाहीं. याच प्रमाणें अपराधांची क्षमा करण्या विषयीं पित्या पेक्षां मातोश्रीच अधिक दयालु असल्ये यास्तव येथें जनक शब्द न घालतां-जननी शब्दाचा प्रयोग केला आहे.

उचितं वक्तुमभद्रं नहि नाथे त्वय्यनाथ इति वा-
क्यं ॥ जिह्नेम्युपेक्षितोहं सीतानाथे त्वया सनाथ-
इति ॥ ३८ ॥

**अर्थ.-** आतां मी अनाथ आहें किंवा सनाथ आहें अशा कोणत्याही प्रकारानें बोलण्या विषयीं मी समर्थ नाहीं अशा भावानें आचार्य विज्ञापना करतात कीं. हे रामा, आपण मला नाथ विद्यमान असून मी अनाथ आहें असें वाक्य अमंगळ असल्यामुळें बोलणें नें मला जसें उचित नाहीं तसेंच हे सीता नाथ तुह्मीं माझी उपेक्षा केली आहे यास्तव आतां मी सनाथ आहें असेंहि ह्मणण्यास मी लज्जित होतों तस्मात् मी सनाथ आहें किंवा अनाथ आहें अशा दोन्ही प्रकारानीं बोलण्यास मी असमर्थ आहें हा यांतील भाव आहे.

क्रोशंतं दीनास्यं पशुरप्युपयाति गौर्निजं वत्सं ॥ ईदृङ् मदीयभाग्यं सर्वविदपि वेत्ति मत्कृपां न भवान् ॥ ३९ ॥

**अर्थ**- नसेच गायी आदिकरून पशुही आपल्या आक्रोश करणाऱ्या वत्सा समीप दयालुत्वानें त्वरित जातात अशा आशयानें आचार्य प्रार्थना करतात कीं, उच्च स्वरानें शब्द करीत असून म्लान वदन झालेल्या अशा आपल्या वत्सासन्निध गायी आदिकरून पशु योनींतील प्राणीही धांवत येतात आणि हे रामा आपण सर्वज्ञ असून ही मजवर करुणा करण्या साठीं मजदीन वदनाची आक्रोश पूर्वक प्रार्थना जाणत नाहीं तस्मात् हें माझेंच असें मंदभाग्य आहे.

सर्वज्ञः स्वाधीनो दयानिधे ब्रूहि मयि कथं कठिनः ॥ यदि पृष्टो दास्यसि किं विनेश्वरत्वं ममोत्तरं राम ॥ ४० ॥

**अर्थ**- परंतु तुह्मी सर्वज्ञत्वादि सकलगुण पूर्ण असून मजविषयीं निष्ठुरत्व कां करतां असा मी प्रश्न केला असतां त्यावर तुह्मीं उत्तर काय द्याल अशा आशयानें आचार्य प्रार्थना करतात कीं, हे रामा, आपण सर्वज्ञ, स्वतंत्र व दयेचे केवल निधि असून मजवर निष्ठुर कां झालां तें मला सांगा असें मी विचारिलें असतां तुह्मीं आपल्या ईश्वरत्वा वांचून अन्य उत्तर मला काय द्याल किमपि दुसरें उत्तर नाहीं तर मी ईश्वर असल्या मुळें स्वेच्छाचारी आहें यास्तव मी कोणावर दया करतों व कोणावर करीत नाहीं याविषयीं असा ईश्वराचा स्वेच्छाचारी स्वभावच असतो याहून इतर हेतु कांहीं नाहीं हा यांतील भाव आहे.

अपराधमार्गणे च क्वचिदपि करुणा तवोचिता नैव ॥ नहि कश्चित् संसारी गतापराधोस्ति वल्लभेषु तव ॥ ४१ ॥

**अर्थ**- परंतु मी अपराधि भक्तजनांवर दया करीत नाहीं असें जर आपलें ह्मणणें असेल तर तुमचे जितके भक्त ते सर्वही संसारी आहेत आणि संसारी जनां कडून तर अपराध अवश्य घडतच असतात असें असल्या-

मुळें कोणावर ही तुमची कृपा होणें योग्य नाहीं. अशा आशयानें आचार्य विज्ञापना करतात कीं, हे रघुनाथा, आपण आह्मा भक्तांच्या अपराधा विषयीं विचार करूं लागलां तर कोणत्याही संसारी भक्तावर तुमची दया होणें उचित नाहीं; कारण कोणी तरी निरपराधी संसारी, तुमच्या कृपा पात्र भूत भक्तजनांत आहे काय तर कोणी ही नाहीं तेव्हां तुमच्या दयेला स्थलच नाहीं सें भासतें.

तेंस्यु स्वल्पोपराधो मम पुनरधिक इति प्रमाता कः
॥ अहमिति चेदभ्यस्ता त्वयेशो सर्वज्ञता तदर्थं किं ॥ ४२

अर्थ- परंतु मी ज्यावर कृपा करतों त्याचे अपराध अल्प असतात. आणि तुझेतर अपराध बहुतच आहेत यास्तव मी तुजवर दया करीत नाहीं असें आपण कदाचित् ह्मणाल तर त्या विषयीं विज्ञापना करतों कीं, जो तुमचा कृपापात्र असेल त्याचे अपराध अति अल्प आहेत आणि माझे मात्र अपराध अधिक आहेत अशा विषयींची गणना करणारा तरीं कोण आहे आणि अशा विषयीं साक्षी देण्यास ही समर्थ कोणी नाहीं तेव्हां या विषयीं मी सर्वज्ञ असल्यामुळें मीच साक्षी आहें असें जर आपण ह्मणाल तर हे रामचंद्र प्रभो; तर तुह्मीं स्वयमेव एतदर्थच आपल्या सर्वज्ञतेचा अभ्यास केला आहे कीं काय?

अग्रजजायामिच्छत्यग्रजवधलालसांतरात्मनि च
॥ यो करुणा सुग्रीवे राघव सा ते कथं तेरा मुचिता
॥ ४३ ॥

अर्थ- परंतु अपराधि जनांवर माझी दया तूं कोठें अवलोकन केलीस असें जर स्वामीनीं ह्मटलें तर अपराधि लोकांवर ही आपला अनुग्रह मी श्रवण केला आहे अशा आशयानें आचार्य प्रार्थना करतात कीं, हे राघवा, सुग्रीव आपल्या वालि रूप जेष्ठ बंधूच्या तारा नामक भार्येची इच्छा करीत असून पुन. त्या वालि नामक ज्येष्ठ भ्रात्याच्या वधा विषयीं ही तो बुद्धि पूर्वक अत्यंत उद्युक्त होता तथापि अशा शास्त्र विरुद्ध कर्म करणाऱ्या सुग्रीवावर जी आपली करुणा प्रसिद्ध होती ती अतिशयें करून कशी उचित झाली या वरून आपण अपराधिजनांवर ही अनुग्रह करतां हें सिद्ध आहे.

भ्रातुर्वज्ञामात्रात् संत्यार्पित वैर वंदितेवे जवात्
॥ स्वसमीप मागतेस्मिन् विभीषणे कोऽस्ति नि-

रपराधित्वं ॥ ४४ ॥

**अर्थ**- तसाच आपण अपराधि भक्तावर अनुग्रह केलेला पुनरपि दर्शविनों अशा अभिप्रायानें आचार्य विनंति करतात कीं, हे रामा, ज्येष्ठबंधु रावण बिभीषणास पित्या समान शास्त्रतः मान्य असून बिभीषणानें त्याची अवज्ञा केली त्या अपमान मात्रानें पितृ सम रावणाशीं उत्पन्न झालेल्या वैररूप असह्य अग्नीच्या योगानें वेगें करून त्या वैराग्नी सहवर्तमान बिभीषण आपल्या समीप भागीं शरण प्राप्त झाला असतां त्यावर आपण तत्काल कृपा केली. परंतु त्याचे अंगीं निर्दोषित्व व निरपराधित्व कोठें होतें तरतें मुळींच नव्हतें.

जल्पति कल्पय मोऽर्चैः पौरोभाग्यं मयि क्षमोसिंधो ॥ संतप्तचित्तभावाद्दुरुक्तमुक्तं यदुत्तमश्लोक ॥ ४५ ॥

**अर्थ**- आतां एतावत्काल पर्यंत मी इतरांच्या दोषांचें उद्घाटन जें केलें तें केवल मी आपले क्लेश सहन न झाल्यामुळें केलें यास्तव मजवर निंदकत्वाचा आरोप करूं नये अशा भावानें आचार्य ह्मणतात कीं, हे अज्ञान नाशक कीर्ति संपन्न क्षमा समुद्रा रामा, मीजरी कांहीं अस्ताव्यस्त भाषण उच्च स्वरानें केलें तथापि आपण हा दुसऱ्याच्या दोषां विषयीं मात्र दृष्टि ठेवणारा आहे अशी मजवर निंदकत्व कल्पना करूं नका; कारण मी दुःखित चित्त झालों आहें तेणें करून मजकडून श्रेष्ठांची निंदा घडली आणि या विषयीं लोकांत ही असा अनुभव आहे कीं, ज्यास अति दुःख होतें तो अविवेकामुळें वाईट अव्यवस्थित भाषण करतो परंतु तें भाषण सामान्य जनही मनावर घेत नाहींत.

आस्तामेतदसभ्यं परदोषगवेषणं परोक्षेण ॥ ईदृशि भवतश्चरिते बिभीषणाद्यैः किमपराद्धं मे ॥ ॥ ४६

**अर्थ**- तसेंच परकी यांच्या दोषांच्या उद्घाटनानें आपल्याला निंदकत्व रूप दोष येतो यास्तव तें आतां मला इष्ट नाहीं अशा आशयानें आचार्य प्रार्थना करतात कीं, इतर लोकांच्या असमक्ष त्यांच्या दोषांचें-

उच्चारण करणें हें असभ्य तेचें कृत्य आहे यास्तव तें कर्तव्य कर्म नसल्या मुळें आतां पुरे करतों आणि हे रामा, तुमचें करुणा कर्तृत्वादिक पुण्य-कारक चरित्र वर्णन करण्या विषयीं योग्य असून त्याचा त्याग करून-मी बिभीषणादिकांची निंदा व्यर्थ किमर्थ करतों. व त्यानीं असा माझा अपराध तरीं काय केला आहे तर किमपि नाहीं.

स्वीयमणौ गुणहीने कौ वा कलहः परीक्षकेण सह ॥ त्वयि यादृच्छिककृत्ये भृत्येन सहेर्ष्यया भवेत् किं मे ॥ ४७ ॥

अर्थ- तसेंच आपण स्वेच्छाचारी आहां यास्तव इतरांवर दोषारोप करण्या चें मला प्रयोजन काय अशा अभिप्रायानें आचार्य विज्ञापना करतात कीं, स्वकीय-मणिच जर गुण रहित असला तर मणि परिक्षका सह वर्तमान विवाद करण्या चें कारण काय? किमपि जसें नाहीं तद्वतच आपण प्रभुच स्वेच्छाचारी असतां तुमच्या सेवकां सह ईर्ष्येनें (परोत्कर्ष सहन न करणें) प्राप्त होणा त्या वि-षादा पासून मला काय फलप्राप्ती होणार किमपी ही होणार नाहीं.

वक्तव्यमेतदुक्तं तवाग्रतो यच्च यावच्च ॥ यद्यद्या-प्यसि रुष्टस्त्वं ननु पतितोस्मि पादयोरुपरि ॥ ४८

अर्थ- तसेंच आतां जें माझ्या मनांत होतें तें साकल्यें करून मी बोललों त्यां-त जें सूक्त किंवा असूक्त असेल त्या सर्वांची क्षमा असावी अशा भावाने आ-चार्य प्रार्थना करतात कीं, हे रामा, जें कांहीं बोलावयाचें माझ्या मनांत-होतें तें सर्व तुमच्या अग्रभागीं निवेदन केलेंच असें असून आपण जर मज विषयीं अद्यापि मनांत रुष्ट असाल तर हे रामा, तुम्हीं प्रसन्न व्हा; कार-ण मी तुमच्या चरण कमलांवर साष्टांग नमस्कार घालून पडलों आहें त-स्मात् आतां मी तुमच्या चरणास शरण येऊन नमस्कार घातला आहे. यास्त-व माझ्या सर्व अपराधांची आपण क्षमा करावी.

प्रणिपातमात्रनीरान्च्छाम्यति कोपाशुशुक्षणिर्म-हताम् ॥ मम दुरितस्य विपाके राघव नाद्यापि मुंक्त कोपोसि ॥ ४९ ॥

अर्थ- कारण महात्म्यांस नमस्कार केला असतां त्यांची प्रसन्नता अप-

राधि जनावर ही होय्ये अशा अभिप्रायानें आचार्य विज्ञापना करतात. हे-रामचंद्रा साधूंना कोपरूप अग्नि त्यांस नमस्कार केला असतां तावन्मात्रानें च तो नाश पावतो असें असून हे राघवा, आपण मजविषयीं जे कोपयुक्त झालां तो तुमच्या अंतःकरणांतील कोपाग्नि नमस्कारानेंहि अद्यापि शांत-होत नाहीं तस्मात् माझ्या पाप कर्मांच्या परिणामानींच ही अशी गोष्ट घडली असावी.

त्वत्तुल्यो नास्ति विभुर्मत्तुल्यो नास्ति चापरो दीनः ॥ दी-
नानाथैकबंधो करुणासिंधो ब्रुवेहमन्यत् किम् ॥ ५०

अर्थ.- आता मी कसाही जरी पापी असलों तरी आपण सर्व प्रकारें मजवर अनुग्रह केलाच पाहिजे अशा आशयानें आचार्य प्रार्थना करतात कीं, हे रामा, तुमच्या सारखा स्वामी कोणीही नाहीं आणि मजसारिखा दीन, त्रि-भुवनांतही अन्य कोणी नाहीं. यास्तव हे करुणासिंधो आपण दीन व अनाथ यांचे मुख्य बंधु आहां यापेक्षां मी अन्य अधिक काय बोलावें तस्मात्-आपण दयासमुद्र असल्यामुळें मजदीनाच्या पापादिक सर्व अपराधांची-क्षमा करून मजवर कृपा करावी.

देवे स्वयंप्रकाशे त्रिभुवनभवनं त्वयि प्रकाश-
यति ॥ करुणां पश्यामि नोचेदंधो वाहं न सा किं वा-
भवेति ॥ ५१ ॥

अर्थ.- त्याच प्रमाणें हे राघवा, आपण स्वयंप्रकाश देव असून त्रिभुवन-रूप गृहास प्रकाशित करीत आहां असें असून मी तुमचा करुणा रूप प्रकाश अवलोकन करीत नाहीं तेव्हां मीच अंध आहें किंवा ती करुणा तुमच्या स्वरूपीं नाहीं असा माझ्या अंतःकरणांत संदेह आला आहे

नाभीष्टं करुणातः करोषि यदि राम सापराधस्य ॥
मज्जल्पितकल्पितेन स्वांतोद्वेगेन किं न वा कुरुषे ॥ ५२

अर्थ.- हे रामा, मला इष्ट जें तुमचें मजवर कृपा कटाक्षावलोकन तें जर-आपण करुणेनें करणार नाहीं तर मला असें भासतें कीं, मी अपराधी असू-न माझ्या दुर्भाषणानीं आपल्या अंतःकरणांत उत्पन्न झालेल्या उद्वेगामुळें आ-पण मजकडे कृपा दृष्टीनें अवलोकन करीत नाहीं किंवा काय असें वाटतें.

**अरयो पि वैरभावा दिष्टं भवतो लभंत एवार्शु ॥ दो-**
**सस्यमें दयालो प्रार्थितं दाने कथमुदासीनः ॥ ५३**

**अर्थ-** हे दया समुद्रा रामा, तुमचें वैर करणारे तेही द्वेषभावानें देखील तुह्मा पासून च उत्तम गतीला शीघ्र प्राप्त झाले आणि मी तर तुमचा दास असून मी-जी प्रार्थना केली तें देण्या विषयीं आपण कां उदासीन झालां

**नोदत्तं दत्से नूनं कस्मै दत्ता विभीषणेन पुरी ॥ कि-**
**ष्किंधाराज्यं वा कपिना दत्तं भवांतरे कस्मै ॥ ५४**

**अर्थ-** हे रामा, मी कोणास दान केल्या वांचून कांहीं एक फल देत नाहीं अ-सें जर आपण ह्मणत असाल तर बिभीषणानें पूर्वी कोणास नगरीचें दान के-लें होतें तसेंच सुग्रीवानें जन्मांतरीं किष्किंधानगरीचें आधिपत्य कोणाला-दिलें होतें तर कोणासही दिलें नाहीं. यावरून तुह्मीं दान केल्या वांचून देखी-ल स्व भक्तांस देतां हें सिद्ध झालें.

**श्रीदाम्नतो गृहीताः पृथुकाश्चेत् किं त एव नो दत्ताः ॥**
**ऐंद्रं पदमिह तस्मै दत्तं तेन् केन तस्य सुकृतेन ॥ ५५**

**अर्थ-** सुदाम नामक ब्राह्मणा पासून आपण जे पृथुक ग्रहण केले ते दोन किंवा तीन मुष्टि असून तेवढेच त्यास कां दिले नाहींत आणि इंद्रपदासमान वै-भव याच लोकीं त्यास दिलें तें त्याच्या कोणत्या केलेल्या सुकृताचें फल आहे त-र असें त्यानें कोणतेंच पुण्यकर्म केलें नव्हतें यावरून असें सिद्ध झालें कीं, तु-ह्मीं भक्तांस जें देता तें त्यांच्या दाना पेक्षां अधिक असतें

**उन्मोचितो गजेंद्रो मदांधदृष्टिश्च तिर्यगुद्भूतिः ॥ दा-**
**ता सेवक कुलजः पातालेच त्वया बलिर्बद्धः ॥ ५६**

**अर्थ-** हे रघुपते, गजेंद्र मदोन्मत्त व पशु योनींत उत्पन्न झालेला असून ही तुह्मी त्यास नक्रा पासून मुक्त केलें. आणि बलि स्वतः दानशूर व तुमचा से-वक जो प्रल्हाद त्याच्या वंशांत जन्मलेला आणि त्यानें तुह्मास त्रैलोक्य दान ही केलें असें असून आपण त्यास बद्ध करून पातालांत ठेविलें. तस्मात् हें-विपरीत फल दातृत्व आपल्या ठिकाणीं भासतें.

**उद्धृत्तचित्तवृत्ते रुत्तमलोकैश्चि निर्दशा स्येस्य ॥ द-**
**शरथसंज्ञस्य विभोः कास्ति तं उच्चैस्तरामधः पातः ५७**

**अर्थ—** नसेंच आपलें अन्यही एक विपरीत कर्तृत्व आहे तें असें कीं, परस्त्रीह रणाविषयीं चित्तवृत्ति धरणाऱ्या दशाननास वैकुंठ लोक स्थिति दिलीन आणि दशरथनामक सकल पृथ्वीपालक राजास अतिशयित अधःपात कल्पिलातो- कोठेंही पुराणांत श्रुत नाहीं यास्तव यांतील तात्पर्य असें कीं, स्वर्ग ह्मणजे सुख आणि दुःख ह्मणजे नरक असे सुख व दुःख याशब्दांचे अर्थ आहेत आ- णि दशरथाचें देहावसान समयीं दुःख भोगण्याचें प्रारब्ध अवशिष्ट राहिलें- होतें ह्मणून श्रीराम ब्रह्मस्वरूप पुत्र झाल्यामुळें त्यास स्वर्ग समान जें सुख- होतें तें रामाभिषेक विघाता मुळें नाहींसें होऊन जें अतिदुःख झालें त्यादुः- खाग्नींत त्याचा देह पडलातोच त्यास अधःपात जाणावा. कारण लंकेंत देवग- णांसह आलेल्या दशरथास रामदर्शनानें अति सुख झाल्याचें वर्णन रामा- यणांत आहे.

सुग्रीवविभीषणयोस्तूष्णीं स्थितयोरभूत्परं रा-
ज्यं॥ सर्वक्लेशाभिषिक्ते प्रसन्नता वायुनंदने मौनं
॥ ५८॥

**अर्थ—** त्याच प्रमाणें आपण प्रयत्न नकरणारांसही इच्छित फल देतांतें असें कीं, सुग्रीव व बिभीषण हे किमपि श्रम नकरतां स्वस्थ बसणारे असून त्यांस जें उत्कृष्ट राज्य प्राप्त झालें तें तुह्मींच दिलें आणि तुह्मांसह समुद्रोल्लंघनादिक सर्व क्लेश सहन करणाऱ्या मारुतीवर प्रसन्नता मात्र झाली तर त्या विषयीं आपण के वल मौन धारण करूनच बसलां.

यद्यत्करोषि चैतन्महेश्वरत्वेन शोभते भवतः॥ओं-
त्सांतं ननु सकलं संकलंकमपीह पाहि मां राम॥५९

**अर्थ—** त्याच प्रमाणें हे रामा, आपण जें जें करतां तें सर्व तुमच्या महाप्रभु- त्वामुळें तुह्मांस शोभतें असें बहुत बोलण्याचें प्रयोजन काय तर तुला जी प्रा- र्थना कर्तव्य असेल ती कर. असा आपला आशय असेल तर मी विज्ञाप- ना करतों कीं, तुमच्या सर्व गुण दोषांचें तें कथन निश्चयें करून राहो आणि मी जरी सदोष सेवक आहें तथापि आपण कृपा कटाक्षानें अवलोकनकरून माझें रक्षण करावें.

चैलांचले धृतोसि प्रसभं कुत्रापयास्यसि स्वैरं॥

कुरुषे जीवनवृत्तिं वद वा व्यवहारमीडयेल्लोकेषु ॥ ६०

अर्थ- त्याचप्रमाणें हे रामा तुमच्या चरणाच्या पदरास मी धरलें आहे तें हां आपण स्वेच्छेनें बलात्कारें करून कोठें जाणार आहां तर आतां माझ्या योग क्षेमाचा निर्वाह करा नाहींतर लोकांत जसे पुत्रादिक आपल्यास देण्याच्या वस्तू विषयीं मातापितरादिकांशीं वाद करतात तद्वत् मला जें इष्ट आहे तें देण्यास योग्य आहे किंवा नाहीं याविषयीं आपण पूज्यजनांत वाद करावा.

त्वं मम जननी जनकस्त्वमेव बंधुः कुलं च शीलं च ॥ त्वयि निष्ठुरतां याते तृणमपि वज्रायते मयीशो-न ॥ ६१ ॥

अर्थ- हे स्वामिन् माझी जननी, पिता, बंधु, कुल, शील इत्यादिक सर्व तु-म्हींच आहां असें असून तुम्हीं मज विषयीं निर्दय झालां असतां तृणही-मला वज्रप्राय दुःखदायक होईल.

कृपया द्रक्ष्यसि मांचेत् तृणाय मंस्ये हि कालमप्युच्चैः ॥ अकृपाचेत्तव राम प्रायस्तृणमेव कालरूपं मे ॥ ६२ ॥

अर्थ- हे रामा आपण जर मजकडे कृपादृष्टीनें अवलोकन कराल तर मी महा कालासही तृणापेक्षां अति तुच्छ मानीन तसाच तुमचा कृपा कटा-क्ष मजकडे नसेल तर तृणच मला प्रायः कालरूप होईल.

अथवा हो किं बहुना धार्ष्ट्यं किमिहोचितं प्रभोः पुरतः ॥ जन्मप्रबंधसिद्धाः त्वां धीनां यांति मूलतां दोषाः ॥ ६३ ॥

अर्थ- अथवा बहुत भाषण केल्यांत काय विशेष आहे आणि स्वामी च्या अग्रभागीं स्वार्थ साधना विषयीं इतका धट्टपणा करणें हें उचित नाहीं; कारण पूर्वी अनेक जन्मांत केलेले दोषच चित्ताच्या विक्षेपास कारण होतात हाच महान् खेद आहे.

नाराधितोसि पूर्वं क्वचिदपि नाराधयामि चेदानीं ॥ इच्छामि च स्वमिष्टं कष्टं वा मूढ नैव मे बोधं ॥ ६४

अर्थ- त्याचप्रमाणें मी पूर्व जन्मीं तुमचें आराधन कदापि केलें नसून

प्रस्तुत याजन्मांत ही जर मी तुमची एकांत भक्तीनें सेवा करीत नाहीं असें अ सून मी आपल्या इच्छित फल प्राप्तीची इच्छा करितों तस्मात् माझी जी अ त्यंत मूढता ही परम क्लेशास्पद आहे.

**दुर्वृत्तं दुर्बुद्धिं कामादिवशं पराङ्मुखं भवेति॥ पालयसिमां यं दोषा राघव भवंतः क्षमोच्चकै जयं- ति ॥ ६५॥**

**अर्थ**- आणि हे राघवा, मी दुराचार शील व दुष्ट बुद्धि असून काम क्रोधा दि- कांच्या स्वाधीन असल्यामुळें तुह्मां विषयीं पराङ्मुख आहें. अशा अने- क दोषसमुदायानीं मी युक्त असून आपण माझें पालन कराल तर ही तुम- ची क्षमा शक्ति लोकांत सर्वोत्कर्षानें प्रख्यात होईल.

**रचितापराधजाले मयि सदयोसीति वेद्म्यनेने- वं ॥ मुखतो निरंकुशा मे रामेति यतः प्रकाशते वाणी ॥ ६६**

**अर्थ**- यद्यपि मी बहु अपराध करणारा सेवक आहें तथापि मजवर आपण सदय आह्मां असें मी ज्याच हेतू वरून जाणतों तो हेतु असा कीं, ज्या कारणास्तव माझ्या मुखांतून राम राम अशी अकुंठित वाणी वा- रंवार निघत आहे. या वरून आपली मजवर दया आहे असें वाटतें.

**नैवास्ति ते नुकंपा यस्मिंस्तस्या स्यतः कथं कारं ॥ किल्बिषमुद्राभाजो रामेति निरामयं वचः क- थं प्रसरेत् ॥ ६७॥**

**अर्थ**- हे राघवा आपली कृपा ज्या पुरुषावर असत नाहींत त्या पापरूप मुद्रा युक्त मानवाच्या मुखांतून तुमच्या कृपे वांचून हे राम असें निर्दोषव चन कसें निघेल तस्मात् तुमची दया मजवर आहे हें सिद्ध झालें.

**तृष्णाव्यालविषार्तं धनधनशब्दैः पतंतमुर्व्यां मां ॥ गरुडध्वज गुरुतापं जीवनदानेन पाहि- रक्षोरे ॥ ६८ ॥**

**अर्थ**- हे राक्षसशत्रो गरुध्वजा रामा, मी विषय तृष्णारूप सर्पाच्या विषानें पीडित झालों असून द्रव्य द्रव्य अशा शब्दोच्चारणानीं पृथ्वी

वर रतनस्तत सर्वदा भ्रमण करीत असल्यामुळें अत्यंत संताप पावलों यास्तव आपणच स्वचरणा समीप स्थितिरूप जीवन दानानें माझ्या पापांचा नाश करून मला शीघ्र रक्षावें. यांतील गरुडध्वज या विशेषणाचा हेतू असा-की, ज्या गरुड नामक मण्याच्या योगानें विष बाधा दूर होते आणि धनलाभ-ही होऊन ताप निवारण होतें तो साक्षात् गरुड सेवकत्वें करून तुमच्या ध्वजा वर आहे तस्मात् माझ्या पूर्वोक्त विषबाधादि सर्व दुःख परिहाराविषयीं आ पणच समर्थ आहां.

तृष्णानिदाघनसंशुष्यत्कंठं निराश्रयं दीनं ॥ क-
रुणाकटाक्षवृक्षच्छाया मच्छां विधेहि मां पाहि ॥ ६९

अर्थ- पुनरपि प्रार्थना करतात कीं, मी विषय तृष्णा रूप उष्ण कालानें बहु संताप पावलों त्यामुळें माझा कंठ अत्यंत शुष्क झाला असून मला रक्षण क रणारा कोणी आश्रय नाहीं यास्तव मी दीन झालों आहें, अतएव हे रामा, आपण स्व करुणा कटाक्ष रूप शीतल वृक्ष छाया मजवर करून मला रक्षावें.

तृष्णाकल्लोलवतीविशालकल्लोलसंकुलीभूतं ॥ क
रुणापांगनिरीक्षितगुणजालैः कर्ष मां प्रकर्षेण ॥ ७०

अर्थ- पुनश्च अन्य प्रकारानें प्रार्थितात कीं, विषय तृष्णारूप महानदी सं बंधि विशाल लाटानीं मी व्याकुळ झालों आहें यास्तव हे राघवा, तुह्मी आ पल्या कृपाकटाक्षावलोकन रूप रज्जु समुदायानीं मला बलात्कारानें आ कर्षण करा.

तृष्णारूकेतुकन्याभीतं त्वां शरणमापन्नं ॥ विश्वा
मित्रंव दुर्वैविश्वार्तिविनाशनाश मां पाहि ॥ ७१ ॥

अर्थ- त्याच प्रमाणें तृष्णारूप नाटिका राक्षसी पासून भय पावून मी तु ह्मांस शरण प्राप्त झालों आहें यास्तव हे जगत् संबंधि सर्वपीडानाशक र घुनाथा आपण पूर्वी ताटिके पासून जसें विश्वामित्राचें रक्षण केलें तद्वत-या तृष्णारूप नाटिके पासून माझें शीघ्र रक्षण करावें.

तृष्णानक्रेविरुद्धं क्लेशं प्राप्तं चिरायुदेवेश ॥ करु-
णार्द्रचित्तवृत्ते गजेंद्रमिव मां समुद्धर प्रीत्यो ॥ ७२

अर्थ- पुनः आचार्य आपलें अत्यंत व्याकुलत्व प्रगट करून प्रार्थितात

कीं, विषय तृष्णा रूप नक्रानें (सुसर) मला अतिशयें आकर्षण केल्यामुळें मी बहुकाल पर्यंत दुःखपावलों आहें आणि हे देवाधिदेवा आपली निजवृत्ती करुणेनें आर्द्र आहे यास्तव आपण गजेंद्रा सारखा अत्यंत दीन वत्सल तेनें माझा उद्धार करावा.

तृष्णासुबाहुमुख्यक्ष पाचरव्रातविघ्नितं वीरे ॥ गाधिजमुनिमखमिवं मां रक्षोरे रक्ष जानकीजाने ॥७३

अर्थः- पुनः आचार्य द्योत्पादक वाक्यांनीं प्रार्थितात कीं, विषय तृष्णा रूप सुबहु प्रमुख राक्षसांच्या समुदायानें मी पीडित झालों आहें यास्तव हे विघ्ननिवारण समर्थ राक्षस शत्रो जानकी पते रक्षण समर्थ रामा, आपण विश्वामित्र मुनीच्या यज्ञासारखें माझें रक्षण करावें.

पाषाणतां प्रयातं मुनिशापेनेव पूर्वपापेन ॥ मत्तनुशल्य महल्या तुल्यतया कल्प्य रचंय कल्याणं ॥७४

अर्थः- आचार्य पुनरपि प्रार्थना करतात कीं, जसें गौतम मुनीच्या शापानें अहल्येचें शरीर पाषाणत्व पावलें तद्वत् माझी तनु जन्मांतरीय पूर्व पापाचरणानें व जडत्वानें अहल्येच्या शिलारूपदेहा समान शल्यरूपच आहे असें मानून हे उद्धार समर्थ रामचंद्रा आपण चरण स्पर्शानें पूर्वी जसा अहल्येचा उद्धार केला तसा चरण स्पर्शानें माझ्या तनुरूप शल्याचें निराकरण करून माझें चैतन्य रूप मला प्राप्त होईं असें कल्याण करा.

अधिगत कोटियुगांतं तद्गुणांशमं पापमस्माकं ॥ अंडजमंडनवाहन खंडय चंडीशचापदंडमिव ॥७५

अर्थः- आतां आचार्य स्वकीय पापाचें वर्णन शिव धनुष्याच्या रूपकानें करून त्याचें खंडन तुह्मास साहजिक आहे अशा अभिप्रायानें प्रार्थना करतात कीं, हे शोभायमान गरुड वाहन रामा, जसें धनुष्य दोन्ही टोकें समांतर आणून तें दोरीनें बांधून सज्ज केलेलें असतें तद्वत् माझें पाप- अनेक कोटियुगांत संपादन केलेलें असून त्यांत तमोगुण अतिशयें व्याप्त आहे. यास्तव आपण अशा माझ्या पापाचा शिव धनुष्या सारखा नाश करावा. ७५

निर्भूपी कृतभूतलमर्जनयेशसोंतकंसकंपस्य ॥

कुरु दैन्यमेलकं मे कुंठितं गति मीशं जामेदग्न्यमिव ॥७६॥

अर्थ- आचार्य पुनरपि प्रकारांतरानें स्तुति करितात कीं, निःक्षत्रियपृथ्वी करणारा असून कंपयुक्त सहस्रार्जुनाच्या यशाचा नाशक अशा परशुरामा प्रमाणें हे दैन्य निराकरण समर्था रामा माझ्या दरिद्र समूहाची गति कुंठित करा.

मृगजलबुद्धि समृद्धं निदाघतप्तं न मेरुणा पूर्णं ॥ वनमिव मानसमुच्चैः प्रविश रघूत्तंस सप्रिया वरज ॥७७॥

अर्थ- हे रामा, तुह्मास वनवासा विषयीं अति हर्ष जर आहे तर माझें अंतःकरण वन तुल्यच आहे यास्तव आपण त्यांत प्रवेश करावा. अशा आशयानें आचार्य विज्ञापना करतात कीं, जसें अरण्य मृगजलानें पूर्ण असून उष्ण मासीनें तप्त व न मेरु नामक तृण विशेषानें पूर्ण असतें तसें माझें मानस अन्यथा भासरूप बुद्धीनें व्याप्त असून अध्यात्मिकादि तापत्रयानें संताप पावलेलें व मेरुनामक सुवर्ण पर्वतानें युक्त नाहीं अशा माझ्या मानसरूप वनांत हे रघुकुल भूषणा आपण सीता व लक्ष्मण यां सह उत्तम रीतीनें प्रवेश करा. अशी प्रवेशा विषयीं प्रार्थना सर्व व्यापक परमात्म्यास संभवत नाहीं यास्तव प्रार्थनेंतील भाव असा कीं, माझ्या हृदयांतील अज्ञानरूप आवरणाचा नाश करा ह्मणजे आपण नित्य प्रगट आहांच.

आपदि मां स्मरतीति प्रायो न करोषि संपदं मन्त्र चेत् ॥ स्मृत्या मदीयया ते भविता किमिवाधिकं रघूत्तंस ॥७८॥

अर्थ- हे रघुकुल भूषणा दरिद्री प्रायः आपत्कालीं मज सर्वेश्वरास स्मरतो यास्तव तुह्मी मला संपत्ति युक्त करीत नाहीं असा आपला आशय असेल तर त्या विषयीं मी विज्ञापना करतों कीं, मी तुमचें स्मरण केलें असतां त्या पासून तुह्मांस अधिक लाभ काय आहे? किमपि नाहीं.

अपनेय दैन्य मुदग्रं परिहर चिंताञ्चयं समग्रं मे त्वन्मुखवीक्षा भिन्नं यत्नं न करोमि कर्हिचिद्रा-

म ॥ ७९

अर्थ- आणि आपण केवळ निर्निमित्त दयालु स्वभाव आहां यास्तव भजनादिकाच्या अपेक्षे वांचून सर्वांवर दया करणें तुह्मांस उचित आहे या आशयानें आचार्य प्रार्थना करतात कीं, हे रामा माझें महा दारिद्र्य हरण करा व समग्र चिंता समुदायास दूर करा. परंतु तूं या दारिद्र्यचिंता परिहारार्थ इतरास शरण जा असें कदाचित् आपण ह्मणाल तर त्या विषयीं माझा निश्चय असा आहे कीं, मी स्वसंकट निवारणार्थ तुमच्या मुखार विंदा व लोकना वांचून अन्य यत्न कदापि करीत नाहीं.

मम नाशयाधिवार्धिं क्षमस्व विविधापराधसंबंधं ॥ शरणागतजनवत्सल राघव शरणागतोस्मि ते दासः ॥ ८० ॥

अर्थ- माझ्या मानस संबंधीं व्यथारूप समुद्रानें शोषण करा. आणि अनेक प्रकारच्या अपराधांच्या संबंधानें झालेल्या अंतःकरण विक्षेपाची क्षमा करा. कारण हे राघवा आपण शरणागत जनां विषयीं कृपा करणारे आहां यास्तव मी तुमचा दास असल्यामुळें तुह्मास शरण प्राप्त झालों आहें.

दशशतकरवंशभवे दशरथपृथ्वीशपूर्वपुण्यौघे ॥ दशवदनांतक रूपे चेतश्चिरं मास्व राघव भूपे ॥ ८१ ॥

अर्थ- त्याच प्रमाणें सहस्त्र किरण जो सूर्य त्याच्या कुलांत उत्पन्न झालेला असून दशरथ नामक सार्वभौम राजाच्या जन्मांतरीय पुण्याचा केवल राशि रूप व दशाननाचा नाशक अशा राजश्रेष्ठ रामचंद्राच्या ठिकाणीं हे मना तूं निरंतर वास कर आणि त्या रामास सोडून अन्यत्र कोठें ही जाऊं नको.

किं नवेस्कृतधनजायामायामयरूपचिंतयार्थ्यनया ॥ अनपायानंदमये किं मये रमसे न राघवे चेतः ॥ ८२ ॥

अर्थ- कारण मिथ्याभूत विषयांच्या चिंतनानें आपली पुरुषार्थ सि

द्धि होन नाहीं अशा आशयानें आचार्य प्रार्थना करतात कीं, हे अंतःकरणा तु-ला पुत्र, धन, भार्या इत्यादिक प्रत्यक्ष अनुभवलेल्या मायामयरूप पदार्थांच्या चिंतनें करून कायफल आहे किमपिनाहीं तस्मात् हे चित्ता तूं अक्षय्य आनंदमय स्वरूप राघवाच्या स्वरूपीं कां रमत नाहींस.

त्यज निजगजवाजिकथां भज भज जठरे जगोद्वहं तमजं ॥ तत्प्राप्स्या नूनं चेतः प्राप्स्यसि सकलं न चेत्प-रीत्येन ॥ ८३ ॥

अर्थ- पुनः आचार्य चित्ताची प्रार्थना करतात कीं, हे चित्ता तूं स्वकीय गज व अश्व इत्यादिकांच्या वार्तेचा त्यागकर आणि आपल्या उदरांत सकलजगास धारण करणारा असून स्वतःजन्मादिदोषरहित अशारामास परमादरानें भज; कारण हे चित्ता तूं रामचंद्राच्या प्राप्तीनें सर्वकाम प्राप्तीला निश्चयें करून पात्र होशील आणि रामास सोडून केवल विषय चिंतनच जर करशील तर तुला सकल मनोरथसिद्धि प्राप्त होणार नाहीं.

हितमात्मनं वांछसि चेत् तन्मंजूषां गृहाण रामाख्यां ॥ नोचेच्चंचलशीलैर्वंचितो मसि चित्त दुर्जयैर्विषयैः ॥ ८४

अर्थ- पुनरपि आचार्य चित्ताची प्रार्थना करितात कीं, हे चित्ता, तूं स्वहिताचीच इच्छा करशील तर रामनामरूप प्रसिद्ध मंजूषेचें ( पेटी ) सेवन कर. आणि असें रामनामाचें सेवन न करतां चंचल स्वभावयुक्त यत्नानींही पराजित होण्यास अशक्य अशा धनादिक विषयानीं प्रतारणा पावलेंस असें असून तूं जर त्यांविषयांविषयीं आसक्त होशील तर तेणें करून अनर्थ समूहांत बुडशील.

कर्तुं मकर्तुं शक्तः सकलं जगदेतदन्यथा कर्तुं ॥ य-स्तं विहाय रामं कामं माधेहि मानसान्यस्मिन् ॥ ८५ ॥

अर्थ- याजगास उत्पन्न करण्या विषयीं किंवा उत्पन्न न करण्यास अथवा हें विश्व विपरीत करण्यास समर्थ जो राम आहे त्यास सोडून हे मानसा तूं आपला अभिलाष इतरांवर करूंनको; कारण ईश्वरा वांचून अन्य त्र होणाऱ्या आसक्ततेनें तुझी इष्टसिद्धि होणार नाहीं.

दारिद्र्यदावशांत्यै वर्षतु करुणा कटाक्षनीराणि ॥-

नित्यांकस्थितविद्युत् कश्चिद्वैकुंठमंडनो मेघः ॥ ८६ ॥

अर्थ- निरंतर वामांकीं स्थित जी विद्युल्लतारूप सीता तिणें युक्त असून वैकुंठास भूषण भूत असा श्रीरामचंद्ररूपी कोणी एक मेघ स्वकरूणारूप उदकाची वृष्टि आमच्या दारिद्र्य नामक दावाग्नीच्या शांत्यर्थ करो.

स्मेरमुखांबुजमुद्यन्नवनीरदनीलमिंदिरागेहं ॥ परिहरतु दुःखजालं तेजः किमपीनवंशसंभूतं ॥ ८७

अर्थ- पुनरपि प्रार्थना करतात कीं, सुंदरमुखकमल युक्त असून उदयास आलेल्या सजल मेघासमान श्यामवर्ण व लक्ष्मीचा निवास स्थान भूत असें जें सूर्य वंशोद्भव रामचंद्राख्य कांहीं एक तेज तें आमचें दुःखजाल दूर करो.

शरयूतीरपुरेशे सुरेशगिरिशादिपूज्यपादपीयूषे ॥ वैदेहीहृदयेशे मम भक्तिरिहास्तु मानुषे वेषे ॥ ८८ ॥

अर्थ- शरयू नदीतीरींच्या अयोध्या नगराचा प्रभु असून इंद्र व शंकर यानीं ज्याचें चरणामृत निरंतर पूज्य आहे अशामायेनें मानुषवेष धारण करणाऱ्या राघवरूप सीतापति विषयीं माझी भक्ती असो.

दशरथनंदननाम्ना चंदनधामाभिनंदनो रमतां ॥ रमयतिमदीयमुदितः कश्चन मोदो हृदंतरं दांतं ॥ ८९

अर्थ- दाशरथी नामानें प्रसिद्ध असून शीतल कांतीनें युक्त आणि ज्याचें दर्शन झालें असतां रममाण होणाऱ्या भक्तजनांस आनंदकारक असा प्रगट होणारा निजानंदरूपी रामचंद्र माझ्या हृदयांत प्रगट होऊन माझ्या शुद्धांतःकरणास आल्हादयुक्त करीत आहे.

रामाभिधाभिरामो श्यामा मे मानसं समासाद्य ॥ मैत्री कापी धरित्रीपुत्री प्राचीनधर्मलब्धास्ते ॥ ९०

अर्थ- आतां आचार्य स्वहृदयांत प्रगट झालेल्या सीतायुक्त रामाचें रूप वर्णितात कीं, नीलकमलासमान श्यामसुंदर असून पूर्वपुण्यानें प्राप्त झालेली अशी कोणीएक अपूर्व मैत्री रूप रामनामक व धरित्री कन्या सीता हे उभयतां माझ्या मनांत प्राप्त होऊन राहिले आहेत.

वामांगसंगिविद्युन्मालं नीलं विलंघितानंगं ॥ दशरथपूर्वजपुण्यं पश्यत पीयूषपूरितापांगं ॥ ९१ ॥

अर्थ- सर्व अलंकार युक्त व विद्युल्लते समान अशा वामांग स्थित सीतेनें शोभायमान असून स्वयें मदनास तिरस्कृत करण्या सारखा श्यामसुंदर व अमृत पूर्ण दृष्टीनें अवलोकन करणारा अशा दशरथाच्या पूर्व सुकृत रूप रामास अवलोकन करा.

अनिलतपःफलमग्रे पृष्ठे स्नेहं सचामरच्छत्रं ॥ पार्श्वे
भक्तिविशेषौ मध्ये तडिदंबुदावहं वंदे ॥ ९२॥

अर्थ- आतां आचार्य पंचायतनयुक्त रामास नमस्कार करतात कीं, अग्रभागीं वायूच्या तपाचा फलरूपी हनुमान् पृष्ठभागीं छत्र चामर धारण करणारा स्नेहयुक्त लक्ष्मण, तसेच वाम व दक्षिण यादोन्ही बाजूंस अतिशयित भक्तियुक्त भरत, शत्रुघ्न आणि मध्यभागीं विद्युल्लते सारखी सीता व सजलनील मेघासमान रामचंद्र अशारामास मी नमस्कार करितों.

इंदीवरदलनयनं जलदावलिमंजुमंजुलापांगं ॥ मंदीकृतदशवदनं तंदीनमहोदयं जयं वंदे ॥ ९३॥

अर्थ- आणि नीलकमल पत्रासमान नयनानीं शोभायमान असून सजल मेघपंक्ती सारखा सौंदर्य युक्त सुंदर नेत्र कटाक्षानीं अवलोकन करणारा, भक्तरक्षणार्थ अवतार घेऊन रावणास पराजित करणारा अशा नित्य जयस्वरूपि रामचंद्रास मी नमस्कार करितों.

वामे कांचनवल्ली सल्लीलोन्यत्र कांचनो विटपी ॥ विलसंति मानसकमले मध्ये हरिनीलकंदलोद्रेकः॥ ९४

अर्थ- वामभागीं मूर्तिमती सुवर्ण लता सीता आणि दक्षिणभागीं सुवर्णासमान पीतवर्ण लक्ष्मण या उभयतांच्या मध्यभागीं विलासयुक्त असून इंद्रनील मण्यापेक्षां अधिक श्यामसुंदर कांति शोभित असा कल्पवृक्ष तुल्य राम माझ्या हृदय कमलांत सर्वोत्कर्षानें शोभत आहे.

कमलायमाननेत्रां ममलायत बाहुसंगिकोदंडां ॥
शमलावण्यधरित्रीं जननीं पुंवेषधारिणीं वंदे ॥ ९५ ॥

अर्थ- आचार्य पुनरपि जननी रूपानें स्तुति करतात कीं, कमलासमान नेत्रानीं युक्त असून निर्मळ लंबायमान बाहूंच्याठिकाणीं कोदंड धनुष्यानें युक्त व शांतिरूप उत्तम लावण्य धारण करणारी अशी पुरुषवेष धारण क

रणारी जी रामचंद्ररूप जननी तिला मी नमस्कार करतों.

पत्तिः शरधनुषाढ्या संपत्तिर्योगयोगिना मीड्या ॥
स्फुरति क्षपितविपत्तिः कांचन विन्निर्ममो निशं चित्ते ९६

अर्थ- बाण धनुष्यानीं युक्त असून पायानीं संचार करणारी आणि समाधियोग निपुणानीं स्तुति करण्यास योग्य व भक्तजनांच्या दैन्याचा नाश करणारी अशी भाग्यपूर्ण रामचंद्ररूप कांहीं एक अपूर्व ज्ञानावस्था माझ्या चित्तांत अहोरात्र स्फुरद्रूप होत आहे.

हीरमनोहरदशना दशशतकरवंशभूषणं रचना ॥
कांचन काचमणीनां लीलानिलयं मनः कुरुते ॥ ९७

अर्थ- हिऱ्यासमान सुंदर दंत शोभित असून सूर्यवंशास भूषणरूप अशी कांहीं एक नीलमणि राशितुल्य क्रीडास्थानभूत रामचंद्र मूर्तिच माझें मन चिंतन करीत आहे.

तूणीकवचकृपाणीविशिखासनबाणमंजुलापांगी ॥ वेणी कापि गुणानामेणीदृगुपांतचारिणी जयति ॥ ९८ ॥

अर्थ- आणि बाणांचा भाता, कवच, खड्ग, धनुष्य व बाण यानीं युक्त असून सुंदर अवलोकन करणारी दंडकारण्यांत हरिणीच्या दृष्टीपुढें संचार करणारी अशी सर्व गुणानीं गुंफलेली रामचंद्ररूप कोणी एक अद्भुत वेणी लोकांत सर्वोत्कर्षानें वर्तत आहे.

आनननिर्जितचंद्रा सांद्रानंदैकभूमिरुन्निद्रा ॥ रमयति विगलितनंद्रा रावणविद्रोविणी मुद्रा ॥ ९९

अर्थ- त्याच प्रमाणें स्वकीय मुखानें चंद्र पराजित केला असून परिपूर्ण आनंदाची केवल अधिष्ठानभूतच आणि स्वयं प्रकाश व रावणवध करणारी अशी नित्योत्सवरूप रामचंद्रमूर्ति माझ्या मनास आल्हाद उत्पन्न करीत आहे.

पाथोधिबद्धसेतुं नक्तंचरनाशपिशुनसत्केतुं ॥ आपदमंतनेतुं कंचिच्चिन्मोदकंदलं वंदे ॥ १०० ॥

अर्थ- तसाच समुद्रांत सेतु बांधणारा असून राक्षसांच्या नाशाविषयीं

सूचक उत्तम ध्वजरूपी अशा कोणी एक अपूर्व चैतन्य हर्षकंदरूप रामचंद्रास विपत्ति नाशार्थ मी वंदन करितों.

अभिनवपल्लवशयनां शयनांतर्निविष्टविद्युल्लासां ॥ कांचननिकुरंबांकस्थितशिरसं कांचिदर्थये लीलां ॥ १०१ ॥

**अर्थ-** नूतन कोमल वृक्षपल्लवांवर शयन करणारी असून शय्येवर बसलेल्या विद्युल्लते समान सीतेला प्रेमास्पद असून आणि सुवर्ण दर्पण तुल्य सीतेच्या अंकावर जीणें स्वमस्तक स्थापन केलें आहे अशा त्या कोणी एका शृंगार लीला रूप रामचंद्रमूर्तीला मी प्रार्थना करतों.

कुटिलाशयविषवल्लीं जटिलां निबिडोल्लसच्छ्रमांबुकणां ॥ वल्कलकल्पितवसनां रावणवधवासनां मुदा वंदे ॥ १०२ ॥

**अर्थ-** कुटिलजनांच्या अंतःकरणाची नाशक विषलतारूप असून जटा मुकुटानें मंडित आणि निबिड ( दाट ) उत्तम शोभणाऱ्या श्रमोत्पन्न जलतुषारानीं युक्त, वल्कलरूप वस्त्रें परिधान करणारी व रावण वधाविषयीं वासना धारण करणारी अशा राममूर्तीला मी अति हर्षानें वंदन करतों.

अकपटपटुकपिकटकां नटकामितयाभिनीतवैकूब्यां ॥ तदुचितमुपचारचयं रचयंतीं कांचिदर्थये मायां ॥ १०३ ॥

**अर्थ-** तशीच जी निष्कपट कुशल वानर सेनेनें युक्त असून नटा समान भाव दर्शविण्याच्या इच्छेनें जिणें स्वकीय व्याकुलता दर्शविली व त्या व्याकुलतेला योग्य अशा प्रकार समूहास करणारी अशी जी कोणी एक रामचंद्राख्य अद्भुत माया शक्ति तिला मी प्रार्थितों.

अंबरमणिकुलभूषां शंबररिपुवैरिभक्तिमंजूषां ॥ कामपि कामपिकानां रसाललतिकां निकाम मवलंबे ॥ १०४ ॥

**अर्थ-** त्याच प्रमाणें सूर्यवंशास भूषणरूप असून मदन नामक शंबरासुराच्या शत्रूचा जो रिपु शंकर त्याच्या भक्तीची केवळ मंजूषाच आणि ध-

र्म, अर्थ, काम व मोक्ष एतद्रूप कोकिल पक्ष्यांस आम्रलतारूप अशा राम
चंद्ररूप कोणी एक रुतेचा मी अतिशयें आश्रय करतों.

सुरसरिदवरजचंचच्चामरकरसोदरादरानुगतं॥
कंचिंदुदंचितचंपकचैलं शैलं सुनील मवलंबे॥१०५

अर्थ:- आणि भागीरथी सारखें शुभ्रवर्ण युक्त चामर हस्तांत ग्रहण केले-
ल्या लक्ष्मण बंधुसहित असून किंचित् प्रफुल्लित चंपक पुष्पा समान पीतांब
र परिधान करणारा सजल मेघासमान श्यामसुंदर अशा पर्वत रूप रामचं
द्राचा आश्रय उत्तम प्रकारें मी करतों.

आकर्णकृष्टचापं वर्षंतंबाणरेष्टिमुत्तापं॥ वंदे-
योगिदुरापं कंचन हुंकारसुंदरं कोपं॥१०६॥

अर्थ:- आकर्ण पर्यंत धनुष्याचें आकर्षण करून शत्रूंच्या मस्तकांवर उत्त
म बाणवृष्टि करणारा असून योगिजनांसही क्लेशानीं प्राप्तहोणारा व हुंकार
शब्दानें सुंदर असा अपूर्व कोपरूप कोणी एक जो रामचंद्र त्यास मी नमस्का
र करतों.

खंडितहरकोदंडा ब्रह्मांडकरंडमंडनीभूता॥ वै-
देही गलमाला विलसति नीला विभक्तांगी॥१०७

अर्थ:- आणि जिणें शिव धनुष्याचीं शकलें केलीं असून जी ब्रह्मांडरूप क
रंड्यास भूषणा प्रमाणें शोभविणारी अशी जानकी रामाच्या कंठांत नीलम
ण्यांच्या मालेसारखी शोभत आहे व तिच्या ठिकाणीं भक्तांचापक्षपात विशेषें
करून आहे.

धनुषो रिपुजयजन्मुषा रुचिरनराकारे निर्जितां-
बुधरा॥ तरुणारुणनिभचरणा काचन करुणा रु-
णद्धि मैत्हृदयं॥१०८॥

अर्थ:- शत्रु पराजय करणाऱ्या धनुष्यानें युक्त असून अति सुंदर आकृती-
नें जिणें सजल मेघ कांति पराजित केली आहे आणि आरक्त वर्ण चरण कम-
लानीं सुशोभित अशी अद्भुत करुणारसरूप राममूर्ती माझ्या हृदय कमलां
त आसमंताद्भागीं व्याप्त होऊन राहिली आहे.

मुद्गलाचार्यकृत आर्या समाप्त.

# मोरोपंत कृत.

## द्रौपदी वस्त्र हरणाख्या

### आर्या.

अंध-सुत ह्मणे विदुरा कृष्णा दासी सभेसि आणावी ॥
गृह-संमार्जन करणें हे सेवा तीस योग्य जाणावी ॥ १

विदुर ह्मणे शस्त्र बधी गिळितां तत्काळ बोकडाला हें ॥
तें सूंचि कर्म करिसी रे मंद न मृत्यु रोकडा लाहें ॥ २

हरिच्या[1] पुनः पुन्हा कां काड्या नाकांत घालिशी शशका[2] ॥
यश काय पक्षि-पतिचें[3] येइल हे चार करूनि तुज मशका ॥ ३

ब्रूयात् क्षमी गभीरो ऽसौति बतं युधिष्ठिरं प्रभं को न ॥
निज नीचपण प्रकटिसि तूं श्वान भल्यावरीहि भुंकोन[4] ॥ ४

पांडव किमपि न वदती तूं वदसि सभेंत शब्द घाणेरे ॥
हे सकळ खळ-तिळांचे रगडुनि करणार पिष्ट घाणे रे[5] ॥ ५

दुर्योधन हित कथितां धिक्कार तुला असो असेंच वदे ॥
ज्वरिता जसें ससित-पय सहूच न न दुर्जना तसें चव दे[6] ॥ ६

कल्यंश[7]-खळ-शिरोमणि कपट-पटु कटु-स्वभाव सहेषी ॥
तो प्रातिकामि-नामक सूतातें[8] द्रौपदी प्रति प्रेषी ॥ ७

सूता जा कृष्णेला घेउनि ये भय नसे तुला लेश ॥
सर्वज्ञ न किंचिज्ज्ञ क्षत्ता[9] ब्रह्मा नव्हे कुलालेश ॥ ८

बहु कातर[10] विदुर सदा वट वट करितो अशीच हा नीच ॥
या रवोट्याला गमते जी अस्मत् वृद्धि ती स्वहानीच ॥ ९

जाउनि तो सूत वदे कृष्णे द्यूतांत तूं स्वयें धर्में ॥
हारविलीस सुयोधन-सदना-प्रति ये करावया कर्में ॥ १०

---

+ रे मंदा मृत्यु रोकडा लाहे . असाहीपाठ आहे . १ सिंहाच्या . २ ससा . ३ गरुडाचें . ४ भुंकोन. ५ आहेस असें . ६ रवेदोद्गार . ७ कलीचा अंश . ८ नामविशिष्ट दूत . ९ विदुर . १० अधीर .

हें वाक्य त्या सतीतें बहु दुःसह जेविं वज्र कदलीतें ॥
परि परिसावें धैर्यें त्यासी जें ती स्फ-बुद्धि वदली तें ॥ ११
सूता काय वदसि हें द्यूतीं हारविति संपदेतें गा ॥
श्री ह्मणा न स्त्री ह्मण हें त्वद्वचन मनास कंप देतें गा ॥ १२
सूत ह्मणे आधीं श्री मग साऽत्मज-बंधु-मंडळी धर्में ॥
हारविली निजमूर्ती द्यूतीं स्त्री शेवटीं असत्कर्में ॥ १३
राज्ञी ह्मणे तरि अगा जा पूस सभेंत तूं असें आर्या ॥
राजेंद्रा हारविली प्रथम द्यूतीं स्व-मूर्ति कीं भार्या ॥ १४
सूत सभेंत विचारी धर्मातें कीं असें पुसे आर्या ॥
राजेंद्रा हारविली प्रथम द्यूतीं स्व-मूर्ति कीं भार्या ॥ १५
धर्म न कांहींच वदे तों दुर्योधन ह्मणे सभेस तिनें ॥
यावें स्वयें पुसावें जें पुसणें योजिलें तिच्या मतिनें ॥ १६
कृष्णोप्रति सूत ह्मणे देवि न कांहींच धर्म वदला गे ॥
जाणों सभाऽसदांसहि कठिन त्वत्प्रश्न-वाक्य-पद लागे १७
दुर्योधन वदला कीं त्वांचि पुसावें सभेंत डोलेल ॥
त्वत्प्रश्न-श्रवण स्फुरें तुज पाहुनियां यथार्थ बोलेल ॥ १८
बहुधा सभेंत तुजला नेईल क्षुद्र-बुद्धि गांजाया ॥
नसतां उपाय कांहीं आग्रह करिशील तूंहि कां जाया ॥ १९
कृष्णा ह्मणे समर्थ न कोणी ही स्फुज्ञ भावि टाळाया ॥
जेविं विधु राहु येतां पर्वीं आत्म-प्रभा विटाळाया ॥ २०
रक्षील धर्म समयीं धरिती त्याचाचि भरवसा स्फ-कवी ॥
आर्जविला असतां तो स्वजन-व्यसनाशि निश्चयें चुकवी २१
भरत-कुल-धर्म न बुडो सभ्यांला पूस एकदा जागा ॥
तन्मत मान्य मला कीं नयें तच्चित्तीं असे सदा जागा ॥ २२
पुनरपि सभेंत जाउनि सूत ह्मणे सभ्यहो तुह्मांस सती ॥

---

१ पुत्रांसहवर्तमान. २ द्रौपदी. ३ हलक्या बुद्धीचा दुर्योधन. ४ दुःखासि.
५ न्याय. ६ जागृत.

द्यूतांत मी जिता कीं अजिता ऐसें मदाननें पुसती ॥ २३

दुर्जन-दुराग्रहाचें ज्ञाते सभ्यहि न पाहती च वर ॥
तेथें उत्तर कैंचें न चलेसें न वदती कवि-प्रवर ॥ २४

जाणुनि संकट धर्मे दूत-मुखें कळविलें स्व-जायेतें ॥
कीं श्वशुरासि शरण ये गुरु कवच व्यसन उग्र जो येतें ॥ २५

सभ्य न वदती कांहीं पांडवही मूक-बधिर-सम गमती ॥
पाहुनि असें सुयोधन बोले जो सत्पथोपरम-ग-मती ॥ २६

तीतेंचि आण जा रे ती कां स्व-मुखें पुसे न येऊनी ॥
सभ्य-जनीं हित-पृच्छक सीतो ऽ तेंहि कोण गा नये ऊनी ॥ २७

सभ्यानीं प्रश्नोत्तर योजावें नीट कीं न योजावें ॥
आर्ते वैद्य-गृहाला गुण यो कीं मात्कनें न यो जावें ॥ २८

मत्तें श्व-यूथपें श्वा सिंहीप्रति धाडितां धरायाला ॥
जाईल कसा तैसा सूतहि भी कर्म तें करायाला ॥ २९

तांतड करी सुयोधन परिसूत पुन्हा ह्मणे अहो सभ्य ॥
काय वदों प्रश्नोत्तर कृष्णोला कां न होय हो लभ्य ॥ ३०

कोपें ह्मणे सुयोधन भीतो भीमासि सूत हा भितरा ॥
दुःशासना स्वयें जा आणतिला कर्म हें नव्हे इतरा ॥ ३१

तो हरिणी-ग्रहणा ऽर्थी अत्युग्र-प्रकृति लांडगा साच ॥
गेला तेंचि कराया दुःशासन दुष्ट दांडगा साच ॥ ३२

कृष्णेशि ह्मणे चाल द्यूतीं तुज जिंकिलें मज कुरूतें ॥
कुरु-पतिस पहा लज्जा त्यज सेवावें तुवां शत-गुरूतें ॥ ३३

त्या-दुष्टोक्ति-श्रवणें धर्माची संकटीं पडे जाया ॥
संरक्षणा ऽर्थ धांवे धृतराष्ट्राच्या स्त्रियां-कडे जाया ॥ ३४

पळतां धांवोनि तिला त्यां केशांनें धरूनि आकर्षी ॥
ज्यां राजसूय-यज्ञीं अभिषेकिति बहु महर्षि नाकर्षी ॥ ३५

कृष्णा ह्मणे सभेंत न न्यावें मज मी रजस्वला आंगा ॥

---

१ माझ्यामुखें. २ कविश्रेष्ठ ३ ज्याम ४ सन्मार्गनाशाविषयीं बुद्धि करणारा. ५ थंडीनें पीडित. ६ रोग्यानें ७ श्वानसमूह पालकानें. ८ दुर्योधनानें. ९ स्वर्गस्थ ऋषि

आच्छादन एकांऽबर नेतोसि असीस आग्रहें कां गा ॥ ३६
दुष्ट ह्मणे स्वसमेला तुजला नेतोंचि दूरसी असकीं ॥
एकांऽबरा अस तुझीं अगें नग्नें असोत कीं असकीं ॥ ३७
देवी ह्मणे अनाऽर्या नाहीं तुझिया मनांत पापें-दर ॥
ओढूं नको फरफरां घेऊं दे सांवरूनियां पदर ॥ ३८
अधम ह्मणे द्यूत-जिता दासी तूं लाजसी कशाला गे ॥
चाल उगीच प्रभेशीं हट करितां पाठिशीं कशा लागे ॥ ३९
कृष्णा ह्मणे पति कसें पाहुनि हें कर्म साहतील न द्या ॥
पद सर्प-शिरीं तुमच्या रक्ताच्या स्पष्ट वाहतील नद्या ॥ ४०
गुरू-जन-सभेंत कैसा नेसी ओढूनि काय हा नीचा ॥
करितोसि कर्म दुष्टा भास्यर्थ बळेंचि काय हा नीचा ॥ ४१
धर्म परम-सूक्ष्म असे धर्माऽत्मा धर्म नृप नसे चुकला ॥
सावध व्हा कंठीं यम- पाश कसे घालितां अहा उकला ॥ ४२
ओढुनि सभेंत नेली तेव्हां ती द्रौपदी ह्मणे कुरुची ॥
कीर्ति बुडाली हा धिक् कुरु-वृद्धांलाहि मानली कु-रुची ॥ ४३
हा भीष्म द्रोण कसें न ह्मणति हे सहज-मित्र सत्व रहा ॥
अन्यायें बुडणार व्यसनीं कुरु-राज-वंश सत्वर हा ॥ ४४
अन्यायाऽचल-भिदुरें विदुरें अनवरत-शत्रु-सत्व-रतें ॥
जाऊं दिलें कसें जें गेलें सोडूनि सख्य सत्वर तें ॥ ४५
कारुण्य-रसें भरले होते जे दुर्बळाशि उद्धरिते ॥
झाले कसे अकस्मात् ते केवळ कुरु-गुरु प्रबुद्ध रिते ॥ ४६
प्रेरियले भेदाया पति-धैर्य-द्विरद-कट कटाऽक्ष तिनें ॥
प्रथम न ह्मणती श्रीच्या ह्मणती स्त्रीच्याचि कटकटा क्षतिनें ॥ ४७
पेटे पांडव-कोपाऽनल कृष्णा-दृष्टि होय तद्धमनी ॥
करितील काय होते निज-मर्यादा-गुणेंचि बद्ध मनीं ॥ ४८
दुःशासनाशि ह्मणती भीमाऽदिक निज-मनांत हे बोल ॥

---

१ अधमा. २ पापभय. ३ चाबूक. ४ नाशाच्या. ५ उलगडा. ६ अन्यायरूप पर्वतास वज्रतुल्य. ७ सर्वदां शत्रुसत्वनत्पर. ८ ज्ञानसंपन्न. ९ गजगंडस्थळ. १० दुःखोद्धार. ११ नाशानें. १२ मूर्खदुर्योधना

हूं सस-सर्पिणीतें मेली मानूनि बोट हे बाले ॥ ४९
केश धरूनि दुःशासन तीस बळें फिरफिरोनि दे हिसके ॥
भावि-तमः प्रशमीं न क्षमही होऊन तेज देहिं सके ॥ ५०
दासी दासी ऐसें असें रूत् तो खळ ह्मणे स-हासें तितें ॥
जाणों क्षमाऽस्ति सिकवी जेंजें अरि करिल तूं सहा सति तें ॥ ५१
दासी दासी ह्मणतां दुर्योधन कर्ण शकुनि मानवती ॥
हांसति खळ सभ्य रडति दुष्टें छळतां सभेंत मानवती ॥ ५२
गांगेय ह्मणे सुभगे धर्म परम-सूक्ष्म यास्तव स्पष्ट ॥
ऐसेंचि असें मजला वदवेना हा विचार बहु-कष्ट ॥ ५३
वदला जितोऽस्मि ऐसें धर्म शकुनिनें तयावरि स्व-मतें ॥
पण करविला तुझा या - वरूनि तरि न तूं जिता असें गमतें ॥ ५४
द्यूतांत परस्व-पण स्थापाया निस्व-जन नव्हे शक्त ॥
स्त्रीचें भर्तृवशत्वहि पाहोनि न मी वदों शकें व्यक्त ॥ ५५
कुरु-वृद्ध असें बोले उपहासें ताप ते कितव देती ॥
सभ्यांसि निर्णयार्थ प्रार्थुनि पुनरपि अशंकित वदे ती ॥ ५६
द्यूतीं अनति-निपुण-नृप कितवांनीं आणिला बळेंचि कसा ॥
दाऊनि कर्पूर जसा घालावा लोचनीं बळें चिकसा ॥ ५७
केलें तसेंचि हरिलें कपटें सर्वस्व शेवटील पणें ॥
नृप जिंकिला शकुनिनें याला नरकींच शेवटीं लुपणें ॥ ५८
केलें स्व-परिभवांत द्यूत पुन्हा भूप लाउ दार-पण ॥
या बुद्धिनें शकुनिनें दोखविलें आपुलें उदारपण ॥ ५९
ऐसें असतां द्यूतीं अजिता मी कीं जिता करा सवदा ॥
पुण्याचा पुशिलें हें सत्य पहा जोडितें करास वदा ॥ ६०
कुरु-गुरु-वचन तसें जरि संदिग्ध वदाल तरि न भागावें ॥
अजि सभ्य हो जरि गुरुहि न हरी संदेह तरि नभा गावें ॥ ६१
न वदे कोणीहि किमपि दुःशासन घाबरी करी तीतें ॥

---

१ उत्तेजन देणें. २ केश. ३ पुढें भास होणाऱ्या दुःखशांति विषयीं. ४ समर्थ. ५ वारंवार. ६ हास्यसहित. ७ क्षमासखी. ८ सन्मान योग्य. ९ दरिद्री. १० कपटी. ११ न अति निपुण. १२ पराभव. १३ स्त्रीपणा.

तद्वीति सम कवि ह्मणो ग्राम-हरीच्या बरीके रीतीतें ॥ ६२
तें पाहुनि भीम ह्मणे राया आह्मां-समक्ष कृष्णेची ॥
हे दुर्दशा बरी कीं पूर्ति असे कीं न अक्ष-तृष्णेची ॥ ६३
आहेत कितव पुष्कळ पुष्कळ त्यांच्या गृहांत बटकीही ॥
स्नेहें तेंहि न त्यांतें पण करिति मदुक्ति काय लटकी ही ॥ ६४
श्री बुडविली महेंद्र- श्री-तुल्या मज इची नसे परवा ॥
परें वामलोचनेच्या ऐकों न शकेंचि या विलाप-रवा ॥ ६५
या साध्वीस न दुःखद परकरचि तुम्हां स्व-कीर्ति-हानि कर ॥
हा निकर पातकाचा कैसा केला खळें महा-निकर ॥ ६६
रे सहदेवा सत्वर पुष्कळसा अग्नि आण जाच कसा ॥
जाळूं याचे हे कर आह्मां हा सोसवेल जाच कसा ॥ ६७
श्वेताऽश्व ह्मणे बापा भीमा जीमाजि वास अशिवाचा ॥
केवळ बाळपणींही वदलासि न तूं कधींहि अशि वाचा ॥ ६८
द्यूतीं स्व-धर्म गौरव - धन बहुधा त्वांहि सर्व हारविलें ॥
उत्कांत तें दिसेना लेश जसें भित्ति-चित्र सारविलें ॥ ६९
क्षात्र-व्रत स्मरोनि द्यूतीं पाचारिलें ह्मणुनि आला ॥
व्यसनी स्वयें नव्हे हा आर्य अतिक्रमिसि कां बुधा याला ॥ ७०
सद्गुण स्र-सेव्य हा गुरु- देव-प्रिय यासि जेविं हार उनीं ॥
घालिसि तापांत कसा गति कोण पुढें स्व-सत्व हारउनी ॥ ७१
आह्मां व्यसनाऽर्तांची धर्म-स्थिति हेचि बाज पावें गा ॥
त्वां मोडावें न इला स्व-स्वास्थ्य-सुखार्थ बा जपावें गा ॥ ७२
हें काय बरें या-गुरु- घातें रिपु परम-मुदित होतील ॥
स्व-मुखीं विष अमृत-रस व्याळ-मुखीं कोण सुज्ञ ओतील ७३
भीम ह्मणे न विनवितें जरि फार असेंचि मनहि कर करुनी ॥
भस्म ललाटीं धरितों कीं करितों प्रथम बद्ध कर करुनी ॥ ७४
निववी असुरांत जसा साधु प्रन्हाद राय कवि-कर्ण ॥

---

१ ग्रामसिंह-श्वानाच्या. २ मात्र. ३ द्यूतक्रीडेच्या इच्छेची. ४ माझी उक्ति. ५ परंतु. ६ शब्दा. ७ अर्जुन. ८ अकल्याणाचा. ९ भिंतिवरील चित्र.

धृतराष्ट्र-सुतांत तसा एकचि नय-निपुण-नायक विकर्ण ॥ ७५
भीष्म-धृतराष्ट्र-विदुर द्रोण-कृप-नृपांसि, बोल तो लावी ॥
कीं समयीं न वदावी तरि मग केव्हां सदुक्ति बोलावी ॥ ७६
बोला हो बोला हो बोला हो सर्व सभ्य बोला हो ॥
असभ्य मौनें तुमच्या सुज्ञ-पणाच्या न हानि मोला हो ॥ ७७
श्रवणा तरि करा मज जें कळलेंसे तेंचि भीड तोडूनी ॥
वदतों पद तों गुरूचें न शिवों द्यावें शिखीस सोडूनी ॥ ७८
चार-व्यसनें मृगया स्त्री पान द्यूत यांत जो सक्त ॥
तो धर्म-च्युत तत्कृत सत्कृत न महा-जनांत हें व्यक्त ॥ ७९
धर्म द्यूत-व्यसनीं झाला कितवांसि वश पराभूत ॥
कां हो भ्रांत करीना स्वमता ऽत्यें ऽशुचि-क्रियापरा भूत ॥ ८०
धर्म जयाच्या नादीं लाउनि जिंकूनि शकुनिनें आर्या ॥
पण आपणाचि करविला पांचांची आपुली सती भार्या ॥ ८१
अन्यर्लिगें न तुमत जें द्रव्य न होतां असोन हो सुनितें ॥
होइल सभेंत बहुमत तो एका तरिहि काय हो मुनितें ॥ ८२
द्यूतीं साधारण धन- पण करुनि नव्हेचि एक हारविता ॥
गिळिल दुरा ऽग्रह-राहू त्यजिना परि मद्विचार हा रवितो ॥ ८३
सभ्यांमाजि वदाया विहिन असें बोल तोंचि अजितत्व ॥
हरि-कीर्ति सती हेही तुल्या यांचें समान अजितत्व ॥ ८४
तें साधु साधु साधु ध्वनि करिती म्हणति बोल कानांहीं ॥
प्यावे असेचि तूं कीं विदुर तिजा स्पष्ट बोलका नाहीं ॥ ८५
न्याय-मृकंड-सुताच्या दुस्तर-धृतराष्ट्रजा ऽब्धि साधुवटा ॥
सभ्या भला भला विधु लाजेल तुझ्याचि मानसा ध्रुवटा ॥ ८६
कर्ण म्हणे वाचाळा रे सर्वस्वें ग्लहांत हे आली ॥
अजिता कसी तुझी मति मति-मंदा विदुर-बुद्धिची आली ॥ ८७

---

१ उत्तम उक्ति. २ अग्नि. ३ स्वमतें अति अशुद्ध कर्मरतास. ४ कुत्सिजांस अमान्य. ५ हवन कर्ता-यजमान. ६ सूर्यपणा. ७ अजितपणा. ८ सज्जन. ९ उत्तमोत्तम. १० न्यायरूप मार्कंडेया-च्या. ११ तरण्यास अशक्य अशा धृतराष्ट्रपुत्ररूप समुद्रांत आश्रयरूप वटवृक्षा. १२ सर्वस्वप-

( पांन. १३ सखी.

वरकड हे काय मुके वक्ता धर्मज्ञ तूंचि बैसउगा ॥
नभला स्व-भाव हा तुज बालिशा-जन-पंक्तिला न बैसउ गा ८८
न वदति सभ्य न पांडव जरि हे कृष्णा ह्मणे अहो सांगा ॥
अजिना असती नरि हे तैसेंचि स्पष्ट न वदते कां गा ॥ ८९
ह्मणसील सभेंत सती नाणावी नरि सती न हे असती ॥
असतो एक सतीचा उप-भोक्ता पांच ते इला असती ॥ ९०
आनयन सभेंत इचें कीं हें एकांऽबरल न विचित्र ॥
नग्नलहि नवल नव्हे न चुना बहु नासिकेशि ज्या[1] श्चित्र ॥ ९१
स-स्त्रीक स-धन पांडव शकुनि-जित स्पष्ट काय बोलशिरे ॥
देतो सभेंत लघुता जो स्वांविषयीं[2] बळेंचि बोल शिरे ॥ ९२
दुःशासना न याचे ऐकावे फोल बोल हा बाळ ॥
गीर्ष्पतिपुढें[3] मिरवितो साऽक्षरता दारवऊनि गाबाळ ॥ ९३
वदतो बुधांत भलतें बोलाया न स्त्रियांनहि सकोनी ॥
हूं घे पांडव-वस्त्रें या दासीचेंहि वस्त्र हिसकोनी ॥ ९४
तें ऐकतांचि वस्त्रें टाकुनि उघडेचि पांचही बसले ॥
भीष्म ह्मणे हें दुःसह हृदयांत असाह्न शर-कदंब[4] सले ॥ ९५
माहात्म्य सतीचें हो देवा पावो न आसे[5] विलुयाला ॥
हे आपणासि ह्मणत्ये बाळ-मृगी स्पष्ट आसविल[6] याला ॥ ९६
दुःशासन सोडाया झोंबे स्व-कुलाऽहितो दया[7] लुगड्या ॥
तेव्हां स्मरली कृष्णा कृष्णा दीनाचिया दयालु गड्या ॥ ९७
तो दुर्जन आधीं ही साधूंच्या करुनि हानि रीतीची ॥
नग्न सभेंत कराया पाहे खळ धरुनि हा निरी तीची ॥ ९८
जें दुर्दशा कराया दुर्दैवें सिद्ध नीच हा केला ॥
तें दीन-बंधुला ती कृष्णा मारी मनींच हाकेला ॥ ९९
हे नाथ रमा-नाथ ब्रज-नाथ हरे मुकुंद कंसाऽरे ॥
गोविंद कृष्ण केशव दीनाऽर्ति-हर त्वमेव संसारे ॥ १००

---

१ आपणें. २ कुष्ठ. ३ स्वजनाविषयीं. ४ बृहस्पती पुढें. ५ बाणसमूह. ६ आशा. ७ आस्वल. ८ स्वकुलाच्या अहितो दयार्थ.

काळेंहि सख्या न तुझ्या दासीस पाहावयासहि सकावें ॥
त्वद्भगिनी-वस्त्र खळें नग्न करायासि काय हिसकावें ॥ १०१
जी हूनि नसे सुभद्रा तुज बहु-मान्या अकीर्ति हे तीची ॥
धांव दयाऽब्धे होते विश्वांत तुझ्या अकीर्ति हे तीची ॥ २
झालासि आतांचि न होउनि विधिच्या अधीन होगलिता ॥
बिरुदावळी तुझी हे गज-वर-वरदा कधीं न हो गलिता ॥ ३
भगिनी ऐसें वदलें परि फारचि लाजलें न हें लटिक ॥
प्रभुजी रक्षा तुमच्या दासांची मी लहानसी बटिक ॥ ४
जिंकिल काय खळा नो जिंकी द्यूतीं न धर्म जो डावा ॥
सुज्ञें पंक-पतित पर- धेनूद्धरणेंहि धर्म जोडावा ॥ १०५
भागाया गाय तसी मी न धरी अघ-भयास हा यवन ॥
गुरु-जन सत्पालक परि झाले या निर्दया सहाय वन ॥ ६
कीर्त्यर्थ उद्धरीं मज उद्धरिलें जेविं सागरीं महिला ॥
त्वद्दासांची होती त्या अमृतीं आजि या गरीं महिला ॥ ७
बा टळतां तिळहि पदर भावी व्यजनोसि सांऽग रामाजी ॥
ती खल-सभेंत उघडी पडत्ये न पडोनि सागरामाजी ॥ ८
भो भगवन् भो वत्सल भो हत-चाणूर-मल्ल भागावें ॥
विश्वीं तुझेंचि दुसरें न यश श्री-प्राण-वल्लभा गावें ॥ ९
आजि असत्पर-पुरुष- स्पर्श न अपराध अन्य केला हो ॥
झांका प्रसाद-पदरें न कुजनें- दृक्-स्पर्श कन्य केला हो ११०
अवतरला उतराया जो दुःसह दुष्ट-भार महिवरला ॥
अहि-वर-लास्य-पटु प्रभु करुणोक्तें द्वारकेंत गहिंवरला ११
परमेश्वर रूप धरी स्व पर-जन-हितोदया लुगड्यांचें ॥
निववाया सभ्यांसह मन नयनहि तो दयालु गड्यांचें ॥ १२
हा अंबराऽवतार श्रित-लज्जा-रक्षणार्थ अकरावा ॥
प्रभु-मन असे सदवनीं आग्रह वेषीं कदाऽपि न करावा ॥ ११३

---

१उपेक्षाकरणें. २डाबाला. ३पळाया. ४पृथ्वीला. ५स्त्री. ६पंखा. ७ सापराध. ८सुंदरी. ९हे लक्ष्मी मापामिया. १०दुर्जन दृष्टि स्पर्श. ११कालीयफणावर नृत्यकरण्या विषयीं कुशल. १२करुणास्वरें. १३स्वभक्तजनहितोदयार्थ. १४मैत्रांचें. १५वस्त्रावतार. १६साधुरक्षणीं

शेले शालू साड्या क्षीरोदक लांब रुंद पाटावें ॥
झाला अनंतवस्त्रें कीं तीस अनाथसें न वाटावें ॥ ११४
पद सेवाऽर्थचि भजती अनवरत महा-विभूति जानिपट ॥
तो कृष्णा-वपु झांकी होऊनि मुहा-विभूति-जाति पट ॥ १५
पहिलें वसन व्यसन- प्रति पादन-पटु करें कु-मति सोडी ॥
तों दुसरें आहेचि प्रथमाऽधिक वस्त्र त्यासही वोढी ॥ १६
कृष्णा-देह सदंबर-रत्नाकर त्यासि खळ भुजा दिटवी ॥
उपसी परि गांभीर्यें आपण न उहूं ह्मणोनि तो दिटवी ॥ १७
मानिति माया केवळ अल्प सभेंतील भूमि-तळ-पट हो ॥
ह्मणति अदित्याऽदि सत्या त्या मेल्यानें समूळ तळपट हो ॥ १८
जें झांकिलें अनंतें दिव्यें भव्यें सदंबरें सुघडें ॥
तें साधु-काय काय क्षुद्र-मति करील नागवें उघडें ॥ १९
तो शतशः पट झट झट फेडुनि भागे सभेंत वेडावे ॥
कितिखळ-बळ जलनिधिचे कीं दुस्तर-तर तरंग फेडावे ॥ १२०
होय सभेंत हळहळा-स्वन कृष्णेसि प्रशंसिती राजे ॥
छी ते खळासि ह्मणती गेले भव-नद-पर-प्रतीरा जे ॥ २१
भीम ह्मणे राजे हो तरि पूर्वज-गति न हो मला परिसा ॥
जरि दुःशासन-वक्षः क्षतज न सेवीन मी स्वयें हरिसा ॥ २२
सभ्य सकळ साधु ह्मणति भीमानें धिक् खळासही ह्मणती ॥
हरि हरि हरि हरिणांतचि त्यांची केलीच त्याजनें गणती ॥ २३

द्रौपदी वस्त्रहरण

आर्या

समाप्त.

---

१वस्त्र विशेष. २निरंतर. ३अणिमादिसिद्धि. ४ दुःखदायक करानें. ५नीच. ६उत्तमदेह. ७भवनदाच्या परतीरास. ८दुःशासनाच्या हृदयांतील रक्त. ९सिंहासारखा.

## कृष्णआर्या.

केशव केशवतुल्या न खेचि विमुखा: खला मला-
कारा: ॥ भक्ता स्तवं सक्ताः स्तवनतिपूजासु प्रभो
न के धन्याः ॥ १ ॥

अर्थ- हे केशवा, तुजविषयीं विमुख, मला सारखे अमंगल असे कोणते दु-
र्जन प्रेत तुल्य नाहींत. हे प्रभो, तुझ्या स्तवन नमस्कार पूजा विषयीं आसक्त अ-
से कोणते भक्त धन्य नाहींत. ॥ १ ॥

माधव साधव एव त्वद्यशसि रता न दुर्जना म-
लिनाः ॥ हंसा इव नो दृष्टा मौक्तिककवलादृता
बकाः काकाः ॥ २ ॥

अर्थ- हे माधवा तुझ्या यशा विषयीं साधुच तत्पर असतात. मलिनां-
तःकरण युक्त दुर्जन आसक्त नसतात. यास दृष्टांत-मौक्तिकांच्या ग्रासाविष-
यीं आदरानें युक्त असे हंसा सारखे बक व काक हे पक्षी पाहिले नाहींत. ॥ २ ॥

यत्यादृतकथ भगवन् नत्यादरत स्त्व मुपगतान्
शरणं ॥ नत्या सकृदपि कृतया सत्यानंदप्रदो
भवसि सद्यः ॥ ३ ॥

अर्थ- यति ज्याच्या कथेचा आदर करितात अशा हे भगवन् अत्यंत आ-
दरानें शरण आलेल्यांस एकवारही केलेल्या नमस्कारानें तूं तत्काळ सत्यरू-
प आनंददायक आहेस. ॥ ३ ॥

यत् साधुगीतया त्वं कीर्त्या निजयापि देव मुद
मेषि ॥ तत् तां तवे प्रियार्थं गातुमहं प्रेमतः प्रवृ-
त्तो स्मि ॥ ४ ॥

अर्थ- हे देवा. तूं ज्या कारणास्तव उत्तम प्रकारें वर्णिलेल्या स्वकीर्तीनें ही
हर्ष पावतोस यास्तव मी तुझ्या प्रीत्यर्थ त्या कीर्तीला गाण्यासाठीं प्रेमानें प्र-
वृत्त झालों आहें. ॥ ४ ॥

दत्वा विषमपरिमितं लब्धं त्वत्तोऽमृतं नु पूतन-
या ॥ पूतनयाद्य वृतं त्वं कीर्त्या तत एव नित्य-

नूतनेंया ॥ ५ ॥

अर्थ- हे पवित्रनीते आदिपुरुषा श्रीकृष्णा तुला पूतनेनें अपरिमित विष देऊन तुज पासून तिणें निश्चयें करून मोक्ष संपादिला. अतएव तूं नित्यनवीन कीर्तीनें वरिला आहेस. ॥ ५ ॥

यः संति साधुः स नयो न यथा ऽ संति साधु रीद्य ऐषसतां ॥ सुदसि कथयंति कवयः पापोध्दृति मेव विस्मरंति न तां ॥ ६ ॥

अर्थ- असज्जना विषयीं साधुत्वानें वर्तणारा हा जसा स्तुत्य होतो तसा सज्जनां विषयीं जोसाधु तो स्तुत्य होत नाहीं. यास दृष्टांत कविजन पापिष्ठाचा उद्धार केल्याचेंच साधूंच्या सभेंत कथन करतात व त्याचें विस्मरण पावत नाहींत.

अयि के त्वयि केशव न हि विनता विनतातनूजवाह जनाः ॥ कंसारे कं सारे पीते न यशांसि नच पुमर्थ मिताः ॥ ७ ॥

अर्थ- हे गरुडवाहना कंसारे केशवा तुजविषयीं विशेषें करून नम्र झालेले कोणते जन तुझें श्रेष्ठ यश कर्णद्वारा प्राशन केलें असतां कोणत्या पुरुषार्थास प्राप्त झाले नाहींत. असें नाहीं.

अजगर मजे गरनिधि मरि मुत्कुग्रं ग्रस्तसात्मशिशुवत्सं ॥ अकरो रमृत निधिं किं न करों दाता जनाय ते सत्हृदे ॥ ८ ॥

अर्थ- हे अनादि श्रीकृष्णा तुजसहित गोपाल बालक व गायींचे वत्स यांस गिळणारा विषाचा निधि असून अतिउग्र शत्रु अशा अजगर रूपी अघासुरास तूं मोक्षनिधि केलेंस तेव्हां तुझा कर भक्तजनास मोक्ष कां देणार-नाहीं.

अमुना यमुना मिवे मे मति मपदोषां पदां कदां कर्ता ॥ वद भो मदभोगिमथन पृच्छामि यतः स्त्वमाद्दतो यशांसि ॥ ९ ॥

अर्थ- हे कालियमर्दना याचरणानें यमुने सारखी माझी मति निर्दोष कधीं करशील हामी प्रश्न करितों यास्तव हें मला सांग; कारण तूं यशवर्णना

विषयीं आदरानें प्रसन्न होतोस.

कुरु कुरुवर इव पतिते मयि शरतल्प इव देव संसारे ॥ करुणां करुणावरुणालय वरद गुरो मुकुंद कंसारे ॥ १० ॥

अर्थ- हे करुणा समुद्रा वरदा गुरो मुकुंदा कंसारे देवा शरतल्पा साररव्या संसारांत भीष्मा समान पतन पावलेल्या मजवर करुणा कर.

जानन्नप्ये हमहितैः प्रसभं विषयै जनैः स धर्म इव ॥ क्रीडितु मलं प्रवृत्त स्त्वं दीनानां स एव बंधु रसि ॥ ११ ॥

अर्थ- जाणत असून ही शत्रू भूत कौरव जनांशीं त्या धर्म राजा साररवा- मी विषयांसह क्रीडा करण्या साठीं बलात्कारानें अतिशयें प्रवृत्त झालों आणि- तूं तर त्या वेळचा धर्मराज रक्षक तोच दीनांचा बधु आहेस.

कामादिभि रहितै मे मति रुग्रैः कौरवै रिव प्रसभं ॥ धर्मस्य बंधूरिव हा न्यायो द्विवशीकृता त्वया रक्ष्या ॥ १२ ॥

अर्थ- काम क्रोधादिक उग्र शत्रूनीं माझी मति अन्यायें करून कौरवानीं व- श केलेल्या धर्मराजाच्या स्त्री साररवी बलात्कारानें अत्यंत वश केली हें खेदा- स्पद आहे यास्तव तूं तिला रक्षावेंस.

कंसाराते कीर्तिः कं सारा तें जनं न पातु मलं ॥ वसुधाधारा द्ये विभो न सुधा धारा क्षमाः वितुं रुग्णं ॥ १३ ॥

अर्थ- हे कंस शत्रो पृथ्वी धारक आदि पुरुष विभो अमृत धारा रोगार्तास रक्षिण्या विषयीं समर्थ नाहीं परंतु तुझी श्रेष्ठ कीर्ति कोणत्या जनास रक्षण कर- ण्या साठीं समर्थ नाहीं.

यं उपायनं प्रदातुं पृथुकप्रसृतिं न उपगतो भवेता ॥ अवता स दीनबंधोः कोरि सुदामा पदं मुदामाशु ॥ १४ ॥

अर्थ- हे दीनबंधो तुला पृथुक मुष्टि उपायन ( भेट ) देण्या साठीं समीप आ-

केला जो कृदामा त्यास रक्षक जे आपण त्यानीं शीघ्र आनंदाचें स्थानभूत केलें.

कविनो नें विनो व्रजेंति रव्यातिं बव्हेपि यशः प्र-
भो र्जातु ॥ मुदितेंमनः कुरुमां कैवि मविगीतंक-
था यथासुखं गातुं ॥१५॥

अर्थ- प्रभूचें बहुत ही यश कवी वांचून प्रसिद्धीला कदापि पावत नाहीं, या-
स्तव स्तुत्यकथा यथासुख वर्णन करण्या साठीं मला हर्ष युक्त कवि कर.

पीतांशुक गीतां शुककविना वाल्मीकिनेव रामे-
स्य ॥ रसिकाः पिबंति भवतः कीर्ति देवाः सुधा-
मिवाजस्त्रं ॥१६॥

अर्थ- हे पीतांबर धारिन् वाल्मीकीनें वर्णिलेल्या रामकीर्ति सारखी शुक क
वीनें गायिलेली तुझी कीर्ति, रसिक निरंतर कर्णद्वारा प्राशन करितात यास
दृष्टांत देव जसे अमृतपान करतात तद्वत्.

साधु शुकेनेव पुनर्गीतानि यशांसि ते मयूरेण ॥-
ख्यातिं प्रयांतु लोके भोः के बहुादरा ने नव्यरसे॥१७

अर्थ- हे प्रभो तुझ्या कीर्तिश्री शुकस्वामी प्रमाणें मयूरपंतानें उत्तम प्रकारें
पुनः वर्णिल्या त्या लोकांत प्रसिद्धीला येवोत; कारण नूतन रसा विषयीं आदर-
युक्त कोण नसतात.

स्तोतुमनसमकरोः किल गल्ले स्पृष्ट्वा ध्रुवं ध्रुवं
दरेतः ॥ न हिन्मामादरतः कुरु पुरुकरुणार्य नि-
जनुतौ निपुणं ॥ १८॥

अर्थ- हे बहु करुणा श्रेष्ठा तूं शंखानें ध्रुवास गालाच्या ठिकाणीं स्पर्श करू
न मनः पूर्वक स्तुति करण्या विषयीं समर्थ निश्चयें करून केलेंस तद्वत् मला
आदरानें निश्चयें करून तूं स्वस्तुति विषयीं निपुण कर.

नुतिकृतिकृतादरस्त्वं सदसि सतां श्रुत मिति
श्रुतिज्ञानां ॥ त्वां तेन ते नमज्जनमंदारं प्रार्थ-
ये नमन्नंघ्रिं ॥१९॥

अर्थ- तूं स्तुतिकुशलां विषयीं प्रीति करणारा आहेस असें श्रुतिज्ञानसं
पन्न साधूंच्या सभेंत श्रवण केलें आहे त्यावरून तुझ्याचरणास नमस्कार-

करीत होत्सातां नमस्कार करणाऱ्या जनांस कल्पवृक्षासमान जो तूं तुला मी प्रार्थितों.

> ननु ते न नुतेरधिकं मतमन्यद्यदि नदिष्टमेव नव ॥
> विनर वरं मय्याश्रितहित रवरंजितजगत्स्ववंशेन ॥२०॥

अर्थः- हे आश्रितहितकर्त्या, तूं वेणूच्या नादानें जगास रंजविणारा असून स्तुतीपेक्षां अन्य अधिक नाहीं असें जर तुला निश्चयें करून मान्य आहे तर स्तुतिविषयीं तुझाच इष्टवर मला दे.

> स्तुत्वा ऽस्तु त्वामयमिह संसारे भो प्रभो जनो धन्यः ॥ याचे यतस्त्वमिच्छां पूरयसि सुखं वदान्यमूर्धन्यः ॥२१॥

अर्थः- हे प्रभो, तुला स्तवून हा जन या संसारांत धन्य असो आणि तूं दानशूरांतील श्रेष्ठ असून सुखें करून इच्छा पूर्ण करितोस यास्तव मी तुला याचना करितों.

> येनार्थिकामपूर्तिः क्रियते खलु झटिति पारिजातेन ॥ समया कथं नु रमया पूजितमपहाय ते पदं सेव्यः ॥२२॥

अर्थः- ज्या कल्पवृक्षानें याचकेच्छा पूर्णता त्वरेनें निश्चयें करून केली जाते तो, मीं, लक्ष्मीनें पूजित तुझा चरण त्यजून कसा बरें सेवावा.

> भवदाश्रितैः स लभ्यस्त्वं तु न जात्वपि तदाश्रितै भगवन् ॥ भामाहारि स सततं न भवान् स्थित इंद्रमंदिरांतरपि ॥२३॥

अर्थः- हे भगवन् तुमच्या आश्रितांस कल्पवृक्ष सुलभ आहे परंतु कल्पवृक्षाश्रितांस तूं तर कदापि प्राप्त होणार नाहींस. यास दृष्टांत कीं, कल्पवृक्ष, तुझ्या योगानें सत्यभामेच्या द्वारांत सतत होता. परंतु कल्पवृक्ष इंद्रमंदिरांत स्थित होता तथापि तेथें आपण नव्हतां.

> तं जडमविवेकिनमगमस्वाधीनं समाश्रयिष्यति कः ॥ त्वां प्रभुमपास्य सर्वगमादिकविं करुणमखिलकामकरं ॥२४॥

अर्थ.- सर्व व्यापक, आदिकवि, करुणामूर्ति, सकलेच्छापूरक आणि प्रभुरूप अशा तुला सोडून, जड असल्यामुळें विवेकहीन व पराधीन अशा त्या कल्पतरूस कोण उत्तम प्रकारें अवलंबील?

अंतर्बहिरपि कठिनश्चिंतामणिरुपल एव खल्वेषः ॥ कामधुगपि पशुरशक्तं भवतो ऽन्यन्नाथ सर्व मस्माकं ॥ २५ ॥

अर्थ.- हा चिंतामणि निश्चयें करून पाषाणच असल्यामुळें आंत व बाहेरही कठिण आहे आणि कामधेनुही पशु आहे तस्मात् हेनाथ, आपणाहून इतर सर्व आह्मास अशक्त आहे.

ब्रह्मादयो ऽपि देवाः कृच्छ्रे त्वां देवदेवमुपयांति ॥ सगदा जगदाधार प्राज्यामृतपाणिमिव गुरुं भिषजाम् ॥ २६ ॥

अर्थ.- हे विश्वाश्रया, ब्रह्मादिक देवही संकटीं तुज देवाधिदेवास शरण येतात. यास दृष्टांत, रोगार्त जन महा अमृतहस्ति वैद्य गुरूस जसे शरण जातात तद्वत्.

यः पुरदाहं चक्रे शक्रेण प्रार्थितः प्रभुः सपदि ॥ सो ऽपि वृकव्यसनात् किल विलयं गत एव रक्षितो भवता ॥ २७ ॥

अर्थ.- इंद्रानें प्रार्थित केलेल्या ज्या समर्थ शंकरानें तत्क्षणीं त्रिपुरासुराचें भस्म केलें, तो शंकरही वृकासुर संबंधि संकटापासून निश्चयानें नाश पावत असतां आपणाच रक्षिला.

भीतांस्त्रातुं दातुं वरमभिलषितं समस्तमर्थिभ्यः ॥ अनलसमनलसमं खलशलभलये त्वां वदंति सत्कवयः ॥ २८ ॥

अर्थ.- भयभीत झालेल्यांस रक्षण करण्यासाठीं आणि याचकांस इच्छित सर्व वर देण्यासाठीं तूं आलस्य रहित असून दुर्जनरूप शलभांच्या (टोळांच्या) संहाराविषयीं अग्नीसारखा आहेस असें सत्कवि म्हणतात.

गजमंबुजं तु धाक्रान्तक्रांत्वक्रायुधा ऽवता भक्

ता ॥ दत्तमनुक्षाप्यभयं षड्वर्गग्राहपीडितेभ्यो नः ॥ २९ ॥

अर्थः- जलजंतुश्रेष्ठ नक्रापासून गजेंद्रास चक्रायुधानें रक्षण करणारे जे आपण यानीं कामक्रोधादि षड्रिपूनीं पीडित झालेल्या आह्मांस प्रार्थने वांचून ही अभय दिलें.

नारायणेत्यजामिल आक्रुश्यापत्यमत्यपत्यम नि: ॥ त्वां प्राप पापनिलयः किल यः शतकल्पनिरयवासार्हः ॥ ३० ॥

अर्थः- अजामिल, पापांचा केवल स्थानभूत असल्यामुळें जो निश्चयें करून शतकल्प पर्यंत नरकवासाविषयीं योग्य असून अति पुत्रासक्त बुद्धीनें स्वपुत्रास हेनारायणा अशी हाक मारल्यानें तो तुला प्राप्त झाला.

त्वामहमनिशं कलये कलेयं यद्दत्तसाध्वसोसि त्वं ॥ प्रणतेर्यत्नो अवमा अव मामित्यानतं दयालुमणे ॥ ३१ ॥

अर्थः- हेदयालुश्रेष्ठा तूं कलीला भयप्रद आहेस यास्तव मी सर्वदा तुला प्रार्थितों आणि सर्व यत्नापेक्षां नमस्काराचे प्रयत्न अधम असून त्या प्रमाणें मी नम्र झालों अतएव माझें रक्षण कर.

एकस्त्वमेव शाश्वत आस्से स्वरक्षमब्जनाभ यदनल्पे ॥ कल्पेऽखिललोकानां भो भगवन् भोगिभोगमयतल्पे ॥ ३२ ॥

अर्थः- हेपद्मनाभ भगवन् सर्वलोकांचा महाप्रलय झाला असतां शेषाच्या देहरूप पर्यंकावर तूं एकत्व स्वस्वें करून शयन करतोस या वरून तूं नाशरहित आहेस.

नाथ कथंकारं ते महिमानमगाधमिममहो ब्रूमः ॥ यत्तत्त्वविचारेऽद्याप्यास्ते प्रभुरचंचलभ्रूमः ॥ ३३ ॥

अर्थः- हेनाथ तुझा आश्चर्यकारक असून अगाध असा हा महिमा मीं कसा वर्णन करूं? कारण, अचंचल भृकुटियुक्त उमाकांत प्रभु शंकर तुझ्या

तत्वविचारांत अद्यापि आहे.

गोप्या कोप्यात्मसूनोः पाशैर्लयाऽपि प्रसाद ईश्वे
रतः ॥ सेत्याप्यैत्याहृतया न मयो नै मया ऽदेउ-
च्यतेप्यैरिवलैः ॥ ३४ ॥

**अर्थः**- अत्यादरयुक्त साध्विरूप लक्ष्मीनेंही ईश्वरापासून जसा प्रसाद सं- पादन केला नाहीं असाही कांहीं एक तुझा महान् प्रसाद सदोषही यशो- दा गोपीनें संपादिला हें मीच म्हणतों असें नाहीं तर सर्व असेंच म्हणतात.

बद्धोस्युलूखले त्वं गोप्या हंत व्रजे स दाम्ना यं
ज्ञातुं कवयो न वयो गतमपि पश्यंति खलु सदाऽ
म्नायं ॥ ३५ ॥

**अर्थः**- कविजन ज्यास जाणण्यासाठीं सर्वदा वेद अवलोकन करीत अ- सतां त्यांत गेलेलें स्वकीय वयही निश्चयें करून जाणत नाहींत तो तूं गोकु लांत यशोदेच्या हातून दांव्यानें उखळाशीं बांधला गेलास हें महदाश्चर्य आहे.

अवतारातिभ्यो जगदवतारा देव ये गृहीतास्तै
॥ माधुरतः साधुरतः कोपि न तेष्विह तु सूद्धृ-
ता बहवः ॥ ३६ ॥

**अर्थः**- हे देवा, शत्रूंपासून जगास रक्षण करण्यासाठीं तूं जे अवतार घे- तलेस त्यांतील कोणताही अवतार मधुकुलांत रममाण होऊन साधूं- विषयीं तत्पर झाला नाहीं आणि या कृष्णावतारीं तर बहुसज्जन उत्तम रीतीनें उद्धारिले.

इह गोकुलं व्रतं ते शिशवोप्यसवः कुमारिकाः श्रु-
तयः ॥ गोपा गुरवः परमेश्वर किं बहुना ऽरयः
प्रियातिथयः ॥ ३७ ॥

**अर्थः**- हे परमेश्वरा, या अवतारांत तुला गोकुल व्रतासारखें व गोपशिशु ही प्राणासम रक्षणीय असून ज्यांचें वचन उल्लंघणें अशक्य अशा गोप- कन्या श्रुतिसमान होत्या तसेंच गोपाल आज्ञा मानण्या विषयीं गुरूसारखे होते. फार काय सांगावें कंसाकडून जे शत्रु आले ते तूं प्रिय अतिथि मा-

नलेस.

माथुरभवनोरम्भिमं मन्ये ऽखिलकामकल्पतरुमेव ॥ वस्तु सकलमेकरसीकर्तुं दुर्लभमस्ति जगति न रमे वे ॥ ३८ ॥

**अर्थः-** मथुरेंतील हा श्रीकृष्णावतार सकल मनोरथ पूर्ण करण्याविषयीं कल्पवृक्षच आहे असें मी मानतों आणि जगांत सकलवस्तु शीघ्र एकरस करण्यासाठीं लवणाकरा सारखा नाहीं.

भुक्तं सह पशुशिशुभिरुक्तं कृतमेव गोपवामदृशां ॥ मुक्तं चाश्रु वियोगे युक्तं भगवत्यदः किमात्मरते ॥ ३९ ॥

**अर्थः-** गायी आदिकरून पशु व गोपाल बालक यांसह भोजन केलें, गोपांगनांचें वचन मान्य केलेंच आणि त्यांच्या वियोगकालीं नेत्रांतून अश्रु सोडिले हें आत्मस्वरूपीं रमणाऱ्या श्रीकृष्ण भगवानास युक्त आहे काय ?

भक्तानां पुरतस्त्वां नर्तयतीत्थं स्वभक्तवत्सलता ॥ न व्यापृतो भवानिव कोपि कुटुंबी क्वचित्त कुटुंबे स्वे ॥ ४० ॥

**अर्थः-** अशा पूर्वोक्त प्रकारें तुला स्वभक्तांविषयींची वत्सलता भक्तांपुढें नृत्य करविते; कारण कोणीही कुटुंबी आपल्या कुटुंबा विषयीं तुज सारिखा कोठें व्यापारांत गुंतलेला नाहीं.

पार्थमनन्यायस्य न ते का वा रीतिः कुटुंबिरीतिरिव ॥ दूतत्वं सूतत्वं भजतो व्रजतो ऽनृतेन चापि पथा ॥ ४१ ॥

**अर्थः-** हे भगवन् असत्य मार्गानें ही दूतकर्मसेवन व सारथ्यास जाणें हीं अंगीकारून अर्जुनाचें साहाय्य करणारा जो तूं तुझीही कोणती रीति कुटुंबि जनांच्या रीती प्रमाणें नाहीं तर हा सर्व प्रकार तसाच आहे.

सक्तं सपत्नमथने भक्तं भजता किरीटिनं पार्थं ॥ व्यक्तं निजमहितत्वं त्यक्तं स्वीकृत्य साधुसारथ्यं ॥ ४२ ॥

**अर्थः-** हे प्रभो, शत्रुवधा विषयीं आसक्त झालेल्या अचलमुगुटधारि अर्जुन भक्तास रक्षण करण्यासाठीं सारथ्य उत्तम प्रकारें स्वीकारून आपलें श्रेष्ठत्व उघड रीतीनें त्यागिलेंस.

सोढ्वा व्यायासमरं समरं गत्वा ससंशयं प्राप्य ॥
लुब्धेनेव स्वार्थः पार्थः परिरक्षितस्त्वया व्यसने ॥ ४३

अर्थः- तूं अति आयासही सहन करून युद्धांत जाऊन अर्जुना विषयीं अत्यंत संशय पावून संकटसमयीं त्या अर्जुनाचें रक्षण केलेंस. यास दृष्टांत लोभी जसा स्वार्थ साधितो तसें.

भंगे श्रीकांत नवे शांतनवे प्रकुपिते प्रतिज्ञायाः ॥
प्रापस्तथा न कंपं त्वं पंकजनेत्र हृदि यथा सख्युः ४४

अर्थः- हे कमलनेत्र लक्ष्मीकांता, भीष्म अत्यंत क्रुद्ध झाला असतां तूं अर्जुनाच्या दुःख संबंधानें जसा अंतःकरणांत कंपित झालास तसा शस्त्र न धरण्याच्या स्वप्रतिज्ञेचा नूतन भंग झाला तथापि कंपित झाला नाहींस.

उपनिषदां सर्वस्वं मूर्तं श्रेयः श्रियः सतां सत्वं ॥ वपु-
रापगेयसमरेऽनादृतमिषुविक्षितं न ते मित्रं ॥ ४५ ॥

अर्थः- उपनिषदांचें सर्व तत्व, लक्ष्मीचें मूर्तिमंत कल्याण व साधूंचें सत्व असें जें स्वरूप भीष्माशीं झालेल्या संग्रामांत बाणांनीं विदारण पावलें तरी तूं त्याचा अनादर केलास परंतु मित्र जो अर्जुन त्याचा अनादर केला नाहींस.

श्रितमवतस्तव भीष्माद्रथचक्रभृतः क्षतप्रति
ज्ञस्य ॥ अद्यापि सत्यसंधैरप्युच्चैर्गीयते यशः
सदसि ॥ ४६ ॥

अर्थः- हे देवा तूं रथचक्र धारण करून भीष्मापासून आश्रितरूप अर्जुनाचें रक्षण करण्यासाठीं तुझ्या शस्त्र न धरण्याच्या प्रतिज्ञेचा भंग झाला तरी तुझें तें यश सभेमध्यें अद्यापि सत्यप्रतिज्ञ जनही उत्कृष्टत्वें करून गायन करतात.

भगवन्नूनं नूनं श्रितसंभवनतोऽन्यदरिवत्सम-
पि कर्म ॥ परिपालयन् यदेकलमर्जुनमसि स
र्वथा सतामीड्यः ॥ ४७ ॥

अर्थः- हे भगवन् तूं एकाकी अर्जुनाचें परिपालन केलेंस तेणें करून साधूंमध्यें सर्व प्रकारें स्तुत्य आहेस या वरून आश्रितांच्या उत्तम रक्षणाचे

क्षां अन्य सर्वही कर्म निश्चयें करून न्यून आहे.

भक्तं नक्तंदिवमपि कृपिकेतुं नेतुमीप्सितां पद-
वीं ॥ किं किं न रक्षता कृतमुत किं किं कारितं न
वा ऽन्यैस्ते ॥ ४८ ॥

अर्थ:- हे परमेश्वरा अर्जुन भक्तास इच्छित पदवीला नेण्यासाठीं अ-
होरात्र ही रक्षण करीत असतां तूं स्वतः काय काय केलें नाहींस आणि
इतरां कडून काय काय करविलें नाहींस?

धर्मो यदवदद्नृतं यदर्काड ऽदर्शनं जगाम रविः
॥ यद्भजदिषुतल्पं कुरुगुरुरन्यद्यदत्र तत्तवैवं
मतं ॥ ४९ ॥

अर्थ:- तें असें कीं, धर्मराजा नरोवा कुंजरोवा असें जें असत्य बोलला!
जयद्रथवधप्रसंगीं सूर्य अकालीं जो अदृश्य झाला! भीष्म इच्छामरणी
असून तो जो बाणशय्येवर पडला व तसेंच अन्यही जें जें घडलें तें सर्व तु-
झेंच मत आहे.

धर्मद्विषो ऽनुसरणो न रणे ऽपि धनुर्भृतां गुरोर्वि
जयः॥ धर्मस्य तु ध्रुवंसो ऽशस्त्रस्यापीति त उपदि
ष्टमिह ॥ ५० ॥

अर्थ:- धर्माचा द्वेष करणाऱ्या दुर्योधनास अनुसरल्यामुळें धनुर्धारि वी-
रांच्या द्रोण नामक गुरूसही रणांत जय प्राप्त झाला नाहीं आणि तूं शस्त्र
धारण न करतांही धर्मराजाचा तर निश्चयें करून विजय झाला असें लो-
कांत तूं दर्शविलेंस.

यद्यत् कृतं त्वयेश्वर जीवानामाशु तत् समुद्धृत
ये॥ धृतयेच्छया नृमूर्त्या श्रीसख्या शृण्वतां स-
तां धृतये ॥ ५१ ॥

अर्थ:- हे ईश्वरा, तूं स्वेच्छेनें धारण केलेल्या लक्ष्मीसखीरूप मनुष्याकृ-
ति मूर्तीनें जें जें कृत्य केलेंस तें श्रवण करणाऱ्या सत्पुरुषांच्या धैर्यार्थ अ-
सून जीवांच्या त्वरित उद्धारार्थ आहे.

यद्गोप्या राधिकया ऽराधि कयाधूसुतेन चाप्यं-

नः ॥ हृतभवगदं पदं ते ध्यायंति विमुक्तिपदमपि न संतः ॥ ५२ ॥

अर्थः- राधिका गोपीनें व प्रल्हादानेंही ज्याचें आराधन केलें तें तुझें, संसाररोग हरण करणारें पद अंतःकरणांत संत ध्यातात परंतु ते मुक्तिपदाचेंही ध्यान करीत नाहींत.

राधामाधायोरसि बाधां माधाम्नि कामजां हृत्वा ॥ सुप्तं गुप्तं सतमःपुंजे कुंजे स्मरंति यतयस्त्वां ५३

अर्थः- लक्ष्मीच्या निवासस्थानभूत वक्षस्थलावर राधिकेला घेऊन तिची कामोत्पन्न बाधा दूर करून निबिडांधकार युक्त लतादिवेष्टित गुहांत गुप्त रीतीनें शयन केलेल्या तुझ्या रूपास यति स्मरतात.

गोपीर्भुक्त्वा पि विटैः कृत्वापि न दस्युभिः समः स्तेयं ॥ हत्वा ऽपि घातुकैस्त्वं जगति गुणस्ते ऽद्भुतः समस्ते ऽयं ॥ ५४ ॥

अर्थः- तूं गोपींस भोगूनही जारांसमान नाहींस; चौर्य करूनही चोरां सारखा नाहींस; वध करूनही घातकांशीं सम नाहींस हा तुझा गुण समस्त जगांत अद्भुत आहे.

यासां त्वया ससंचितमपहृतमेकांततोपि नवनीतं ॥ ताभिरबलाभिरपि वद मनसि हृते देव किं न तव नीतं ॥ ५५ ॥

अर्थः- हे देवा, तूं ज्यांचें उत्तम प्रकारें संग्रह करून ठेविलेलें नवनीत एकांतस्थलांतूनही नेलेंस त्या अबलानींही तुझें मन हरण केलें असतां तुझें काय एक नल्यासारखें झालें नाहीं हें सांग.

राधास्तननिहितदृशं गलदमलस्तन्यबिंदुवदनेंदुं ॥ त्वां ध्यायत्यतः श्रीः साधुसभा सांख्य सात्मकुत्समपि ॥ ५६ ॥

अर्थः- राधेच्या स्तनाकडे लावलेल्या दृष्टीनें युक्त असून गळणाऱ्या स्तनांतील शद्ध दुग्धबिंदुयुक्त मुखचंद्रानें शोभणाऱ्या तुला लक्ष्मी स्वहृदयकमलांत, तूं राधास्तनावर दृष्टि ठेवल्यामुळें आपली निंदा करून

ही ध्याने तशीच साधूंची सभा प्रेमाश्रुयुक्त होऊन तुझें ध्यान करते.

त्वामधिकदंबमबला पटुपटपीतांबरं विलिख्य यथा ॥ सत्यः प्रत्यहमात्मव्रतसंसिद्ध्यै भजंति पतिमत्यः ॥ ५७ ॥

अर्थः- सुवासिनी पतिव्रता स्त्रिया आपल्या व्रताच्या उत्तमसिध्यर्थ कळंबवृक्षावर चढलेली सुंदर वस्त्रें चोरलेली तुझी मूर्ति यथासांग लिहून प्रतिदिवशीं तिची सेवा करतात.

दीपमिव त्वां स्नेहादुद्भासितरूपसंपदं गोप्यः ॥ अभजन् पतंगिका इव मरणभयमपास्य रुचिररुचिरुचयः ॥ ५८ ॥

अर्थः- सुंदर कांति व इच्छा यानीं युक्त गोपी पतंग नामक पक्षिणी सारख्या प्रीतीमुळें मरणभय त्यजून दीपासारख्या उत्कृष्ट देदीप्यमान रूप संपत्तिशोभित तुला सेवित होत्या.

मृत्स्नाशनागसि विभो भीताया विश्वदर्शनान्मातुः ॥ स्वस्मिन् दुर्लभपुत्रस्नेहापायात्त्वमेव बहुभीतः ॥ ५९ ॥

अर्थः- हे विभो मृत्तिका भक्षणरूप अपराधप्रसंगीं आपल्या मुखांतील विश्वदर्शनानें भयभीत झालेल्या यशोदेचा आपल्यावरील दुर्लभ पुत्रस्नेह नाश पावेल या भीतीनें तुह्मीच बहुत भ्यालांत.

हा बत हंत पिबंतं त्वाममृतनिधिं द्रुतं निरस्य भुवि ॥ याता माता बहुमतदुग्धा मुग्धाः खलु स्त्रियो जात्या ॥ ६० ॥

अर्थः- यशोदा दुधाविषयीं बहु आसक्त असल्यामुळें ती स्तनपान करणारा, मोक्षनिधि जो तूं त्या तुला भूमीवर टाकून दुधाकडे गेली तस्मात् स्त्रिया स्वभावतः निश्चयें करून अज्ञान असतात हें अत्याश्चर्य कारक खेदास्पद आहे.

दुग्धे मुग्धे किमधिकमंबे त्वं बत सुवंचितासीति ॥ ज्ञापयितुमेवमेव त्वं गोरसभाजने ऽकरोः कीं

पं ॥ ६१ ॥

अर्थः- हे भोळे आई, दुधांत अधिक काय आहे असें असून तूं फार फसलीस हें खेदास्पद आहे असें मातेला जाणिवण्यासाठींच कृष्णा तूं दुधाच्या भांड्यावर असा राग केलास.

गुरुभिरपि गौरवेण च भवता ये बोधिताः क्रतौ
गुरवः ॥ हंत कथं तेऽप्यंधा बंधावहमेव येऽर्हंत क
र्म ॥ ६२ ॥

अर्थः- हे श्रीकृष्णा आपण गौरवयुक्त श्रेष्ठवाक्यानींही यज्ञांतील ज्या ऋषिरूप गुरूंस बोध केला तेही अंध कसे झाले? हें महदाश्चर्य आहे; कारण ज्यानीं बंधक कर्मच अंगीकारिलें.

धन्या मन्यामह इह ता रामाः सत्कृतोसि याभिस्त्वं
॥ अज्ञपतीनां नौकाः सत्यः सत्यः स्तुतिर्न महिमा
ऽसाम् ॥ ६३ ॥

अर्थः- त्या यज्ञांतील ऋषिपत्न्या धन्य असें आह्मी मानतों; कारण ज्यानीं तुझा सत्कार केला. यावरून त्या पतिव्रता आपल्या अज्ञानिपतींस संसारसमुद्र तरण्याविषयीं नौकारूप झाल्या हा त्यांचा महिमा सत्य आहे, ही त्यांची निरर्थक स्तुति नाहीं.

श्रीकरधृतो जडोऽपि प्राप यशो जगति पर्वतः सं
ततं ॥ तद्दुर्दिनमप्यभवत्साधुमतं पुण्यपर्वतः
सततं ॥ ६४ ॥

अर्थः- तो गोवर्धन पर्वत जडही असून श्रीकृष्णानें स्वकरीं धारण केल्यामुळें जगांत विस्तृत यश पावला आणि त्या प्रसंगीं सात दिवस पर्यंत इंद्रकृत पर्जन्य वृष्टीनें झालेलें तें दुर्दिन (सूर्यदर्शन न होणें) ही श्रीकृष्णासंबंधानें सर्वदा पुण्यपर्वापेक्षां साधुमान्य झालें.

करुणामृतघन करुणामृतवृष्ट्या तें जितेव सा वृ
ष्टिः ॥ जडजाप्यधः पतंती हेतुः पंकस्य या च कंप
स्य ॥ ६५ ॥

अर्थः- आणि जी वृष्टि पंक (चिखल) व कंप यांस कारणभूत, जलोत्प-

न्न व अधोभागीं पडणारी असूनही हे करुणारूप अमृतवृष्टि करणाऱ्या मेघा, तूं आपल्या करुणामृत वृष्टीनें तिला जिंकिलेंस्च.

गोवर्धनधर तव भुजवीक्षणोत्क्षणविस्मृतात्मनां स्त्रीणां ॥ अपि खरशब्दा अब्दाः शंपाः कंपाय नो भवन् मनसः ॥ ६६ ॥

**अर्थ:**– हे गोवर्धनधारिन् तुझ्या बाहूकडे अवलोकन करण्याच्या आनंदानें स्वदेहासही विसरणाऱ्या गोपींच्या मनास कठोर शब्द करणारे मेघ व विजाही कंप उत्पन्न करण्यास समर्थ झाल्या नाहींत.

त्रासेन सहोत्खातः सकृद्दंदां समसमुच्छ्रितो गवां पुच्छैः ॥ अवतारितः पुनर्गिरिरिंद्रमदभरेण सोकमीश्वर ते ६७

**अर्थ:**– हे ईश्वरा, तूं गोपालांच्या त्रासासहवर्तमान गोवर्धन पर्वत उपटलास आणि तो गायींचे पुच्छांसह उत्तमरीतीनें उचललास व इंद्राच्या गर्वातिशयासहित पुनः उतरून खालीं ठेवलास.

भूगोलभृद्भुजंगममनुकुर्वन् लीलया धृताहार्यः ॥ उच्चैर्बभौ भुजस्ते छत्रस्य महेंद्रनीलदंड इव ॥ ६८ ॥

**अर्थ:**– भूगोल धारण करणाऱ्या शेषासारखें कृत्य प्रदर्शित करण्यासाठीं तूं लीलेनें गोवर्धन हातावर धरिलास तेव्हां तुझा हात छत्राच्या इंद्रनीलमण्याच्या दांड्यासारिखा अतिशय शोभला.

वपुषः कांत्या मेघास्तव करकाराशयः स्मितप्रभया ॥ तडितोपि वाससा खलु पीता भीता भ्रंजा ध्रुवं वाताः ॥ ६९ ॥

**अर्थ:**– हे कृष्णा तुझ्या स्वरूपसंबंधि कांतीनें मेघ भयभीत झाले आणि तुझ्या मंदहास्य कांतीनें गारांच्या राशि लज्जित झाल्या, तशाच पीतवर्ण विजाही पीतांबरानें निश्चयें करून भय पावल्या व तुझ्या प्राणानें वायु चकित झाले.

पर्वतधरेण भवता वज्रधरो लीलया ऽद्रिभिद्विजितः ॥ आस्तां गिरिरपि हरिरपि जेतुमलं त्वं तृणेन कालमपि ॥ ७० ॥

अर्थः- पर्वत धारण करून तूं लीलेनें पर्वत विदारण करणारा वज्र धारी इंद्र विशेषें करून जिंकिलास. तरी गिरिही उचलला व इंद्रही जिं कला हें असो. कारण, तूं तृणानें कालासही जिंकण्या विषयीं समर्थ आहेस.

गोत्रारेर्वज्रभृतः क्रुद्धाद्गिरिरेकलोप्यपक्षोपि॥
प्राप्तो जयं न भंगं सत्पुरुषभुजाश्रितो न को वि-
जयी ॥ ७१ ॥

अर्थः- गोवर्धन पर्वत एकाकीही व पक्ष (पंख किंवा सहाय) रहितही असून तो, क्रुद्ध झालेल्या पर्वतशत्रुरूप इंद्रापासून भंग पावला नाहीं तर जय पावला; कारण सत्पुरुष भुजाचा आश्रय करणारा कोण विज यी होत नाहीं.

अमितापराधशमनं नमनं तव पादयोः सकृद्वि-
हितं ॥ किंद्रागिंद्रां दूरीकर्तुमघमतोन्यदद्भुतं तीर्थं ७२

अर्थः- असंख्य अपराधांचें शमन करणारें तुझ्या चरणास एकवार न मन विहित आहे. कारण इंद्रास पापांतून त्वरेनें मुक्त करण्या विषयीं या- पेक्षां कोणतें अन्य अद्भुत तीर्थ आहे.

आगस्कृत्सु नमत्सु द्राक्कुरुषे त्वं क्षमां भृशंक-
रुणः॥ अपराधिनां न चेत् किं केवचं तव चंडका
लभीतिजुषां ॥ ७३ ॥

अर्थः- अपराधि जन नमस्कार करूं लागले असतां त्यांविषयीं तूं अत्यं त दयालु असल्यामुळें त्वरित क्षमा करतोस अशी तूं क्षमा न करशील तर तुझ्या अतिक्रुद्ध कालाच्या भीतीनें ग्रस्त झालेल्या अपराधिजनांस रक्षण करणारें अन्य काय आहे? किमपि नाहीं.

त्रातो न कस्तृणादिर्जीवस्ते स्वपदरेणुना दरतः॥
कश्च चरः संसारान्मशकादिर्मधुरवेणुनादरतः ७४

अर्थः- हे भगवन् तूं स्वचरण रजानें तृणादिक कोणता अचर जीव भ यापासून रक्षिला नाहींस आणि तुझ्या मधुर वेणुनादा विषयीं तत्पर अ- शा कोणत्या मशकादि चरजीवास संसारांतून रक्षिलें नाहींस.

येश्रुंबितस्त्वयानिशमीश्वर परमादृतेन वंशस्तं॥

मन्ये रमाधराहूरमिह माधुर्यं सदा नवं शस्तं ॥ ७५

अर्थः- हे ईश्वरा तूं परमादरानें निरंतर ज्या वेणूस चुंबन करितोस त्यास मी लक्ष्मीच्या अधरोष्ठापेक्षां श्रेष्ठ मानतों. कारण त्या वेणूंत नूतन माधुर्य सर्वकाळ प्रशस्त आहे.

जगता समसमनुभूतं माधुर्यं चुंबता त्वया यस्य ॥
स वरं श्रियो धरादिति वदता कविना श्रियः किमपराद्धं ॥ ७६ ॥

अर्थः- तूं चुंबन करीत असतां ज्या वेणूचें माधुर्य जगासमागमें अनुभविलें असतां कवीनें वेणु, लक्ष्मीच्या अधरोष्ठापेक्षां श्रेष्ठ असें वर्णन करण्यांत तिचा अपराध काय केला ?

कास्ताः स्त्रियो न नीता वंशेन स्थाणुभावममुना याः ॥ अन्यासां केव कथा स्तकविशुकः स्तंभमाह यमुनायाः ॥ ७७ ॥

अर्थः- त्या वेणूनें ज्या स्त्रिया अचलस्थितीला प्राप्त केल्या नाहींत अशा त्या कोणत्या आहेत तर अशा कोणी नाहींत. इतरांची कथाच काय ? कारण, त्या वेणुनादानें यमुना जलाचीही गति स्तब्ध झाली असें उत्तम कविरूप श्रीशुकस्वामीनीं वर्णिलें आहे.

एणो न केवलं तव वेणोरवमोहितो भुजंगोऽपि ॥
हिंस्रोपि देव बहुना किं स्रोतश्चारि जंतुनिकरोपि ७८

अर्थः- हे देवा, तुझ्या वेणूनें केवळ हरिणच मोहित झाले असें नाहीं तर कालियानाग हिंसकही असून तोही मोहित झाला. बहुत काय सांगावें जलप्रवाहांत संचार करणारा प्राणिसमुदायही मोहित झाला.

द्युसदां समोहिता रवमधु पाययता च वेणुना सत्यः ॥ पिदधे श्रुती शयाभ्यां यासां मुखमीक्ष्य मंक्षुना सत्यः ॥ ७९ ॥

अर्थः- आपलें शब्दरूप मधु प्राशन करविणाऱ्या वेणूनें देवांच्या ज्या स्त्रिया अत्यंत मोहित केल्या त्यांचें मुखसौंदर्य पाहून अश्विनीकुमारानें स्वकरानीं कर्ण त्वरित झांकले.

वंशो राकां जाने रश्मेरपि तापनाशको मधुरः ॥
कोप्यद्य एष वहता गोप्यो दूरं हृता रसैर्येन ॥ ८०

अर्थः- वृंदावनांत नादरूपें व्याप्त होणाऱ्या ज्या वेणूनें आपल्या मधुर रसानीं गोपी दूर नेल्या तो कोणी एक वेणुही आज पूर्णचंद्राच्या किरणापेक्षांही तापनाशक असून मधुर आहे.

अगदं जगदंतर्बहिरस्तु समुत्सवं यशोमृतं पीत्वा ॥ इति भगवत्यपराद्धं विधिना खलु वत्सवत्सपान् हरता ॥ ८१ ॥

अर्थः- जग तुझें यशरूप अमृत प्राशन करून सबाह्याभ्यंतरीं रोगरहित व आनंदयुक्त असो यास्तव ब्रह्मदेवानें वांसरें व त्यांचें पालन करणारे गोपबालक यांस हरण केलें हा भगवानाचा निश्चयें करून अपराध केला ?

तदनुभववाक्यैर्ब्रूमो वयमद्भुतमेव हंत मोहस्त्वं ॥ निन्ये वशमाकृष्य द्युमणिमिव निजं गृहं तमोहस्तं ॥ ८२ ॥

अर्थः- त्या पूर्वोक्त अनुभववाक्यावरून आह्मी भाषण करतों कीं, मोहानें ब्रह्मदेवास आपल्या आधीन केलें हें अद्भुतच झालें हें आश्चर्य आहे. यास दृष्टांत, जसें अंधकारानें स्वगृहांत सूर्यास हातीं धरून न्यावें तद्वत्.

पित्रा गवां रसास्ते तव पुत्रेणतु सपालका वत्साः ॥ त्वच्चरितेन तु सकला गोपा गोप्यो वयं सुराश्च हृताः ॥ ८३ ॥

अर्थः- हे श्रीकृष्णा, तुझ्या नंदनामक पित्यानें गायींचे रस हरण केले आणि तुझ्या पुत्ररूप ब्रह्मदेवानें पालन करणाऱ्या गोपबालकांसह वत्स हरण केले व त्या ब्रह्मदेवाच्या कृत्यामुळें तूं वत्स व त्यांचे पालक बालक यांच्या रूपानीं होऊन गोप, गोपी, आह्मी कवि व देव या सर्वांचें मन हरण केलेंस.

स कथं निंद्यः कविभिः संस्थापयितुं पदे प्रशस्ते

नेः ॥ यो ऽमृतसागरफेनस्तेनमिह ततान ते यशस्ते
नेः ॥ ८४ ॥

अर्थ:- ज्यानें आह्मांस उत्तमस्थानीं उत्कृष्ट रीतीनें स्थापन करण्यासा-
ठीं अमृतसागराच्या फेसास तुच्छ करणारें तुझें यश भूलोकीं विस्तृत
केलें त्या यशाचोर ब्रह्मदेवाची निंदा कवीनीं कशी करावी ?

कृच्छ्राद्यददित्यापि दुर्लभमतुलैस्तपोव्रतैश्चीर्णैः ॥
प्राप्ता गोप्यो गावस्तच्छ्वश्रूत्वं श्रियो जगन्मातुः ८५

अर्थ:- अदितीनें अघटित तपें, व्रतें आचरून आयासानें जें दुर्लभ जग
न्माता रूप लक्ष्मीनें श्वश्रूत्व ( सासूपणा ) संपादन केलें तें ब्रह्मदेव-
कृत गोवत्स हरणांत गोपी व गायी यांस अनायासानें प्राप्त झालें.

यद्गोप्यो गावस्त्वामापुरथापत्यमीश्वरं जगतः ॥ नगतः किमिहोत्कर्षं विबुधपराधो ऽपि नाकिनां न गतः ८६

अर्थ:- हे श्रीकृष्णा, गोपी व गायी ह्या तुजला जगदीश्वररूप पुत्रास पा-
वल्या या वरून स्वर्गवासि देवांचा अपराधही या लोकीं पर्वतापेक्षां उत्क
र्षाला प्राप्त झाला नाहीं काय ? असें जाण.

अंगीकृता यदा गोगोपीनां जगद्गुरो सुतता ॥ मूर्तिर्न केवलं तव जाता सत्कीर्तिरपि जगत्सुतता ८७

अर्थ:- हे जगद्गुरो तूं ज्या ब्रह्मकृत गोवत्सहरणकालीं गायी व गोपी यां
चें पुत्रत्व अंगीकारिलेंस त्या कालीं तुझी मूर्तीच केवल व्याप्त झाली अ-
सें नाहीं तर तुझी उत्तमकीर्तीही सर्व जगांत व्याप्त झाली.

विधियशःपशुपसमदृशा गोपकरायत्तबंधमोक्षेण ॥ वत्सोचितेन भगवन् दाम्न्यर्पितकंधरेण तृणमशितं ॥ ८८ ॥

अर्थ:- हे भगवन् आपण ब्रह्मदेव, गोवत्स व गोपाल यांविषयीं समदृष्टि
असल्यामुळें गोपालांच्या हस्ताधीन जो बंध त्याची मुक्तता आणि दाव्यांत
आपली मान घालून राहणें अशा वत्सासारख्या रूपधारणानें तृण भक्षण केलें.

येषां यत्स्वतनुभुवा धनमपहृतमीश सत्यपतिनापि ॥ तेषां तदनूनाधिकमात्मधनं तैर्पितं सदीड्ये-

न ॥ ८९ ॥

अर्थः- हे ईश्वरा सत्यलोकाधिपति ब्रह्मदेवानें ही ज्या गोपी व गायी यांचें जें अपत्यरूप धन हरण केलें होतें त्यांस त्याबद्दल न्यूनाधिकन होई असें साधुसत्कृत्य जो तूं यानें तें आत्मस्वरूप धन अर्पण केलेंस.

सवसंस्कृतहविषोपि प्रापितमुच्चैः पदं त्वया य
त्सं ॥ भवसंतरणेच्छुरहं हंत तृणेष्वपि तेदा न
तेष्ववसं ॥ ९० ॥

अर्थः- त्या वत्सहरण प्रसंगीं तूं यज्ञांतील संस्कारयुक्त होमद्रव्यापेक्षांही गवत श्रेष्ठपदास पावविलेंस आणि मी संसारांतून तरणोपायाची इच्छा करीत असून त्या समयीं मी त्या तृणांतही जन्मून राहिलों नाहीं. तस्मात् हें महाखेदास्पद आहे.

हा हंत तेतेमंतर्भावयतोऽनुग्रहं व्रजे भवतः ॥
मम तदपात्रस्य मनः किं तां चिंतां ब्रवीमि यां
यातं ॥ ९१ ॥

अर्थः- हे परमेश्वरा, आपल्या व्रजांतील त्या त्या अनुग्रहास अंतःकरणांत चिंतन करीत असून मी त्या विषयीं अपात्र असल्यामुळें माझें मन ज्या चिंतेंत निमग्न होतें ती चिंता मी काय सांगूं? कारण त्या चिंतेनें वारंवार बहुत खेद होतो.

वत्सीभूतं ब्रह्म ब्रह्मप्रमुखैर्महात्मभिश्चिंत्यं ॥
त्वां गोगोपीगोपाः पुपुषुः प्रेम्णा तनोच रोमांचं ९२

अर्थः- ब्रह्मादिक महात्म्यानीं वत्सरूप झालेलें ब्रह्म चिंतन करावें आणि गायी, गोपी व गोपाल हे तर प्रत्यक्ष तुला प्रेमानें पोषण करतात तेणेंकरून ते स्वतनूवर हर्षरोमांचही धारण करतात.

स्वर्गाद्गुरुसत्यपदं सत्यपदाद्गुरुतरं च वैकुंठं ॥ वै
कुंठादपि गुरुतमभवनो वृंदावनं मन्ये ॥ ९३ ॥

अर्थः- स्वर्गापेक्षां सत्यलोक श्रेष्ठ, सत्यलोकापेक्षां वैकुंठ अतिश्रेष्ठ व वैकुंठापेक्षांही पृथ्वीवरील वृंदावन सर्वातिशयें श्रेष्ठ आहे असें मी मानतों.

याः पूर्वं न क्वचिदपि कस्मैचिदपि प्रदर्शिताः प्रभु-

णा ॥ अंत्रैव पीतपटता अंटता नटता त्वया कै-

लाः सकलाः ॥ ९४ ॥

अर्थः- प्रभूनें पूर्वी कोठेंही व कोणासही ज्या लीला दाखविल्या ना-
हींत त्या सकलकला आणि सर्व पीतांबरधारिस्वरूपें हीं या कृष्णावता-
रींच तूं वृक्षादि अनेक रूपानीं प्रगट होऊन संचारकरतानां प्रदर्शितकेलींस.

यौ कमलावक्षस्यपि वक्षोजस्पर्शभूरिरक्ततलौ

॥ तौ ते वृंदावनभुवि चंक्रमणं चक्रतुश्चिरं चर-

णौ ॥ ९५ ॥

अर्थः- जे लक्ष्मीच्या वक्षस्थलावरही स्तनांच्या स्पर्शानें तळव्याचे ठि
काणीं अति आरक्त झाले असे तुझे ते कोमल चरण वृंदावनभूमी-
वर संचार बहुकाल करीत होते.

वृंदावने ऽनुभूतं गोपैर्गोपीभिरपि च यद्गोभिः

॥ तन्नंदने ऽपि न सुरैर्नानंदवनेपि पंडितैः शर्म ९६

अर्थः- गोपाल, गोपी व गायी यांनींही वृंदावनांत जें सुख अनुभविलें
तें सुख देवांस नंदनवनांत नाहीं आणि ज्ञानसंपन्नांस आनंदवनांत
ही नाहीं.

चरणसरोजरजोभिर्दिवसरित् कतिपयैः पुरा

प्राप्तैः ॥ महिमानमियं नमिता वृंदावनभूः किमं

किता पदकैः ॥ ९७ ॥

अर्थः- भागीरथी, पूर्वी प्राप्त झालेल्या कांहींएक ज्या चरणकम
लसंबंधि रजःकणानीं लोकोत्तर माहात्म्य पावली तीं प्रत्यक्ष
चरणकमलें कृष्णावतारीं ज्या वृंदावनभूमीवर उमटलीं तीही भू-
मि सर्वांत श्रेष्ठ झाली यांत काय आश्चर्य आहे.

तृणगुल्मव्रततिद्रुमदृषदो वृंदावने ऽत्र धूलिर

पि ॥ सर्वं तीर्थशताधिकमीश्वर तीर्थां घ्रि-

णा कृतं भवता ॥ ९८ ॥

अर्थः- हे ईश्वरा, आपण तीर्थभूत स्वचरणानें या वृंदावनांतील
तृण, झुडपें, वेली, वृक्ष, शिला व धूळ हे सर्वही तीर्थांपेक्षां शत

गुणित अधिक केलेस.

भो कतमो लोकतमो बाह्यं हर्तुं क्षमो न आ-
दित्यात् ॥ तेजस्विलोकपादादंतरमपि लोक
बंधुतस्त्वत्तः ॥ ९९ ॥

अर्थ:- हे भगवन् लोकांतील बाह्य अंधकार हरण करण्यास जसा कोणी समर्थ नाहीं तसा तेजस्विलोकांत ज्याचे चरण असून सर्व लोकांचा बंधु असा जो तूं त्या तुजवांचून लोकांच्या अंतःकरणांतील अज्ञानरूप तम दूर करणारा कोणीही समर्थ नाहीं.

कुंभभवांभोधिरिव स्वेन निरूपेण तेजसा य-
शसा ॥ शौरिभुवा भवता द्रागप्ययमप्यमल
भवो नीतः ॥ १०० ॥

अर्थ:- हे श्रीकृष्णा, आपण वसुदेवापासून प्रगट होऊन निरुपम स्वकीय तेजानें व यशानेंही संसार समूल नाशास शीघ्र पावविला. यास दृष्टांत अगस्त्यऋषीनें समुद्र जसा शुष्क केला तद्वत्.

गोपोपि पंडितानां सर्वेषां संमतः सदा नंदः॥
यत्तैरलब्धगंधस्त्वमपि तदंकं गतः सदानंदः १०१

अर्थ:- नंद गोपाल असूनही सर्वपंडितांस सर्वदा संमत आहे. कारण, त्या पंडितांसही तुझ्या प्राप्तीचा लेश अलभ्य असून पूर्णानंदरूपी प्रत्यक्ष तूं त्या नंदाच्या मांडीवर प्राप्त झालास.

जगति यशोदानंदो धन्यो शिशुना त्वया जग-
द्गुरुणा ॥ उत्कावाश्लिष्य गले यो शतकृत्वस्त्वं-
दांबतातेति ॥ १०२ ॥

अर्थ:- हे भगवन् कृष्णावतारकालीं आपण शेकडो वेळ गळ्या मिठ्या मारून ज्यांस हे अंब ( आई ) हे तात अशा संबोधनानीं आनंदित केलें यास्तव ते यशोदानंद तूं जगद्गुरु असूनही पुत्र झाल्यामुळे सर्वजगांत धन्य झाले.

वृद्धैरलभ्यन्येर्नो मैत्री भवतैव गोपशिशुना
स्तां ॥ वृद्धसखा यामाप्तास्त्वत्तो मुदमाश्वपीह

पशूंना ऽस्त्वां ॥ १०३ ॥

अर्थ- अन्य वृद्धजनांशीं मैत्री पुरे. तर आतां आह्मास तुजगोप शिशूंशींच मैत्री असो. कारण त्या वृद्धांचे मित्र या लोकीं पशुना तीनेंही शकलें असून तुजपासून प्राप्त होणारें जें काम्य कर्मजन्य विषयसुख त्यास शीघ्र पावले.

यममृतमुचो वरं निजकिसलयतो मंस्त देवविटपी तं ॥ किंघोषयोषिदधरं धन्यं ब्रूमो न देवविटपीतं ॥ १०४ ॥

अर्थ- कल्पवृक्षानें आपल्या अमृतस्त्रावि कोमलपल्लवापेक्षां ज्या व्रजस्त्रियांच्या अधरोष्ठास तूं देवरूप जारानें चुंबन केल्यामुळें श्रेष्ठत्व मानलें तस्मात् आह्मी त्याचें धन्यत्वें करून वर्णन करणार नाहीं काय ?

द्राक् द्रवति धीः श्रुते ते यशसि यथा नस्तथा न वेदांते ॥ लब्धरतिः स्वपिति भुवि न पर्यंके ऽप्यन्यथा नवे दांते ॥ १०५ ॥

अर्थ- हे श्रीकृष्णा, तुझ्या श्रवण केलेल्या यशाविषयीं आमची बुद्धि शीघ्र जशी द्रवते तशी वेदांतश्रवणाविषयीं द्रव पावत नाहीं यास दृष्टांत रतिसुख प्राप्त झालेली विलासिनी स्त्री जशी भूमीवर देखील समाधानानें निजते तशी ती, तें सुख प्राप्त झालें नसतां हस्तिदंति नूतन पर्यंकावरही शयन करीत नाहीं.

त्वां सगुणं ब्रह्म वयं निर्गुणमपि नाथ संश्रिताः कवयः ॥ रुचिवैचित्र्यादके ऽलंकृतिमिव हेम केवलमिवान्ये ॥ १०६ ॥

अर्थ- हे नाथ तुझ्या सगुण ब्रह्मरूपाचा आश्रय आह्मी केला असून जे ज्ञानी आहेत त्यानीं तुझ्या निर्गुणरूपाचाही आश्रय केला आहे. यास दृष्टांत कोणी रुचिभेदानें अलंकाराचा अंगीकार करतात व कोणी अन्य केवल सुवर्णाचाच स्वीकार करतात तद्वत्.

कैवल्यं पदमीप्सा ये भक्ता ये च विद्विषस्तेव ते ॥ तेनै श्रिता वयं त्वां ब्रूमो भगवन्न प्रभो नमो

भवन्ते ॥ १०७ ॥

अर्थः- हे भगवन् तुझे जे भक्त व जे द्वेषी ते सर्वही मोक्षपदास प्राप्त झाले त्या कारणानें हे प्रभो, आम्ही तुझा आश्रय करून तुला नमस्कार करतों.

सकलं स्वं वयः कवयस्तव यत्र वयस्यमृतकरमूह सः ॥ स्फुरयशः काले देशे व्यवहारे नन्नयंति तत्रैव १०८

अर्थः- हे भगवन् ज्या बाल्य तारुण्यादि वयोवस्थेंत, ज्या क्षणलवादि कालांत, ज्या देशांत व ज्या व्यवहारांत चंद्रासमान तापत्रयनाशक तेजयुक्त तुमचें उत्तमयशगायन चालत असेल त्याच वयादिकांत ज्ञानिजन स्वकीय सकलवय घालवितात.

सरसि सरोजमिव त्वयि हृदयमिदं नः सजीवने वसतु ॥ तत्र श्रीरिव भक्तिश्चात्रापि परंतु सैव मास्तु चला ॥ १०९ ॥

अर्थः- उत्तम उदकयुक्त सरोवरांत कमल जसें असतें तसें उत्कृष्ट जीवनरूप तुझे ठिकाणीं आमचें हें अंतःकरण वास करो. आणि कमलावरी लक्ष्मीप्रमाणें माझ्या अंतःकरणांत भक्ति असो परंतु त्यांतही ती लक्ष्मीसारखी चंचल नसो.

गीत्या मृग इव कुशलैः कामी प्रभुरिव सरूपया ऽर्पितया ॥ भक्त्या भागवतैस्त्वं भगवन् बहुभिर्वशीकृतो ऽस्याशु ॥ ११० ॥

अर्थः- गायनानें मृग जसा वश करितात व कुशल जसे सरूप कन्या अर्पण करून कामी प्रभु वश करितात तद्वत् हे भगवन् तुला बहुत भगवद्भक्तांनीं भक्तीनें शीघ्र वश केलें आहे.

हन्त्रस्तं कस्य कवेः कालाच्छ्रुतरत्नसानुकंपस्य ॥ तव संश्रयेन्न पादौ श्रितचिंतारत्नसानुकंपस्य ॥ १११ ॥

अर्थः- कालवेगानें मेरुपर्वतासही चलत्व प्राप्त होतें असें श्रवण केलेल्या कोणत्या कवीचें अंतःकरण त्रस्त होऊन आश्रितांस चिं-

तामणितुल्य परम सदय अशा तुझ्या चरणाचा आश्रय करणार नाहीं ?

इतिमोरोपंतकृत कृष्णपरमुक्तामालार्याशतकं समाप्तम्

---

## अथशंकराचार्यकृत सदाशिवब्रह्मार्याप्रारंभः

वटतरुनिकटनिवासं पटुतरविज्ञानमुद्रितकराब्जं ॥ कंचिद्देशिकमाद्यं कैवल्यानंदकंदलं वंदे ॥ १ ॥

अर्थः- वटवृक्षासमीप वास करणारा असून ज्याचें हस्तकमल अतिकुशल विज्ञानमुद्रेनें युक्त आणि मोक्षानंदकंदाचा दांना अशा कोणी आद्य गुरूस मी नमस्कार करतों.

निरवधिसंसृतिजलनिधिनिपतितजनतारणस्फुरन्नौकां ॥ परतत्वभेदगुटिकां परमशिवेंद्रस्य पादुकां नौमि ॥ २ ॥

अर्थः- अपार संसारसमुद्रांत पडलेल्या जनांस तारण्या विषयीं देदीप्यमान नौकारूप असून परतत्वाच्या भेदास गुटिकारूप अशा परमशिवेंद्राच्या पादुकांस मी नमस्कार करतों.

देशिकपरमशिवेंद्रादेशावशाद्बुद्धदिव्यमहिमाहं ॥ स्वात्मनि विश्रांतिकृते सरसं प्रस्तौमि किंचिदिदं ॥ ३ ॥

अर्थः- मी परमशिवेंद्र गुरूच्या आज्ञेवरून जाणलेला दिव्य महिमा आपल्या आत्मस्वरूपीं विश्रांति होण्यासाठीं सरस रीतीनें हें किंचित् वर्णितों.

निरुपमनित्यनिरीहो निष्कलनिर्मायनिर्गुणाकारः ॥ विगलितसर्वविकल्पः शुद्धो बुद्धश्चकास्ति परमात्मा ॥ ४ ॥

अर्थः- उपमा, उत्पत्ति, नाश, इच्छा, कला, माया, गुणाकृति व सर्व विकल्प यानीं रहित असा शुद्धज्ञानरूप परमात्मा प्रकाशित अ-

स्वाविद्यैकनिबद्धः कुर्वन्कर्माणि मुह्यमानः सन्॥
दैवाद्विधूतबंधः स्वात्मज्ञानात् सदा मुनिर्जयति ५

अर्थः- स्वकीय एका अज्ञानानें अत्यंत बद्ध झाल्यामुळें मोहित हो-ऊन कर्में करीत असून पुढें दैवानें अज्ञानबंधांतून मुक्त झाला असतां मुनि आपल्या आत्मज्ञानानें निरंतर सर्वोत्कर्षे करून वर्ततो.

मायावशेन सुप्तो मध्ये पश्यन् सहस्रशः स्वप्नान् ॥ देशिकवचः प्रबुद्धो दीव्यत्यानंदवारिधौ कोपि॥ ६॥

अर्थः- कोणी एक अनिर्वचनीय पुरुष मायेच्या योगानें निद्रित झाल्यामुळें मध्यें हजारो स्वप्नें पहात असून गुरुवाक्यानें जागृत होऊन आनंदसमुद्रांत क्रीडा करतो.

प्राकृतभावमपास्य स्वीकृतनिजरूपसच्चिदानंदः॥ गुरुवरकरुणापांगाच्छ्रेष्ठमासीदति प्राज्ञः ७

अर्थः- ज्ञानी, श्रेष्ठगुरूच्या करुणाकटाक्षानें मायिक भाव त्यजून स्वकीय सच्चिदानंदरूप स्वीकारून श्रेष्ठत्व पावतो.

श्रीगुरुकृपया सच्चित्सुखनिजरूपे निमग्नधी मौनी ॥ विहरति कश्चन बुद्धः शांताहंतो नितांतमुदितांतः॥ ८॥

अर्थः- श्रीगुरुकृपेनें मौनशील, अहंता रहित व अंतः करणांत अत्यंत आनंदित असा कोणी ज्ञानवान् सच्चिदानंद स्वरूपीं निमग्नबुद्धि होऊन क्रीडा करतो.

गुरुवरकरुणालहरीव्यतिकरभरशीतलस्वांतः॥
रमते यतिवरएको निरुपमसुखसीमनि स्वैरं॥ ९

अर्थः- श्रेष्ठगुरूच्या करुणालहरीचे अखंड प्रवाहाच्या अतिशयानें-शीतलांतःकरण झालेला अनुपम कोणीएक यतिश्रेष्ठ सुखसमुद्रांत यथेच्छ रमतो.

श्रीदेशिकवरकरुणारविकरगमितोदितांतरध्वांतः॥ विहरन् मस्करिवर्यो निरवधिकानंदवारिधा-

वास्ते ॥ १० ॥

अर्थः- श्रीगुरुश्रेष्ठाच्या करुणासूर्यकिरणानीं ज्याच्या अंतःकरणांतील उदय पावलेल्या अज्ञानांधकाराचा नाश झाला तो यतिश्रेष्ठ अपरिमित आनंदसमुद्रांत विहार करीत आहे.

जनिविपरीतक्रमतो बुद्ध्या प्रविलाप्य पंचभूतानि ॥ परिशिष्टमात्मतत्वं पश्यन्नास्ते मुनिः शांतः ११

अर्थः- उत्पत्तीच्या विपरीत क्रमानें पंचभूतांचा लय करून शेष राहिलेलें आत्मतत्व बुद्धीनें पहात शांत मुनि असतो.

जगदखिलमिदमसारं मायिकमेवेति मनसि मन्वानः ॥ पर्यटति पाटिताशः प्रगलितमदमानमत्सरः कोऽपि ॥ १२ ॥

अर्थः- हें सर्व जग असार व मायिकच आहे असें मनांत मानणारा कोणीएक अनिर्वाच्य पुरुष सर्वत्र निराशा आणि गर्व, प्रतिष्ठा व मत्सर इत्यादिकांपासून मुक्त होऊन संचार करतो.

नात्मनि किंचिन्माया तत्कार्यं वास्ति वस्तुतो विमले ॥ इति निश्चयवानंतर्हृष्यत्यानंदनिर्मदो योगी ॥ १३ ॥

अर्थः- माया व तिचें कार्य महत्तत्वादिक हें किंचित्‌ही वस्तुतः निर्मल अशा आत्मस्वरूपीं आहे असें नाहीं असा निश्चययुक्त असून निजानंदानें निरभिमान झालेला योगी अंतःकरणांत हर्ष पावतो.

त्वमहमभिमानविहीनोऽमोहितनानाजनाचारः ॥ विहरति बालवदेको विमलसुखांभोनिधौ मग्नः ॥ १४ ॥

अर्थः- तूं, मी अशा अभिमानानें रहित व अनेक लोकाचारानीं मोहित न होणारा असा निर्मल सुखसमुद्रांत निमग्न झालेला योगी बालासारखा एकटाच क्रीडा करतो.

अवधूतकर्मजालो जडबधिरांधोपमः कोऽपि ॥ आत्मारामो यतिराडटविकोणेषु पर्यटन्नास्ते १५

**अर्थः**– सर्व कर्मजालाचा त्याग केला असून मूढ, बहिरा किंवा अंध यांसमान वृत्ति धारण करून आत्मस्वरूपीं रममाण असा कोणी अद्भुत यतिराज अरण्याच्या कोपऱ्यांत फिरत असतो.

शांत्या धृतोपगूढः शांतसमस्तोन्यवेदनोदारः ॥
रमते रसज्ञ एको रम्ये स्वानंदपर्यंके ॥ १६ ॥

**अर्थः**– शांतीनें आलिंगित असल्यामुळें ज्याच्या समस्त अन्यवेदना शांत झाल्या आहेत असा उदार एकाकी रसज्ञ योगी, रम्य अशा निजानंद पर्यंकावर रमतो.

उन्मूलितविषयारिः स्वीकृतवैराग्यभाग्यसर्वस्वः ॥ स्वात्मानंदमहिम्नि स्वाराज्येऽस्मिन् विराजते यतिराट् ॥ १७ ॥

**अर्थः**– विषयरूप शत्रूंचा समूल नाश करून वैराग्य भाग्यरूप सर्वस्वाचा स्वीकार ज्यानें केला असा यतिराजा ह्या निजात्मानंदरूप महिमायुक्त सायुज्यपदीं शोभतो.

सवितर्यपि शीतरुचौ चंद्रे तीक्ष्णेऽप्यधोवहत्यग्नौ ॥ मायिकमिदमिति जानन् जीवन्मुक्तो न विस्मयी भवति ॥ १८ ॥

**अर्थः**– सूर्यही शीतकांति व चंद्र तीक्ष्ण किरण होऊन अग्निज्वाला ही अधोभागीं जाऊं लागल्या असें अघटित घडलें तरी हें मायिक आहे असें जाणणारा जीवन्मुक्त योगी विस्मय पावत नाहीं.

अज्ञानवैरिविजयी प्रज्ञामातंगमस्तकारूढः ॥ विहरति संयमिराजः समरससुखधाम्नि सर्वतो रम्ये ॥ १९ ॥

**अर्थः**– बुद्धिरूप गजाच्या मस्तकावर आरूढ झालेला असून अज्ञानरूप शत्रूचा पराजय करणारा यतिराज सर्वांपेक्षां रमणीय अशा समरस सुखस्वरूपीं रमतो.

शांताहंकृतिदोषाः सुसमानाः सुमनसः केपि ॥
पूर्णेंदुशिशिरभावा राजंत्यानंदसत्यचिद्रसिकाः २०

अर्थः- अहंकार दोषांतून मुक्त, उत्तम समदृष्टि, पूर्णचंद्रासमान शीतल स्वभावयुक्त व सच्चिदानंद ब्रह्माविषयीं रसिक असे कितीएक अद्भुत उत्कृष्ट मनाचे योगी शोभतात.

निर्वृत्तः परत्र धाम्नि स्वीयसुखास्वादपरवशः कोऽपि॥ क्वापि ध्यायति कुहचिद् गायति कुत्रापि नृत्यति स्वैरं॥ २१॥

अर्थः- परब्रह्मस्वरूपीं स्थित असून स्वरूपसुख भोगानें पराधीन इति झालेला कोणी विचित्र योगी कदाचित् ध्यान करतो, क्वचित् गायन करतो व कोठेंही यथेच्छ नृत्य करतो.

अगृहीतांककलंकः प्रशमितसंकल्पविभ्रमः प्राज्ञः॥ न्यक्कृतकार्यकलापस्तिष्ठत्यापूर्णसीमनि क्वापि॥ २२॥

अर्थः- ज्यानें चिन्हरूप कलंक ग्रहण केला नसून अनेक संकल्परूप भ्रम दूर केले आणि सांसारिक कार्यसमुदाय तिरस्कृत केला असा ज्ञानसंपन्न योगी कोणत्याही अप्रतिम अत्यंत पूर्णमर्यादायुक्त आनंद समुद्रांत वर्ततो.

चपलं मनः कुरंगं चारु गृहीत्वा विमर्शवागुरया॥
निगमारण्यविहारः शांतः शेते स्वधाम्नि कोप्येकः २३

अर्थः- ब्रह्मविचाररूप जाळ्यानें चंचलमनरूप हरिणास उत्तमरीतीनें बद्ध करून वेदस्वरूप अरण्यांत विहार करणारा कोणी एक अप्रतिम शांत योगी स्वस्वरूपीं शयन करतो.

दारुणचित्तव्याघ्रं धीरमनः खड्गधारया हत्वा
॥ अभयारण्ये कोपि स्वैरविहारी जयत्येकः॥ २४॥

अर्थः- अभयारण्यांत यथेच्छ संचार करणारा कोणीएक अपूर्व योगी धैर्ययुक्त मनरूप खड्गाच्या धारेनें भयंकर चित्तरूप व्याघ्रास मारून सर्वोत्कर्षानें वर्ततो.

सज्जनहृदयसरोजोन्मीलनकरधीकरप्रसरः॥
एकोयमेव पुरुषो निर्दोषश्चरति चिद्गगने॥ २५॥

अर्थः- सज्जन हृदयरूप कमलास प्रफुल्लित करणाऱ्या सूर्या सारखा बुद्धीच्या वृत्तिरूप किरणसमुदायानें युक्त असा एक ह्राच निर्दोष विद्वान् पुरुष चिदाकाशांत संचार करतो.

कुवलयविकासकारणमज्ञानध्वांतकौमुदिभाज्ञः ॥शुद्धो मुनींद्रचंद्रः सुरसेव्यो लसति विष्णुप दे ॥ २६ ॥

अर्थः- कमलें विकसित होण्यास कारणभूत असून अज्ञानरूप अंधकारनाशक ज्ञानकांतीनें युक्त व देवानीं सेवित असा शुद्ध मुनिश्रेष्ठरूप चंद्र आकाशांत शोभतो.

स्वानंदामृतसेकैरांतरसंतापसंततिं शमयन् ॥ चित्ते ऽचंचलवृत्तिश्चिद्व्योमनि भाति योगिवर्यघनः ॥ २७ ॥

अर्थः- निजानंदरूप अमृताच्या सिंचनानें अंतःकरणांतील संतापप्रवाहाचा नाश करणारा अचंचल चित्तवृत्तियुक्त योगिश्रेष्ठरूपी मेघ चिदाकाशांत शोभतो.

सुमनः सौरभमंजुलसंचारनिवारिताखिलभ्रांतिः ॥ संयमिचारुसमीरो विहरत्यानंदसंविदारामे ॥ २८ ॥

अर्थः- उत्तमपुष्परूप मनाच्या सुगंधतुल्य सौम्यवृत्तीनें सर्व भ्रांतीचें निवारण करणारा उत्तमवायुरूपी इंद्रियनिग्रहवान् योगी, आनंदज्ञानरूप बागेंत संचार करतो.

निःश्रेयससरसफले निर्मलविज्ञानपल्लवमनोज्ञे ॥ वितते निर्भयविपिने यतिशितिकंठो विभाति कोप्येकः ॥ २९ ॥

अर्थः- मोक्षरूप सरसफलयुक्त असून निर्मल विज्ञानरूप कोमल पल्लवानीं सुंदर व विस्तृत अशा निर्भय अरण्यांत कोणी एक अद्भुत यतिरूपी शंकर शोभतो.

निःसारभुवनमरुतलमुत्सार्यानंदसारसंपूर्णे ॥ वरसरसि चिन्मयेस्मिन् परहंसः कोपि दीव्यति स्वैरं ॥ ३०

अर्थः- कोणी अपूर्व श्रेष्ठहंस निःसार भुवनरूप निर्जल देशाचा त्याग क-

रून ब्रह्मानंद रसपूर्ण, चिन्मय अशा या श्रेष्ठ सरोवरांत यथेच्छ क्रीडा करतो.

निखिलागमपल्लविते निगमशिरस्तंत्रशीतलोद्याने ॥ मधुरतरमंजुवाचः कूजन्त्यास्ते कवींद्रकलकंठः ॥ ३१ ॥

अर्थः- सर्व वेदरूप नूतन पल्लवानीं विस्तृत असून उपनिषद् सिद्धांतानीं शीतल अशा बागेंत ज्ञानिश्रेष्ठरूपी कोकिल अतिमधुर मंजुलवाणीनें शब्द करीत आहे.

दारितमोहमहेभो दूरीकृतसकलदुरितशार्दूलः ॥ विबुधोत्तमसिंहवरो विहरत्यानंदविततकांतारे ॥ ३२

अर्थः- मोहरूपि महागजांचें विदारण करणारा असून पापरूपि सर्व व्याघ्रांस दूर करणारा असा उत्तमज्ञानिरूपी श्रेष्ठ सिंह विशाल आनंद वनांत क्रीडा करतो.

अज्ञानमृगवरोज्झितविज्ञानोत्तुंगशृंगशिखरितले ॥ मतिसलिलशीतलांगो यतिवरकलभो विराजते विहरन् ॥ ३३ ॥

अर्थः- अज्ञानरूप सिंहानें टाकलेलें असून विज्ञानरूप उंच शिखर युक्त पर्वताच्या अधोभागीं बुद्धिरूप उदकानें शीतलांग झालेला श्रेष्ठ यतिरूपी गजबालक क्रीडा करीत शोभतो.

नासाचलनिहिताक्षो ग्रामादिभ्यो निवर्तितस्वांतः ॥ तटिनीतटेषु तत्वं ध्यायन्नास्ते मुनिः कोपि ॥ ३४ ॥

अर्थः- कोणी उत्तम भावनायुक्त मुनि नासिकाग्रीं अचलदृष्टि ठेवून ग्रामरूपात्मक विषयांवरील अंतःकरण परावृत्त करून नदीतीरीं आत्मस्वरूप तत्वाचें ध्यान करीत असतो.

आशावसनो मौनी नैराश्यालंकृतिः शांतः ॥ करतलभिक्षापात्रस्तरुतलनिलयो मुनिर्जयति ॥ ३५ ॥

अर्थः- दिशारूप वस्त्र पांघरून निराशारूप अलंकारानें भूषित, तळहातच भिक्षापात्र करून वृक्षाच्या अधोभागीं वास करणारा असा

मौनधारी शांत मुनि सर्वोत्कर्षे करून वर्ततो.

राकाहिमकरदीपो राजति यतिराजशेखरः कोपि
भूतलमृदुतरशय्यः शीतलवातैकचामरः शांतः ॥३६

अर्थ:- पूर्णिमाचंद्ररूप दीपप्रकाशयुक्त, भूतलरूप अतिमृदुशय्येवर शयन करणारा असून शीतल वायुरूप एका चवरीनें शोभायमान वशांत असा कोणी अद्भुत यतिराजाधिराज शोभतो.

विजनावनिकुंजगृहे मंजुलपुलिनैकमंजुतरतल्पे
॥शेते कोपि यतींद्रः शमसमसुखबोधवस्तुनि
स्तंद्रः॥ ३७॥

अर्थ:- निर्जनभूमिरूप लतावेष्टित गृहांत सुंदर वाळवंटरूपच अति मृदुशय्येवर कोणी अद्भुत यतिश्रेष्ठ शांतीनें झालेल्या पूर्णसुखबोधेंकरून अज्ञानतंद्रा रहितवस्तुरूप होऊन शयन करतो.

विपुलशिलातलफलके विमलसरिद्वारिपरिवृत
द्वारे॥ मंदं मलयजपवने वाति प्रस्वपिति कोपि
यतिराजः॥ ३८॥

अर्थ:- निर्मल नदीजलानें ज्याचा द्वारप्रदेश वेष्टित आहे अशा विशाल शिलातलाच्या प्रदेशावर मलयपर्वत संबंधि वायु मंदगतीनें वहात असतां कोणी अपूर्व यतिराज निद्रा करतो.

आंतरमेनकिंचन संततमनुसंदधन् महामोनी
॥करपुटभिक्षामश्नन् नटतिह वित्यां जडाकृतिः
कोपि॥ ३९॥

अर्थ:- कोणी लोकविलक्षण जडाकृति महामौनी ओंजळींत येणारी भिक्षा भक्षीत असून अंतःकरणांत ब्रह्मस्वरूप कांहींएक वस्तु सतत चिंतन करीत ज्ञानावस्थेंत क्रीडा करतो.

प्रविलाप्य जगदशेषं परिशिष्टाखंडवस्तुपरतं-
त्रः॥ अश्नाति कवलमास्ये प्राप्तं प्रारब्धकर्मणा
कोपि॥ ४०॥

अर्थ:- कोणीएक विचित्र योगी सर्व जगाचा लय करून अवशिष्ट

ब्रह्मवस्तूच्या परतंत्रतेनें असून प्रारब्धकर्मानें मुखांत प्राप्त झालेला ग्रास भक्षितो.

निंदति किंचन न मनाक् निंदितनानाजनाचारः॥
चंदनशीतलहृदयो विहरत्यानंदवारिधिः कोपि ४१

**अर्थः-** लोकांची कांहीं अल्पही निंदा करीत नाहीं आणिज्यानें पामरजनांचा आचार निंदित आहे व ज्याचें हृदय चंदनासमान शीतल आहे असाकोणी अद्भुत आनंदसमुद्ररूपी योगी क्रीडा करतो.

संत्यज्य शास्त्रजालं व्यवहारं च सर्वतस्त्यक्त्वा॥
आश्रित्य पूर्णपदवीमास्ते निष्कंपदीपवद्योगी ४२

**अर्थः-** शास्त्रसमुदाय सोडून व सर्व व्यवहार त्यजून पूर्ण ब्रह्मपदवीचा आश्रय करून योगी अचलदीपासमान निश्चल स्थितीनें असतो.

तृणपर्णार्चितांगस्तृणमयविश्वं विलोकयन् योगी ॥ विहरति रहसि वनांते विजयामरभूम्नि विश्रांतः॥ ४३॥

**अर्थः-** तृणपर्णांनीं अंग शोभित करून सकलविश्व तृणतुल्य पाहणारा योगी वनाच्या प्रांतभागीं एकांतीं विजयरूप अक्षय्य स्वरूपसुखांत विश्रांति पावून क्रीडा करतो.

पश्यति किमपि न रूपं न वदति न शृणोति किंचिदपि वचनं॥ तिष्ठति निरुपममहिमनि निष्ठामवलंब्य काष्ठवद्योगी॥४४॥

**अर्थः-** योगी कांहींएक रूप पहात नाहीं, भाषण करीत नाहीं, किंचितही भाषण ऐकत नाहीं. तर अनुपम महिमायुक्त ब्रह्मस्वरूपीं स्थिति पावूनकाष्ठासारखा अचलतेनें वर्ततो.

जात्यभिमानविहीनो जंतुषु सर्वत्र पूर्णतां पश्यन्॥ गूढश्चरति यतींद्रो मूढवदखिलार्थतत्वज्ञः ४५

**अर्थः-** जातीच्या अभिमानानें रहित असून सर्वप्राणिमात्रांत पूर्णता पहाणारा व सकल अर्थांचें तत्व जाणणारा असा यतिश्रेष्ठ लोकांत मूढासारखा गुप्तरीतीनें संचार करतो.

उपधाय बाहुमूलं परिधायाकाशमवनिमास्तीर्य ॥ प्रस्वपिति विरतिवनितां परिरभ्यानंदपरवशः कोपि ॥ ४६ ॥

अर्थः- बाहुमूलाची उशी करून आकाश पांघरून पृथ्वी आंथरून विरक्तिस्त्रीला आलिंगून आनंदपरवश झालेला कोणी अद्भुतयोगी शयन करतो.

वैराग्यविपुलमार्गं विज्ञानोद्दामदीपकोद्दीप्तं ॥ आरुह्यतत्वहर्म्ये मुक्तिविलासःस मोदते यतिराट् ॥ ४७ ॥

अर्थः- विज्ञानरूप उत्कृष्ट दीपानें प्रकाशित असून वैराग्यरूप महामार्गानें युक्त अशा आत्मतत्वरूप माडीवर चढून मुक्तीशींसहवर्तमान विलास करणारा तो पूर्वोक्त यतिराजा आनंद पावतो.

विजनवनोत्पलमालां परितो वैतृष्ण्यकल्पवल्लीं च ॥ अवमानामृतगुटिका मात्मज्ञः कोपि गृह्णाति ॥ ४८ ॥

अर्थः- कोणी एक आत्मस्वरूपज्ञ योगी निर्जनवनरूप कमलमाला धारण करून सर्वत्र निराशारूप कल्पवल्लीचा आश्रय करून अपमानरूप अमृताची गुटिका ग्रहण करतो.

न निषेधति दोषधिया गुणबुद्ध्या वा न किंचिदादत्ते ॥ आविद्यकमखिलमिति ज्ञात्वोदास्ते मुनिः कोपि ॥ ४९ ॥

अर्थः- कोणी एक मुनि दोषबुद्धीनें निषध करीत नाहीं व गुणबुद्धीनें किमपि घेत नाहीं, तर हें सर्व गुणदोषप्रकरण अज्ञान कल्पित असें जाणून लोकांत उदासीन असतो.

भूतं किमपि न मनुते भावि च किंचिन्न चिंतयत्यनतः ॥ पश्यति न पुरोवर्त्यपि वस्तु समस्तार्थसमरसः कोपि ॥ ५० ॥

अर्थः- ब्रह्मस्वरूपत्वें करून सर्व अर्थ पाहणारा समदृष्टिपूर्ण योगी कि-

मपि भूतकालीं झालेलें मानीत नाहीं आणि किंचित् भविष्य अंतःकरणांत चिंतित नाहीं व पुढें असणारीही वस्तु अवलोकन करीत नाहीं.

निग्रहिताखिलकरणो विनिर्जितोशेषविषयो हि ॥
तृप्तिमनुपमां प्राप्तो भूमौ पर्यटति कोपि यतिवर्यः ५१

अर्थः- सर्व इंद्रियांचा निग्रह करून सकल विषय जिंकून अनुपम तृप्ति पावलेला असा कोणी अद्भुत यतिश्रेष्ठ पृथ्वीवर संचार करतो.

संत्यजति नोपपन्नं संपन्नं नैव वांछति कापि ॥ स्वस्थः शेते यतिराडंतरमानंदमनुभवन्नेकः ॥ ५२ ॥

अर्थः- प्राप्त झालेलें टाकीत नसून प्राप्त न झालेल्याची कोठेंही इच्छा करीत नाहीं आणि आत्मस्वरूपांतर गत आनंदाचा अनुभव घेत असून एकाकी यतिराज स्वस्थ शयन करतो.

कामपि विमलां पदवीमासाद्यानंदसंविदुन्निद्रां ॥
आस्ते भिक्षुक एको विहरन्निर्मुक्तबंधनः स्वैरं ॥ ५३ ॥

अर्थः- आनंद व ज्ञान एतद्युक्त उत्कृष्ट निद्रारूप काहींएक लोकोत्तर श्रेष्ठ पदवीला प्राप्त होऊन एकाकी यति बंधांतून मुक्त होऊन यथेच्छ क्रीडा करीत असतो.

वस्तुन्यस्तमिताखिलविश्वविहारो विलीनमनाः ॥
राजति परानपेक्षो राजा ऽखिलवीतरागाणां ॥ ५४

अर्थः- विश्वसंबंधि सृष्ट्यादि अपरिमित सकल लीलांचा लय आत्मस्वरूपीं करून ज्याचें मनही अत्यंत लीन झालें असा सर्व विरक्तांचा राजा इतरांची अपेक्षा न करितां स्वयमेव शोभतो.

आचार्यापांगदृशा समवाप्तानंदसंविदाकाशः ॥
प्रशमितसकलविभेदः परहंसः कश्चिदाभाति ५५

अर्थः- गुरुकृपाकटाक्ष दर्शनें आनंद व ज्ञान यांचा प्रकाश उत्तम रीतीनें प्राप्त झालेला असून ज्याचे सकल भेद अतिशांत झाले असा कोणी परमहंस योगी शोभतो.

वर्णाश्रमव्यवस्थामुत्सार्य विधूय विद्यादीन् ॥
परिशिष्यते यतींद्रः परिपूर्णानंदबोधमात्रेण ५६

अर्थः- वर्ण व आश्रम यांसंबंधि व्यवस्था दूर करून आणि विधिनिषे धादिक टाकून यतिश्रेष्ठ परिपूर्णानंदबोधमात्रस्वरूपानें अवशिष्ट राहतो.

क्षयमुपनीय समस्तं कर्म प्रारब्धकं भुक्त्वा ॥ प्रगलि
तदेहबंधः प्राज्ञो ब्रह्मैव केवलं भाति ॥ ५७ ॥

अर्थः- सर्व प्रारब्ध कर्माचा भोगून क्षय करून ज्याचा देहबंध गलि त झाला तो ज्ञानी केवल ब्रह्मस्वरूपानेंच शोभतो.

स्तिमितमनंतमनाख्यं ततमतुलानंदबोधघनं
॥ अविकल्पमेकमाद्यं सन्मात्रं विद्यते किमपि ५८

अर्थः- आर्द्रभावयुक्त, उत्पत्ति,नाश व नाम यानीं रहित असून अप्रति म आनंदबोधघन, विकल्पहीन, अद्वितीय, अनादि आणि त्रिकालीं स-त्यरूप असें कांहींएक ब्रह्मरूप वस्तु सर्वत्र व्याप्त आहे.

स्फुरतरमपरमदूरं यत्संसारवारिधेस्तीरं ॥ स-
मरसमभयमपारं सत्किंचन दीव्यते किमपि ॥ ५९

अर्थः- अतिस्फुरद्रूप, अद्वितीय, अतिसन्निध, संसारसमुद्राचें तीरभू त, समरस, भयरहित, अपार असें जें कांहीएक अनिर्वचनीय सत्यस्व-रूप ब्रह्म तें निजरूपीं क्रीडा करीत आहे.

अरसमगंधमरूपं विरजस्कमसत्त्वतमस्कं ॥ निरु
पमनिर्भयतत्त्वं तत् किमपि द्योतते तत्त्वं ॥ ६० ॥

अर्थः- रस, गंध व रूप यानीं रहित असून रज, सत्व व तम या गुणा नीं हीन आणि उपमारहित व निर्भय असें जें कांहींएक तत्व तें सदा शिवरूप तत्व शोभत आहे.

इति गुरुकरुणापांगादार्याभिर्व्यधिकषष्टिसंख्या
भिः ॥ निरवद्यानुभवोत्थं निगमशिरस्तंत्रसारभूतार्थं ६१

अर्थः- अशा गुरूच्या करुणाकटाक्षावरून बासष्ट आर्यांनीं निर्दोष अनुभवजन्य असून वेदशिरस्थानापन्न उपनिषदांतील मुख्य सिद्धां तरूप सारभूत असा अर्थ प्रतिपादन केला आहे.

गदितमिदमात्मविद्याविलासमनुवासरं स्मरन् विबु-
धः ॥ परियातपदप्राप्तविद्यः प्रपद्यते संपदि परमार्थं ६२

**अर्थः**- आत्मज्ञानविलासरूप जें हें वर्णन केलें याचें मनन करणारा ज्ञानी पुरातन योगिजनास प्राप्त झालेल्या पदाचें ज्ञान होऊन तत्क्षणीं परमार्थ पावतो. इतिश्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमच्छंकराचार्यविरचितःसदाशिवब्रह्मार्याश्रीब्रह्मविद्याविलासः संपूर्णः

## अथप्रबोधसुधाकरार्याप्रारंभः

### देहनिंदाप्रकरणं

नित्यानंदैकरसं सच्चिन्मात्रं स्वयंज्योतिः॥ पुरुषो
त्तममजमीशं वंदे श्रीयादवाधीशं॥ १॥

**अर्थः**- नित्यानंदरूप एकरसानें पूर्ण असून सत्य व ज्ञान एतत्स्वरूप, स्वयं प्रकाश, पुरुषश्रेष्ठ व अनादि असा जो यादवाधीश प्रभु त्यास मी वंदन करतों.

यं वर्णयितुं साक्षात् श्रुतिरपि मूकेव मौनमावह
ति॥सोऽस्माकं मनुजानां किं वाचां गोचरो भवति॥२

**अर्थः**- ज्याचें वर्णन करण्याविषयीं साक्षात् वेदही मुक्यासारखें मौन धारण करतो तो परमात्मा आह्मा मानवांच्या वाणीस प्राप्त होतो काय?

यद्यप्येवं विदितं तथापि परिभाषितो भवेदेव॥
अध्यात्मशास्त्रसाराद्धरिचिंतनकीर्तनाभ्यासात् ३

**अर्थः**- असें जरी समजलें तरी वेदांतशास्त्रांतील तात्पर्य व हरीचें चिंतन व कीर्तन यांच्या अभ्यासानें वर्णिला जाईलच.

क्लृप्तैर्बहुभिरुपायैरभ्यासज्ञानभक्त्याद्यैः॥ पुंसो
विना विरागं मुक्तेरधिकारिता न स्यात्॥ ४॥

**अर्थः**- पुरुषास अभ्यास,ज्ञान व भक्ति इत्यादिक बहुत निश्चित उपायानीं वैराग्यावांचून मुक्तीचा अधिकार प्राप्त होत नाहीं.

वैराग्यमात्मबोधो भक्तिश्चेति त्रयं गदितं॥ मुक्तेः
साधनमादौ तत्र विरागो वितृष्णता प्रोक्ता॥५॥

**अर्थः**- वैराग्य, आत्मज्ञान व भक्ति हें तीन प्रकारचें मुक्तीचें साधन आरंभीं विहित आहे त्यांत निरिच्छतेला वैराग्य असें म्हणतात.

सा चाहंममताभ्यां प्रच्छन्ना सर्वदेहेषु॥ तत्राहं

ता देहे ममता भार्यादिविषयेषु ॥ ६॥

अर्थः- ती निरिच्छता सर्व देहांत अहंकार व ममता यानीं आच्छादित आहे आणि त्यांतील अहंकार स्वदेहावर असून ममता भार्यादि विषयांवर असते.

देहः किमात्मकोऽयं कः संबंधोऽथवा विषयैः॥ एवं विचार्यमाणेऽहंता ममता निवर्तेत ॥ ७॥

अर्थः- हा देह स्वरूपतः कसला आहे अथवा त्याचा संबंध तरी विषयांशीं काय आहे असा विचार केला असतां अहंता व ममता त्या दोन्ही निवृत्त होतील.

स्त्रीपुंसोः संयोगात् संपाते शुक्रशोणितयोः॥ प्रविशञ्जीवः शनैकैः स्वकर्मणा गर्भमालभते॥८

अर्थः- स्त्रीपुरुषांच्या समागमानें शुक्र व रक्त यांचें पतन झाल्यावर त्यांत जीव स्वकर्मानें प्रवेश करून हळूच गर्भाशयांत प्राप्त होतो.

मातृगुरूदरदर्यां कफमूत्रपुरीषपूर्णायां॥ जठराग्निज्वालाभिर्नवमासं पच्यते जंतुः ॥ ९॥

अर्थः- कफ, मूत्र व विष्ठा यानीं पूर्ण अशा मातेच्या मोठ्या उदररूप गुहेंत प्राणी जठराग्नीच्या ज्वालानीं नवमास पर्यंत पचत असतो.

दैवात्प्रसूतिसमये शिशुरस्तिरश्चीनतां यदायाति॥ शस्त्रैर्विखंड्य स तदा बहिरिह निष्कास्यतेऽतिबलात् ॥ १०॥

अर्थः- पुढें प्रसूतिकालीं बालक दैवयोगानें जेव्हां वांकडा येतो तेव्हां लोक अत्यंत बलात्कारानें शस्त्रानीं तुकडे करून येथें त्यास बाहेर काढितात.

अथवा यंत्रच्छिद्राद्यदा तु निःसार्यते प्रबलैः॥ प्रसवसमीरैश्च तदा यः क्लेशः सोप्यनिर्वाच्यः॥११

अर्थः- अथवा ज्या कालीं प्रबलप्रसूतिवायूनीं गर्भ योनिद्वारांतून बाहेर टाकला जातो त्या कालीं जो क्लेश होतो तोही अनिर्वाच्य आहे.

आधिव्याधिवियोगात्मीयविपत्कलहदीर्घदारि

ध्येः ॥ जन्मांतरमेपियः क्लेशः किं शक्यते वक्तुं ॥ १२

अर्थः- जन्म झाल्यानंतर आधि (मनोदुःख), व्याधि, वियोग, स्वकीयांची विपत्ति, कलह, महादारिद्र्य व पुनर्जन्मही यानीं जो सर्व क्लेश आहे तो तरी बोलण्यास शक्य आहे काय ?.

नरपशुविहंगतिर्यग्योनीनां चतुरशीतिलक्षाणि ॥
कर्मनिबद्धो जीवः परिभ्रमन् यातनां भुंक्ते ॥ १३ ॥

अर्थः- मनुष्य, पशु, पक्षी व इतर ज्ञानहीन योनींच्या चवऱ्यायशीं लक्ष योनींत कर्मबद्ध जीव फिरत असून यातना भोगतो.

वरेमस्तत्र नृदेहस्तत्राग्रजन्मान्वयोत्पत्तिः ॥ स्वकुलाचारविचारः श्रुतिप्रचारश्च तत्रापि ॥ १४ ॥

अर्थः- त्या सर्व योनींत मनुष्यदेह श्रेष्ठ, त्यांत ब्राह्मणजन्मवंशांत उत्पत्ति उत्तम, त्यांतही स्वकुलाचाराचा विचार विहित असून त्यापेक्षां श्रुतिप्रचार अधिक आहे.

आत्मानात्मविवेको देहस्य विनाशिताज्ञानं ॥
एवं सति स्वमायुः प्राज्ञेरपि नीयते मिथ्या ॥ १५ ॥

अर्थः- आत्मानात्मविचार व देहाच्या नश्वरत्वाचें ज्ञान असें असून ज्ञानी पुरुषही आपलें आयुष्य व्यर्थ घालवितात.

आयुः क्षणलवमात्रं न लभ्यते हेमकोटिभिः क्वापि ॥ तच्चेद्गच्छति सर्वं मृषा ततः काऽधिका हानिः ॥ १६ ॥

अर्थः- क्षणलवमात्र आयुष्य सुवर्णाच्या अनेक कोटीनीं कोठेंही मिळत नाहीं असें तें अमूल्य आयुष्य सर्व व्यर्थ जर जातें तर त्यापेक्षां अधिक हानि कोणती आहे ?

नरदेहातिक्रमणात् प्राप्तौ पश्वादिदेहानां ॥ स्वतनोरप्यज्ञाने परमार्थस्यात्र का वार्ता ॥ १७ ॥

अर्थः- असा प्राप्त झालेला उत्तमनरदेह व्यर्थ घालवून पश्वादिदेह प्राप्त होऊन स्वशरीराचेंही अज्ञान झालें असतां त्यांत परमार्थाची वार्ता काय आहे ? .

सततं प्रवाह्यमानैर्वृषभैरश्वैः खरैर्गजैर्महिषैः॥
हा कष्टं क्षुत्क्षामैः श्रांतैर्नो शक्यते वक्तुं॥ १८॥

अर्थः- सतत भार वाहणारे वृषभ, अश्व, गर्दभ, गज व महिष (रेडे) हे क्षुधेनें कृश होऊन अतिशयें श्रमले तरी त्यांस बोलण्याचें सामर्थ्य नाहीं हें खेदास्पद दुःख आहे.

रुधिरत्रिधातुमज्जामेदोमांसास्थिसंहतिर्देहः॥
स बहिस्त्वचा पिनद्धस्तस्मान्नो भक्ष्यते काकैः १९

अर्थः- रक्त, कफ, वात, पित्त, मज्जा, मेद, मांस व अस्थि यांचा समुदायरूप जो देह तो बाहेरून त्वचेनें आच्छादित आहे म्हणून काकपक्षी त्यास भक्षीत नाहींत.

नासाग्राद्वदनाद्वा कफं मलं पायुतो विसृजन्॥
स्वयमेवेति जुगुप्सामंतः प्रसृतं च नो वेत्ति॥ २०॥

अर्थः- नासिकाग्र किंवा मुख यां पासून कफ व गुदद्वारा मल यांचा त्याग करीत असून स्वतःच त्यांची निंदा करतो आणि आपल्या शरीरांत पसरलेल्या त्या मलांस जाणत नाहीं.

पथि पतितमस्थि दृष्ट्वा स्पर्शभयादन्यमार्गतो
याति॥ नो पश्यति निजदेहं चास्थिसहस्त्रावृ
तं परितः॥ २१॥

अर्थः- मार्गांत पडलेलें अस्थि पाहून स्पर्शभयामुळें अन्यमार्गानें जातो परंतु सभोंवतीं सहस्त्रावधि अस्थीनीं वेष्टित स्वदेहास पहात नाहीं.

केशावधि नखराग्रादिदमंतः पूतिगंधसंपूर्णं॥
बहिरपि जानन् चंदनकर्पूराद्यैर्विलेपयति॥ २२

अर्थः- नखाग्रांपासून केशांपर्यंत हें शरीर आंत दुर्गंधानें पूर्ण आहे असें जाणत असूनही बाहेर चंदन, कापूर इत्यादि सुगंधपदार्थांनीं त्यास लेपन करतो.

यत्नादस्य पिधत्ते स्वाभाविकदोषसंघातं॥ औ
पाधिकगुणनिवहं प्रकाशयन् श्लाघते मूढः २३

टी० - आणि हा मूढ या देहाच्या स्वाभाविक दोषसमूहास यत्नानें झांकतो. व उपाधिजन्य गुणसमुदाय प्रकाशित करून लोकांत मोठी मिरवितो.

क्षतमुत्पन्नं देहे यदि न प्रक्षाल्यते त्रिदिनं॥ तन्नोत्पतंति बहवः कृमयो दुर्गंधिसंकीर्णाः ॥२४॥

टी० — देहावर उत्पन्न झालेलें क्षत जर तीन दिवस धुतलें नाहीं तर तेथें दुर्गंधियुक्त बहुत कृमि उत्पन्न होतात.

यो देहः सुप्तोभूत् स पुष्पशय्योऽपि शोभते तल्पे संप्रति स रज्जुकाष्ठैर्नियंत्रितः क्षिप्यते वन्हौ २५

टी० - जो देह शय्येवर निद्रित झाला व हातांत पुष्प धारण केलेलाही शोभतो तो सांप्रत दोऱ्या व काष्ठें यांनीं बांधून अग्नींत टाकलाजातो.

सिंहासनोपविष्टं यं दृष्ट्वा मुदमवाप लोकोयम् तं कालाकृष्टतनुं विलोक्य नेत्रे निमीलयति॥२६

टी० — हा लोक सिंहासनावर बसलेल्या ज्या राजास पाहून आनंद पावतो त्याचें शरीर कालानें आकर्षण केलेलें अवलोकन करून नेत्र झांक०

एवंविधमतिमलिनं देहं यत्सत्तया चलति॥तं विस्मृत्य परेशं वहंत्यहंतामनित्येऽस्मिन् ॥२७॥ ७॥

टी० - अशा प्रकारचा अतिमलिन देह ज्याच्या सत्तेनें चालतो त्या परमेश्वरास विसरून या अनित्य देहावर अभिमान वृथा मानतात.

क्वात्मा सच्चिद्रूपः क्व मांसरुधिरास्थिनिर्मितो देहः इति योलज्जाते धीमान् इतरशरीरं स किं मनुते २८

टी० - सत्यज्ञानरूप आत्मा कोणीकडे आणि मांस, रक्त व अस्थि यानीं निर्माण झालेला देह कोणीकडे अशा कारणानें जो बुद्धिमान् लज्जा पावतो तो इतर शरीरास मानतो काय? इति देहनिंदा प्रकरणंसंपूर्ण

## अथविषयनिंदाप्रकरणं

मूढः कुरुते विषयजकर्दमसंमार्जनं मिथ्या॥ दुरदृष्टदृष्टिभिरिदं देहं गेहं पतत्येव॥२९॥

टी० - मूर्ख, विषयां पासून झालेल्या कर्दमाची शुद्धी मिथ्या करीत

असतो. आणि त्याखालीं दुष्ट अदृष्टांच्या वृष्टीनीं देहरूप गृह पतनपावतेंच.

भार्यारूपविहीना मनसः खेदाय जायते पुंसां
अत्यंतरूपवतीसा परपुरुषैर्वशीक्रियते ॥ ३० ॥

टी० — रूपहीन भार्या पुरुषांच्या मनास खेदाला कारण होते आणि जी स्त्री अत्यंत रूपवती असते तिला परपुरुष वश करितात.

यः कश्चित्परपुरुषो मित्रं भृत्योथवा भिक्षुः ॥ पश्य
ति हि साभिलाषं विविक्षितोदाररूपवतीम् ॥ ३१ ॥

टी० — जो कोणी परपुरुष, मित्र, सेवक अथवा संन्यासी हे साभिलाष मनानें इष्ट व उत्कृष्ट अशा रूपवती स्त्रीकडे अवलोकन करितात.

यं कंचित्पुरुषवरं स्वभर्तुरतिसुंदरं दृक्षा ॥ न मृ
गयति किं मृगाक्षी मनसैवं परस्त्रियं पुरुषः ॥ ३२

टी० — मृगनयना स्त्री आपल्या पती पेक्षां अतिसुंदर जो कोणी श्रेष्ठ पुरुष त्यास पाहून त्याचा शोध करीत नाहीं काय? किंवा पुरुष तशा सुंदर स्त्रीला पाहून मनानेंच इच्छित नाहीं काय?

एवं सुरूपनार्या भर्ता कोपात् प्रतिक्षणं क्षीणः
नो लभते सुखलेशं बलिमिव बलिभुक् बहुष्वेकः ॥ ३३

टी० — या प्रमाणें सुरूप स्त्रीचा पति क्रोधामुळें प्रतिक्षणीं क्षीण होऊन सुखाचा लेश पावत नाहीं. यास दृष्टांत बहुतां मध्यें एकटा बलि भक्षण करणारा जवळ बलि प्राप्त झाला तरी जसा सुख पावत नाहीं तद्वत्.

वनिता नितांतमज्ञा स्वाज्ञामुल्लंघ्य वर्तते यदि सा ॥
शत्रोरप्यधिकतरा पराभिलाषिण्यसौ किमुत ३४

टी० — स्त्री अत्यंत मूर्ख असून आपली आज्ञा उल्लंघून जर वर्तते तर ती शत्रू पेक्षांही अति अधिक होते तेव्हां जी परपुरुषाची इच्छा करणारी ती अतिशयित द्वेषास्पद होते यांत आश्चर्य काय आहे?

लोकोनो पुत्रस्यास्तीतिश्रुत्या प्रभाषितो लोकः ॥
मुक्तिः संसरणं वा तदन्यलोकोथवा ऽनोर्थः ॥ ३५

टी० — पुत्रहीनास लोकप्राप्ति नाहीं अशा अर्थाच्या श्रुतीनें कोणता लोक ग्रहण केला आहे? मुक्ति किंवा संसार अथवा याहून स्वर्गादिक अन्यलोक तर या तिहींतील प्रथम जी मुक्ति ती ह्मणतां येत नाहीं.

सर्वेपि पुत्रभाजस्तन्मुक्तोसंहृतिर्भवति ॥ श्रवणाद्योप्युपाया मृषा भवेयुस्तृतीयेपि ॥ ३७ ॥ तत्राप्युपायसत्वात् द्वितीयपक्षेप्यं पुत्रस्य ॥ पुत्रेष्ट्यादिकयागं प्रवर्तयेद्यद्वेदोयं ॥ ३७ ॥

टी० — कारण सर्वही पुत्रवंत असून ते मुक्त झाले असतां जग नाहींसें होईल. तसेच श्रवणादिक मोक्षोपायही व्यर्थ होतील. त्याच प्रमाणें स्वर्गादिक अन्यलोकप्राप्ति नाहीं असा जो तिसरा पक्ष आहे त्या पक्षींही पुत्रानेंच जर स्वर्गादिक लोक प्राप्त होतील तर त्या विषयीं जे यज्ञादिक उपाय सांगितले आहेत ते व्यर्थ होतील. या वरून पुत्रावांचून स्वर्गप्राप्ति नाहीं असें ह्मणतां येत नाहीं. आणि पुत्रहीनास संसार सुख नाहीं अशा द्वितीय पक्षींही त्यास ऐहलौकिक सुखार्थ या वेदानें पुत्रेष्टि आदिकरून जो यज्ञ करावयास सांगितला आहे त्या सुखाचें स्वरूप पुढील आर्यांत दर्शविलें आहे.

नानाशरीरकष्टैर्धनव्ययैः साध्यते पुत्रः ॥ उत्पन्नमात्र पुत्रे जीवितचिंता गरीयसी तस्य ॥ ३८ ॥

टी० — अनेकशरीर कष्टानीं व धनव्ययानीं पुत्र साध्य होतो; परंतु पुत्र उत्पन्न झाला असतां त्याच्या वांचण्या विषयीं चिंता अतिशयें मोठी प्राप्त होते.

जीवन्नपि किं मूर्खः प्राज्ञः किंवा सुशील भाग्य भविता ॥ जारश्चोरः पिशुनः पतितो धूर्तप्रियः क्रूरः ॥ ३९

टी० — यद्यपि पुत्र वांचला तरी तो मूर्ख किंवा ज्ञानी, सुस्वभाव युक्त व्यभिचारी, चोर, पिशुन ( दुष्ट किंवा चाहाडखोर ) अथवा पतित, द्यूतप्रिय व क्रूर असा होईल काय?

पितृमातृबंधुघाती मनसः खेदाय जायते पुत्रः ॥ चिंतयति तातनिधनं पुत्रो द्रव्याद्यधीशता हेतोः ॥ ४० ॥

टी०— पुत्र मातापितरांचा घात करणारा झाला असतां तो मनाला खेद होण्यास कारण होतो. व असला दुष्ट पुत्र आपणास द्रव्यादिकांचें स्वामित्व प्राप्त होण्याच्या हेतूस्तव पित्याच्या मरणाची इच्छा करतो.

सर्वगुणैरुपपन्नः पुत्रः कस्यापि कुत्रचिद्भवति ॥ सो-
ल्पायू रुग्णो वाल्यनेपत्यो वा तथापि खेदाय ॥ ४१ ॥

टी० — आणि सर्व गुणांनीं संपन्न असा पुत्र जो क्वचित् एकाद्यास च होतो तो तरी अल्पायु अथवा रोगी अथवा संतति रहित अशांतून कोणता तरी प्रकार प्रायः घडतो तेणें करून तो खेदास कारण होतो.

पुत्रात् सद्गतिरिति चेत्तदपि प्रायोक्ति युक्त्यसंहं ॥ इत्थं
शरीर कष्टं दुःखं संप्रार्थ्यते मूढैः ॥ ४२ ॥

टी० — तस्मात् पुत्राच्या योगानें सद्गति होते असें जर ह्मटलें तर तेंही प्रायः युक्तिविरुद्ध आहे. यावरून सिद्ध होतें कीं, अशा प्रकारें मूढ जन शरीर कष्टानीं दुःखप्राप्ती विषयींच प्रार्थना करतात.

पितृमातृबंधुभगिनीपितृव्यजामातृमुख्यानां ॥ मा
र्गस्थानामिव युतिरनेकयोनिभ्रमात् क्षणिका ४३

टी० — पिता, माता, बंधु, भगिनी, चुलता, जांवई इत्यादिकांची संगति अनेक योनींतील भ्रमणामुळें मार्गस्थां प्रमाणें क्षणिक आहे.

दैवं यावद्विपुलं यावत् प्रचुरः परोपकारश्च ॥ ता-
वत् सर्वे सुहृदो व्यत्ययतः शत्रवः सर्वे ॥ ४४ ॥

टी० — यावत्काल पर्यंत दैव विपुल अनुकूल असून बहुत परोपकारही जों पर्यंत होत असतो तों पर्यंतच सर्व लोक मित्रत्वानें वर्तत असतात. आणि दैवानुकूल्य परोपकार यांत व्यत्यय झाला असतां तेच पूर्वींचे सर्व शत्रु होतात.

अश्नंति चेदनुदिनं बंदिन इव वर्णयंति संतृप्ताः ॥
तच्चेद्द्वित्रिदिनांतरमभिनिंदंतः प्रकुप्यंति ॥ ४५ ॥

टी० — तसेच लोक प्रतिदिवशीं ज्याचे घरीं भोजन करून जर अत्यंत तृप्त होत असले तर त्याला बंदिजना (स्तुतिपाठक) प्रमाणें वर्णिता

त आणि त्या भोजनास जर दोन तीन दिवस अंतर पडलें तर ते निंदाक-
रीत होत्साते क्रुद्ध होतात.

दुर्भरजठरनिमित्तं समुपार्जयितुं प्रवर्तते चित्तम्॥
लक्षावधि बहुवित्तं तथाप्यलब्धं कपर्दिकामात्रम्॥४६

टी० — चित्तभ्रमानें ही भरण्यास अशक्य अशा उदरनिमित्त लक्षाव-
धी बहुत द्रव्य संपादन करण्या साठीं प्रवृत्त होतें, तरी एक कपर्दिका-
(कवडी) मात्रही धन मिळत नाहीं.

लब्धश्चेदधिकोर्थः पत्न्यादीनां भवेत्स्वार्थः॥ नृप
चोरतोप्यनर्थस्तस्माद्द्रव्योद्यमो व्यर्थः॥ ४७ ॥

टी० — जर कदाचित् अधिक द्रव्य मिळालें तर तेणें करून भार्यादि-
कांचा स्वार्थ होतो. आणि राजे व चोर यांपासूनही दुःख प्राप्त होतें
यास्तव द्रव्यार्जनाचा उद्योग व्यर्थ आहे.

अन्यायमर्थभाजां पश्यति भूपोध्वगामितां चौरः
पिशुनो व्यसन प्राप्तिं दायादानां गणः कलहं ४८

टी० — तें असें कीं, राजा धनिकांच्या अन्यायाकडे पहात असून चोर
त्याच्या मार्गांतील गमनाची प्रतीक्षा करतो. आणि दुर्जन त्यास दुःख
प्राप्तीची इच्छा करतात व दायादांचा समुदाय त्याच्या घरीं कलह हो-
ण्याची इच्छा करतात.

पातकभरैरनेकैरर्थं समुपार्जयंति राजानः॥ अ-
श्वमतंगजहेतोः प्रतिक्षणं नश्यते सोर्थः॥४९॥

टी० — तसेच राजे अनेक पातक भारांनीं द्रव्य संपादन करितात; प
रंतु तें धन अश्व व गज यां साठीं प्रतिक्षणीं नाश पावतें.

राजांतराभिगमनात् रोगाद्वा मंत्रिभृत्य दोषाद्वा
विषशस्त्रगुप्तघातान्मग्नाश्चिंतार्णवे भूपाः॥ ५०॥

टी० — त्याच प्रमाणें दुसऱ्या राजांवर युद्धार्थ जाणें रोग किंवा प्रधा
न व सेवक यांचा दोष अथवा विष, शस्त्र व गुप्त घात या कारणानीं
राजे चिंता समुद्रांत बुडाले आहेत.

इतिविषयनिंदा प्रकरणम्.

हसति कदाचिद्रौति भ्रांतं सद्दशादिशो भ्रमति॥
हृष्टं कदापि रुष्टं शिष्टं दुष्टंच निंदतिस्तौति॥ ५१॥

टी०—मन कदाचित् हसतें रुदन करतें. केव्हां केव्हां भ्रमयुक्त होऊन दशादिशांत फिरतें, एकादे वेळीं हर्ष किंवा रोष यानीं युक्त होतें, शिष्टा ची निंदा करतें, व दुष्टांची स्तुति करतें.

किमपि द्वेष्टि सरोषं त्वात्मानं श्लाघते कदाचिदपि
चित्तं पिशाचमभैवद्राक्षस्या तृष्णया व्याप्तम् ५२॥

टी०—चित्त रोषानें एकाद्याचा द्वेष करतें, एकाद्या वेळेसही आपली च स्तुति करतें. आणि तें विषय तृष्णारूप राक्षसीनें व्याप्त झालें अस तां पिशाचवत् होतें.

दंभाभिमानलोभैः कामक्रोधोरुमत्सरैश्चेतः॥आ-
कृष्यते समंतात् श्वभिरिव पतितोस्थि वन्मार्गे॥५३

टी०—मार्गांत पडलेलें अस्थि जसे श्वान इतस्ततः ओढितात तसे दं-भ, अभिमान, लोभ, काम, क्रोध, व बहुत मत्सर यानीं चित्त चहूंकडेआ-कर्षिलें जातें.

तस्मात्शुद्ध्येविरागो मनोभिलषितं त्यजेदर्थम्॥त
दनभिलषितं कुर्यान्निर्व्यापारं ततोभवति॥ ५४॥

टीका— तस्मात् शुद्ध वैराग्य होणें समाधानास कारण आहे. यास्त व वैराग्य होण्या साठीं मनास इच्छित जो विषय असेल त्याचा त्याग करावा आणि मनास जें इष्ट नसेल तें करावें ह्मणजे तेणें करून मन संकल्प विकल्परूप क्रियेनें रहित होऊन शांत होतें. इति निंदाप्रकर०

अथविषयनिग्रहप्रक०

संसृति पारावारे त्वगाधविषयोदकेन संपूर्णे॥ नृ
शरीरमंबुतरणं कर्मसमीरैरितस्ततश्चलति ५५

टी०—अपरिमित विषयरूप उदकानें परिपूर्ण अशा संसार समु-द्रांत मनुष्य शरीर हें नौकारूप असून तें कर्मरूप वायूनीं इतस्ततः चलन पावतें.

छिद्रैर्नवभिरुपेतं जीवोनौकापतिर्महानलसः॥ छि-

द्वाराणामनिरोधाज्जलं परिपूर्णं पतत्यधः सततम् ५६

टी०— नऊ छिद्रानीं युक्त अशा नौकेंत नौकापति जीव महा आल-
स्यानें युक्त झाला असतां इंद्रियरूप छिद्रांचा निग्रह न केला तरत्यां
च्या द्वारानीं विषयजल पूर्ण भरून ती नौका निरंतर खालीं बुडत्ये.

छिद्राणां तु निरोधात् सुखेन पारं परं याति ॥ तस्मा
दिंद्रियनिग्रहमृते न कश्चित्तरत्यनृतम् ॥ ५७ ॥ ७

टी०— आणि त्या इंद्रियछिद्रांचा निग्रह केला असतां सुखानें तरून
भवसागराच्या परतीरास जातो. तस्मात् इंद्रियनिग्रहावांचून कोणी
ही संसृतींत तरत नाहीं.

पश्यति परस्य युवतीं सकाममपि तन्मनोरथं कुरुते
ज्ञात्वैव तदप्राप्तिं व्यर्थं मनुजोति पापभाग्भवति ५८

टी०— त्याच प्रमाणें दुसऱ्याच्या तरुण स्त्रीला पहातो आणि तिजवि
षयीं सकाम मनोरथही करतो व ती आपणास प्राप्त होणार नाहींच.
असें जाणून मानव व्यर्थ अतिपापभागी होतो.

पिशुनैः प्रकाममुदितां परस्य निंदां शृणोति कर्णा
भ्याम् ॥ तेन परः किंम्रियते व्यर्थं मनुजोति पापभा
ग्भवति ५९

टी०— दुर्जनानीं दुसऱ्यांची यथेच्छ केलेली निंदा कानानीं ऐकतो तेणें-
करून तो अन्य मरण पावतो काय? नाहीं तर निंदा ऐकणारा मनुष्य व्यर्थ
अत्यंत पापविभागी होतो.

अनृतं परापवादं रसना वदति प्रतिक्षणं तेन ॥ परे-
हानिर्लब्धिः कां व्यर्थं मनुजोति पापभाग्भवति ०

टी०— जिव्हा प्रतिक्षणीं असत्य व परनिंदा बोलत्ये तेणें करून दुस-
ऱ्याची हानि व आपणास लाभ काय? तर त्या योगानें मनुष्य वृथा
अतिपापयुक्त होतो.

विषयेंद्रिययोर्योगे निमेषसमयेन यत्सुखं भवति
विषये नष्टे दुःखं यावज्जीवं च तत्तयोर्मध्ये ॥ ६० ॥

टी०— विषय व इंद्रियें यांचा योग झाला असतां निमेषमात्र कालेंक-

रून जें सुख होतें तो विषय नाश पावला असतां जें दुःख होतें तें त्या विषय व इंद्रिय यांच्या मध्यें यावज्जीवपर्यंत राहतें.

हेयमुपादेयं वा प्रविचार्य सुनिश्चितं तस्मात्॥ अ-
ल्पसुखस्य त्यागादनल्पदुःखं जहाति सुधीः ६२

टी०—यास्तव उत्तम बुद्धिमान् त्याज्य किंवा ग्राह्य याचा उत्कृष्ट निश्चित विचार करून अल्प सुखाच्या त्यागा पेक्षां बहु दुःखाचा त्याग करतो.

धीवरदत्तमिहामिषमश्नन् वैसारिणो म्रियते॥ तं
द्वद्विषयान् भुंजन् कालाकृष्टो नरः पतति॥ ६३॥

टीका—मत्स्यहिंसकानें दिलेलें मांस भक्षून येथें जसा मत्स्य मरण पावतो तसा विषयास भोगणारा मानव कालानें आकर्षितांच मृत्यु पाव०

उरगग्रस्तोऽर्धतनुर्भेकोऽश्नाति ह मक्षिकाः शतशः॥ ए
वं गतायुरपि सन् विषयान् समुपार्जयत्यंधः ६४॥

टी०—त्याचप्रमाणें सर्पानें अर्धशरीर गिळिलेला बेडूक शेंकडों माश्या जशा भक्षितो तद्वत् मानव गतायु असूनही अज्ञानानें अंध होऊन या लोकीं विषय संपादनार्थ यत्न करतो. इति विषय निग्रह प्रकरणम्

## अथ मनोनिग्रहप्रकरणम्.

स्वीयोद्गमतो यवहा सागरमुपयाति नीचमार्गेण
साचेद्दुद्गम एव स्थिरा सती किं न याति वार्धित्वं ६५

टी०—आपल्या उगमापासून उदकाला वाहणारी जी नदी उतरत्या मार्गानें समुद्रास जाते ती आपल्या उत्पत्तिस्थानींच स्थिर असून जर राहिली तर ती समुद्रासारखी होणार नाहीं काय?

एवं मनः स्वहेतुं विचारयन् सुस्थिरं भवेदंतः॥ न ब-
हिर्वदेति तदा किं न्वामलं स्वयं याति ६६

टी०—असें मन आपल्या कारण स्वरूपाचा विचार करीत अंतर्यामीं उत्तम रीतीनें स्थिर जर होईल आणि बाह्य विषयांवर न येईल तर तें त्या कालीं स्वतः कोणत्या स्वरूपाला प्राप्त होतें?

वर्षास्वंभःप्रचयात् कूपे गुरुनिर्झरे पयःक्षारम्॥
ग्रीष्मेणैव तु शुष्के माधुर्यं भजति तत्राम्भः॥ ६७॥ ६७

टी०.– पर्जन्यकालीं आड व मोगा झरा यांत नवीन उदक बहुत येतें त्या मुळें पाणी खारें होतें आणि तें जल उष्णकालानेंच अल्प झालें असतां त्या आडु झऱ्यांतील पाणी जसें मधुर होतें.

तद्वद्विषयोद्रिक्तं तमःप्रधानं मनः कलुषं ॥ तस्मि-
न् विरागशुष्के शनैरविर्भवेत्सत्वं ॥ ६८ ॥

टी०.– तद्वत् मन तमोगुणानें व्याप्त होऊन विषयानें परिपूर्ण झालें असतां दोषयुक्त होतें आणि तेंच वैराग्यानें विषया पासून पराङ्मुख झालें असतां त्यांत सत्वगुण हळुहळु प्रगट होतो.

यं विषयमभिलषित्वा धावति बाह्येंद्रियद्वारा ॥ त
स्याप्राप्तो खिद्यति तथा यथा स्वं गतं किंचित् ॥ ६९

टी०.– ज्या विषयास इच्छून मन, नेत्रादिक बाह्य इंद्रियांच्या द्वारानें इकडे तिकडे धांवतें आणि त्या विषयाची प्राप्ति झाली नसतां जसें स्वकीय कांहीं गेल्यानें खिन्न होतें तसें खेद पावतें.

नगनगरदुर्गदुर्गमसरितः परितः परिभ्रमच्चेतः ॥
यदि नो लभते विषयं विषयंत्रितमेव खिन्नतामे
ति ॥ ७० ॥

टी०.– पर्वत, नगरें, किल्ले, दुर्गमदेश व नद्या इत्यादिस्थानीं आसमंतात् फिरणारें चित्त जर विषय प्राप्त न झाला तर दुःखाधीन होऊनच खिन्नतेला पावतें.

तुंबीफलं जलांतर्बलादधः क्षिप्तमप्युपैत्यूर्ध्वं ॥
तद्वन्मनः स्वरूपे निहितं यत्नाद्बहिर्याति ॥ ७१ ॥

टी०.– भोपळा जरी बलात्कारानें उदकांत खालीं टाकला तरी तो जसा वर येतो तसें मन यत्नानें आत्मस्वरूपीं स्थापन केलें तरी तें बाह्य विषयांवर येतें हा त्याचा स्वभावच आहे तेव्हां आत्मस्वरूपीं स्थापन न केलें तर तें विषयांवर किती जातें हें सांगतांच येत नाहीं.

इह वा पूर्वभवे वा स्वकर्मणैवार्जितं फलं यद्यत् ॥
शुभमशुभं वा तत्तद्भोगोप्यप्रार्थितो भवति ॥ ७२

टी०.– या जन्मीं किंवा पूर्वजन्मीं स्वकर्मानेंच जें जें शुभ अथवा अशु

भफल संपादन केलें असेल त्यात्या कर्मफलाचा भोगही प्रार्थनेवांचू न प्राप्त होतो.

चेतःपशुमशुभपथे प्रधावमानं निराकर्तुं ॥ वैरा ग्यमेव स्युर्चितं गलकाष्ठं निर्मितं धात्रा ॥ ७३ ॥

टी०.–अशुभ मार्गाकडे अतिशयें धांवणाऱ्या अंतःकरणरूप पशूला त्या मार्गांतून मागें फिरविण्यासाठीं ब्रह्मदेवानें वैराग्य रूपच योग्य गळ्यांत बांधण्याचें काष्ठ निर्माण केलें आहे

निद्रावसरे यत् सुखमेतत् किंविषयजं यस्मात् ॥ नच इंद्रियप्रदेशावस्थानं चेतसो निद्रा ॥ ७४ ॥

टी०.–निद्रासमयीं जें सुख तें कोणत्या विषयापासून उत्पन्न होतें असें समजावें नर ज्या कारणास्तव अंतःकरणाची जी इंद्रियप्रदेशीं स्थिति ती निद्रा नव्हे.

आद्वारंतुंगकुड्ये गृहे ऽवरुद्धो यथा व्याघ्रः ॥ ब हुनिर्गमप्रयत्नैः श्रांतस्तिष्ठत्यनुपतन् सन् ॥ ७५

टी०.–द्वारापर्यंत उंच भिंतीनीं युक्त अशा घरांत कोंडलेला वाघ जसा बाहेर निघण्याच्या बहुत प्रयत्नांनीं वारंवार उड्या मारीत असून श्रमला असतां उगीच उभा राहातो.

सर्वेंद्रियावरोधाद्युद्योगशतैरनिर्गमं वीक्ष्य ॥ शांतं तिष्ठति चेतो निरुद्यमत्वं तदा याति ॥ ७६ ॥

टी०.–तद्वत् सर्व इंद्रियांच्या अवरोधादिक शतशः उद्योगांमुळें बाह्य विषयांवर जाण्यास मार्ग सांपडत नाहीं असें पाहून चित्त शांततेनें राहातें त्याकाळीं तें विषयसंबंधि उद्योगानें रहित होतें.

प्राणस्पंदनिरोधात् सत्संगाद्वासनात्यागात् ॥ हरिचरणभक्तियोगात् मनः स्ववेगं जहाति शनैः ॥ ॥ ७७ ॥

टी०.–त्याच प्रमाणें प्राणवायूच्या गतीचा अवरोध, सत्संग, वासनात्याग व हरिचरणाचा भक्तियोग या साधनांनीं मन आपल्या वेगाला हळु हळू सोडतें.

इति मनोनिग्रहप्रकरणं

अथवैराग्यप्रकरणं

परगृहगृहिणीपुत्रद्रविणानामागमे विनाशे वा ॥ कथितौ हर्षविषादौ किंवा स्यातां क्षणं स्थातुः ॥ ७८ ॥

टी०:- आपणाहून अन्यलोक, घर, स्त्री, पुत्र व द्रव्य यांची प्राप्ति किंवा नाश हे झाले असतां हर्ष अथवा विषाद हे होतात असें सांगितलें आहे परंतु ते क्षणमात्र राहाणारास काय होतील.

दैवात् स्थितं गतं वा यं कंचिद्विषयमीड्यमल्पं वा ॥ नो तुष्यन् न च सीदन् वीक्ष्य गृहेष्वतिथिवन्निवसेत् ॥ ७९ ॥

टी०:- यास्तव दैववशात् कांहीं स्तुत्य अथवा अल्प असा विषय राहिला किंवा गेला तरी त्याच्या प्राप्तीनें संतुष्ट व नाशानें खिन्न न होतां त्या विषयांचें क्षणिकत्व जाणून घरीं अतिथी सारखें रहावें.

ममताभिमानशून्यो विषयेषु पराङ्मुखः पुरुषः ॥ तिष्ठन्नपि निजसदने न बाध्यते कर्मभिः क्वापि ॥ ८० ॥

टी०:- ममता व अभिमान यानीं रहित असून विषयां विषयीं पराङ्मुख असा पुरुष स्वगृहीं रहात असूनही कर्मानीं कोठें पीडित होत नाहीं.

कुत्राप्येरण्यदेशे सुनीलतृणवालुकोपचिते ॥ शीतलतरुतलभूमौ सुखं शयानस्य पुरुषस्य ॥ ८१ ॥

टी०:- आणि असा वैराग्यसंपन्न पुरुष कोठेंही अरण्यप्रदेशांत उत्तम नीलवर्ण तृण व वाळु यानीं युक्त अशा शीतलवृक्षाखालच्या भूमीवर निजला तरी त्याला सुख आहे.

तरवः पत्रफलाढ्याः सुगंधशीतानिलाः परितः ॥ कलकूजितवरविहगाः सरितो मित्राणि किं न स्युः ॥ ८२

टी०:- कारण आसमंताद्भागीं पानें व फळें यानीं युक्त वृक्ष, सुगंधयुक्त

शीतल वायु, मधुर शब्द करणारे श्रेष्ठ पक्षी व नद्या हे त्या वैराग्यशीला चे मित्र कां होणार नाहींत.

वैराग्यभाग्यभाजः प्रसन्नमनसो निराशस्य ॥ अप्रार्थितफलभोक्तुः पुंसो जन्मनि कृतार्थतेह स्यात् ॥ ८३

टी०:–असा वैराग्यभाग्यवान् असल्यामुळें प्रसन्नमनयुक्त असून आशारहित व अप्रार्थित फलाचा उपभोग करणारा अशा पुरुषाच्याजन्मांतील कृतार्थता या लोकीं होईल.

शार्दूल.

द्रव्यं पल्लवतश्च्युतं यदि भवेत् क्वापि प्रमोदात्तदा शोकायार्थं तदर्पितं श्रुतवते तोषाय च श्रेयसे ॥ स्वातन्त्र्याद्विषयाः प्रयान्ति यदमी शोकाय ते स्युश्चिरं संत्यक्ताः स्वयमेव चेच्छमसुखं निःश्रेयसं तन्वते ॥ ८४ ॥

टी०:– द्रव्य असावधपणामुळें कोठें तरी जर पदरांतून सुटून पडेल तर त्या कालीं शोकास कारण होतें आणि तेंच धन जर वेदशास्त्र संपन्नास दान केलें तर संतोष व पुण्य यांस जसें कारण होतें तद्वत् हे विषय स्वतः जर सोडून जातात तर ते चिरकाल शोककारक होतात आणि आपणच जर त्यांचा त्याग केला तर ते शांतिसुखरूप कल्याण देतात.

विस्मृत्यात्मनि वाससुत्कटभवाटव्यां चिरं पर्यटन् संतापत्रयदीर्घदाहदहनज्वालावलिव्याकुलः ॥ बल्गन् फल्गुसुखप्रदीप्तनयनश्चेतः कुरंगो बलीदाशापाशवशीकृतोपि विषयव्याघ्रैर्मृषा हन्यते ॥ ८५ ॥

टी०:–आत्मस्वरूप निवासस्थान विसरून घोर संसार अरण्यांत चिरकाल फिरत असून अतितापत्रयरूप दीर्घ दाहयुक्त अग्नीच्या ज्वाला पंक्तीनीं व्याकुल झालेला अंतःकरणरूप हरिण क्षणिक तुच्छ विषय

सुखानें डोळे दिपून इतस्ततः भ्रमण करीत असतां शतशः आशापाशानीं स्वाधीन झालेला असून तो विषयरूप व्याघ्रानीं बलात्कारानें व्यर्थ मारला जातो.

इति वैराग्यप्रकरणं

अथात्मसमाधिप्रकरणं

उपपन्नेपि विरागे विनो प्रबोधं सुखं न स्यात्॥ स भवेत् गुरूपदेशात्तस्माद्गुरुमाश्रयेत् प्रथमं॥ ८६

टी०.- वैराग्य जरी प्राप्त झालें तरी ज्ञानावांचून सुख होणार नाहीं तें ज्ञान गुरूपदेशानें होतें यास्तव प्रथमतः गुरूचा आश्रय करावा.

यद्यपि जलधेरुदकं यद्यपि वा प्रेरकोऽनिलस्तत्र॥ तदपि पिपासाकुलितः प्रतीक्षते चातको मेघं॥ ८७॥

टी०.- जरी समुद्राचें उदक असून तेथें जरी प्रेरक वायु आहे तरी चातकपक्षी तृषाक्रांत होऊन उदकप्राशनार्थ मेघाची मार्गप्रतीक्षा करतो.

त्रेधा प्रतीतिरुक्ता शास्त्रात् गुरुतस्तथात्मनस्तत्र॥ शास्त्रप्रतीतिरादौ यद्वन्मधुरो गुडोऽस्तीति॥ ८८॥

टी०.- अनुभव तीन प्रकारचा सांगितला आहे तो असा कीं, शास्त्रापासून तसाच गुरूपासून व आपणापासून. त्यांत आरंभीं शास्त्रापासून ज्ञान होतें तें असें कीं, गूळ मधुर आहे हें जसें प्रथमतः शास्त्रवाक्यावरून समजतें.

अग्रे गुरुप्रतीतिर्दूरात् गुडदर्शनं यद्वत्॥ आत्मप्रतीतिरस्माद्गुडभक्षणजंसुखंयद्वत्॥ ८९॥

टी०.- पुढें गुरुद्वारा अनुभव होतो तो असा कीं, जसा गूळ दुरून दिसतो तद्वत्. नंतर गुरूपदेशापुढें आपला स्वताचा अनुभव होतो तो असा कीं गुडभक्षणापासून जसें आपल्याला सुख होतें तसें.

रसगंधरूपशब्दस्पर्शा अन्ये पदार्थाश्च॥ कस्मादनुभूयंते नो देहान्नेंद्रियग्रामात्॥ ९०॥

टी०.– रस, गंध, रूप, शब्द, स्पर्श व अन्यपदार्थ हे कशाच्या योगानें अनुभवास येतात ? तर देह व इंद्रियसमुदाय यांच्या योगानें रसादिकांचा अनुभव घडत नाहीं.

मृतदेहेंद्रियवर्गो यतो न जानाति दाहजं दुःखं ॥ प्राणश्चेन्निद्रायां तस्करबाधां स किं वेत्ति ॥ ९१

टी०.– कारण मरण पावलेला देह व त्या संबंधि इंद्रियसमुदाय हे ज्या पेक्षां दग्ध झाल्याचें दुःख जाणत नाहींत आणि जिवंत असतां प्राणापासून विषयज्ञान होतें असें जर म्हणावें तर तो प्राण निद्रेंत चोराची बाधा जाणतो कीं काय ?

मनसो यदि वा विषयास्तेद्युगपत्किं न जानाति तस्य पराधीनत्वात् यतः प्रमादस्य कस्त्राता ॥ ९२

टी०.– तसेच विषय जर मनाच्या योगानें समजतात तर तें एकेकाळीं सर्व विषय कां जाणीत नाहीं ? या वरून तें पराधीन आहे. कारण मानसिक प्रमादा पासून रक्षण करणारा कोण आहे .

गाढध्वांतगृहांततः क्षितितले दीपं निधायोज्वलं पंचछिद्रमधोमुखं हि कलशं तस्योपरि स्थापयेत् ॥ तद्बाह्ये परितश्च नीरममलं वीणां च कस्तूरिकां सद्रत्नं व्यजनं न्यसेच्च कलशछिद्राध्वनिर्गच्छति ॥ ९३ ॥

टी०.– निबिड अंधकारयुक्त गृहाच्या अभ्यंतरीं भूमीवर देदीप्यमान दीपस्थापन करून त्यावर पांच छिद्रानीं युक्त असा एक कलश पालथा घालावा आणि त्याच्या बाह्यप्रदेशीं सभोवतीं प्रत्येक छिद्रांजवळ स्वच्छपाणी, वीणा, कस्तूरी, उत्तम रत्न व पंखा हे पदार्थ ठेवावे आणि त्या कलशाच्या छिद्रांतून ध्वनि जातो.

तेजोंशेन पृथक्पदार्थनिवहज्ञानं हि यत् जायते तद्ब्रह्मैः कलशेन वा किमु मृदा भांडेन तेलेन वा ॥ किं सूत्रेण न चैतदस्ति रुचिरं प्रत्यक्षबाधादतो दीपज्योतिरिहैकमेव शरणं देहे तथात्मा स्थितः ९४

टी०— परंतु त्या कलशारवालच्या दीपसंबंधि तेजांशानें निरनिराक्या पदार्थ समुदायाचें ज्ञान जें होतें तें त्या कलशाचीं छिद्रें किंवा तें कलशरूप मातीचें भांडें, तेल, अथवा वाती यानीं होतें कीं काय ? तर त्या छिद्रादिकांनीं पदार्थज्ञान होतें हें समीचीन आहे काय ? नाहीं; कारण दीपावांचून त्या पदार्थांनीं ज्ञान होतें हें प्रत्यक्ष अनुभवानें बाधित आहे यास्तव त्या पदार्थांच्या ज्ञानाविषयीं एक दीपज्योतिच आश्रय जशी आहे तद्वत् देहांत स्थित जो आत्मा तोच सर्व विषयज्ञानाच्या अनुभवास कारण आहे.

इत्यात्मसमाधिप्रकरणं

अथ मायासिद्धिप्रकरणं

चिन्मात्रः परमात्मा ह्यपश्यदात्मानमात्मतया ॥
अभवत् सोहंनामा तस्मादासीत्ते भिदो मूलं ॥ ९५

टी०— परमात्मा केवल ज्ञानस्वरूप असून त्यानें आपणास ज्या कालीं आत्मत्वें करून जाणलें त्या कालीं तो अहंकार नामें प्रसिद्ध झाला तेव्हां पासून भेदाचें मूलकारण निर्माण झालें.

द्वेधैव भाति तस्मात् पतिश्च पत्नी च तौ भवतः
॥ तस्मादयमाकाशः स्त्रियैव परिपूर्यते संततं
॥ ९६ ॥

टी०— तें दोन प्रकारांसारखें शोभतें त्या पासून पति व पत्नी असें युग्म झालें त्या पासून हें आकाश होऊन तें अहंकारानेंच सतत व्याप्त आहे.

सोयं समभवत्तस्यां चैतो मनुष्या अजायंत ॥ इत्यु
पनिषदः प्राहुरयितांप्रति याज्ञवल्क्योक्तिः ॥ ९७ ॥

टी०— त्या उभयतांतील पुरुषानें पंचमहाभूतें उत्पन्न केलीं त्यां पासून मनुष्य झाले असें उपनिषदें म्हणतात अशी स्वस्त्रीला याज्ञवल्क्यमुनीची उक्ति आहे.

चिरमानंदानुभवात् सुषुप्तिरिव कोप्यवस्थाभू
त् ॥ परमात्मनस्ततस्मात् स्वप्नवदेवोस्थितामा
या ॥ ९८ ॥

टी०.– बहुकाल आनंदानुभवासुळें परमात्म्यास सुषुप्ती सारखी - कांहींएक अवस्था झाली तेव्हां त्या पासून स्वप्नासारखीच माया उत्पन्न झाली.

सदसद्विलक्षणासौ परात्मसत्ताश्रयानादिः॥ सा च गुणत्रयरूपा सूते सचराचरं विश्वं॥ ९९॥

टी०.– कार्य व कारण यांहून निराळी अशी ही अनादि माया परमात्म्याच्या सत्तेच्या आश्रयानें वर्तणारी असून ती सत्वादि त्रिगुणरूप होऊन चराचर सहित विश्वाला प्रसवते.

माया तावददृश्या दृश्यं कार्यं कथं जनयेत्॥ तंतुभिरदृश्यरूपैः पटोत्र दृश्यः कथं भवति॥१००॥

टी०.– माया निश्चयें करून अदृश्य असून ती दृश्य जग कसें उत्पन्न करील? याचें उत्तर असें कीं, तंतु अदृश्यरूप असून त्यांपासून येथें पट कसा दृश्य होतो.

स्वप्ने स्फुरतानुभवाच्छुक्रद्रावो यथा स्रुतो वसने॥ अनृतं रतं प्रबोधे वसनोपहतिर्भवेत्सत्या॥१०१॥

टी०.– स्वप्नांतील मैथुनाच्या अनुभवानें वीर्यपात वस्त्रांत होतो त्यांतील स्त्रीसंग जागृतींत जसा असत्य असून वस्त्र मलिन झालेलें सत्य होतें.

स्वप्ने पुरुषः सत्यो योषिदसत्या तयोर्युतिश्च मृषा॥ शुक्रद्रावः सत्यस्तद्वत् प्रकृतेपि संभवति १०२

टी०.– स्वप्नांत पुरुष सत्य असून स्त्री असत्य असते आणि त्या उभयतांचा संगही मिथ्याच आहे परंतु वीर्यपात जसा सत्य आहे तद्वत् जगरूप मायाकार्याविषयीं संभवतें.

एवमदृश्या माया तत्कार्यं जगदिदं दृश्यं॥ माया तावदियं स्या द्या स्वनाशेन हर्षदा भवति १०३

टी०.– तें असें कीं, अशी माया अदृश्य असूनही तिजपासून झालेलें हें जग दृश्य आहे तस्मात् मायेचें स्वरूप असें आहे कीं, जी आपल्या नाशानें हर्षदायक होते.

रजनीवातिदुरंता न लक्ष्यते ऽत्र स्वभावोऽस्याः॥
सौदामिनीव नश्यति मुनिभिः संप्रेक्ष्यमाणैव ॥ १०४

टी०.– त्याचप्रमाणें माया रात्रीसारखी अत्यंत दुर्बोध असून तिचा-स्वभाव येथें कळत नाहीं आणि ऋषीनीं इजकडे अवलोकन करतां-च ही विजेसारखी नाश पावते.

माया ब्रह्मोपगता विद्या जीवाश्रया प्रोक्ता ॥ चि-
दचिद्ग्रंथिश्चेतस्तदक्षयं ज्ञेयमामोक्षात् ॥ १०५ ॥

टी०.– ब्रह्मस्वरूपीं जी सन्निहित आहे ती माया आणि जीवस्वरू पाला जी आश्रयभूत आहे ती विद्या जाणावी व चिज्जडांची जी ग्रंथि तें अंतःकरण असून तें मोक्षापर्यंत नाशरहित असतें असें स-मजावें.

घटमठकुड्यैरावृतमाकाशं तत्तदाह्वयं भवति॥
तद्वद्विद्यावृतमिह चैतन्यं जीव इत्युक्तः॥ १०६ ॥

टी०.– आकाश एक असून तें घट, मठ व भिंती या उपाधीनीं आवृ-त झालें असतां तें त्या कालीं द्वितीयत्वास प्राप्त होतें तसें विद्येनें आवृत जें चैतन्य तो जीव असें येथें म्हणतात.

ननु कथमावरणं स्यात् अज्ञानं ब्रह्मणो विशुद्धस्य
॥ सूर्यस्येव तमिस्त्रं रात्रिभवं स्वप्रकाशस्य ॥ १०७॥

टी०.– परंतु अतिशुद्ध ब्रह्मास अज्ञानावरण कसें होईल ? याचें उत्तर असें कीं, स्वप्रकाश सूर्यास रात्रींतील अंधकार जसा प्रतिबंधक होतो तद्वत्.

दिनकरकिरणोत्पन्नैर्मेघैराच्छाद्यते यथा सूर्यः
॥ न खलु दिनस्य दिनत्वं विकृतं सांद्राब्दसंघातैः
१०८

टी०.– सूर्यकिरणांपासून उत्पन्न झालेल्या मेघांच्या योगानें सूर्य ज-सा आच्छादित होतो तरी दिवसाचें दिवसत्व निबिड मेघसमुदायानीं निश्चयें करून विकार पावत नाहीं.

अज्ञानेन तथात्मा शुद्धोऽपि छाद्यते स्फुचिरं ॥ न प-

रं तु लोके सिद्धा प्राणिषु तच्चेतनाशक्तिः ॥ १०९ ॥

टी०.— तसा आत्मा शुद्ध असूनही अज्ञानानें बहुकाल आच्छादित हो तो परंतु प्राणिमात्रांच्या ठिकाणीं लोकसिद्ध जी आत्मसंबंधि ज्ञानशक्ति आहे ती नाश पावत नाहीं.

इतिमायासिद्धिप्रकर०

अथ लिंगदेहनिरूपणम्

स्थूलशरीरस्यांतर्लिंगशरीरं च तस्यांतः ॥ कारण मस्याप्यंतस्तस्यांतो महाकारणं तुर्यं ॥ ११० ॥

टी०.— स्थूलशरीराच्या आंत लिंगशरीर असून त्याच्या आंत कारण व त्याच्याही आंत जें त्यापेक्षां श्रेष्ठ महाकारण तें चौथें आहे.

स्थूलं निरूपितं प्रागधुना सूक्ष्मादि ते ब्रूमः ॥ अंगुष्ठ मात्रपुरुषः श्रुतिरिति यत् प्राह तत् सूक्ष्मं ॥ १११ ॥

टी०.— त्यांतील स्थूलशरीर पूर्वी सांगितलें. आतां तुला सूक्ष्मादिक सांगतों. तें असें कीं, अंगुष्ठमात्र पुरुष असें जें श्रुति बोलली तें सूक्ष्म जाणावें.

सूक्ष्माणि महाभूतान्यसवः पंचेंद्रियाणि पंचैव ॥ षोडशमंतःकरणं तत्संघातो हि लिंगतनुः ॥ ११२ ॥

टी०.— सूक्ष्मपंचमहाभूतें, पंचप्राण, पांचच ज्ञानेंद्रियें व सोळावें अंतःकरण यांचा जो समुदाय तो लिंगदेह समजावा.

तत्कारणं स्मृतं यत् तस्यांतर्वासनाजालं ॥ तस्यप्रवृत्तिहेतु बुद्ध्याश्रयमत्र तुर्यं स्यात् ॥ ११३ ॥

टी०.— त्याच्या आंत जें वासनाजाल तें कारण जाणावें आणि त्याच्या ही प्रवृत्तीला कारणभूत असून जें बुद्धीला आश्रयभूत तें येथें चौथें जाणावें.

तत्सारभूतबुद्धौ यत् प्रतिफलितं हि शुद्धचैतन्यं ॥ जीवः स उक्त आद्यैर्योहमिति स्फूर्तिकृद्वपुषि ॥ ११४

टी०.— तें सारभूत बुद्धींत प्रतिबिंबित झालेलें जें शुद्ध चैतन्य तो जीव असें पूर्वजानीं म्हटलें आहे तो कोणता असा प्रश्न केला असतां उत्तर

असें कीं, जो देहांत मी अशी स्फूर्ति करणारा तो जीव जाणावा.

चरतरतरंगसंगात् प्रतिभास्करे चंचलत्वं स्यात्
अस्ति तथा चंचलता चैतन्ये चित्तचांचल्यात् ॥११५

टी०.– अतिचंचल तरंगाच्या संगानें सूर्य प्रतिबिंबाच्या ठिकाणीं चंचलत्व जसें होतें तशी चैतन्याच्या ठिकाणीं चित्ताच्या चांचल्यानें चंचलता असो.

ननु अर्कप्रतिबिंबः सलिलादिषु यः स चावभासयति ॥ किमितरपदार्थनिवहं प्रतिबिंबोप्यात्मनस्तद्वत् ॥११६॥

टी०.– जें जलादिकांतील सूर्यप्रतिबिंब तें बाह्य प्रदेशीं निश्चयें करून जसें प्रकाश करतें तद्वत् आत्म्याचें प्रतिबिंबही कांहीं पदार्थांच्या समुदायास प्रकाशित करतें.

प्रतिफलितं यत्तेजः सवितुः कांस्यादिपात्रेषु ॥ तद्नुप्रविष्टमंतर्गृहमन्यार्थान् प्रकाशयति ॥११७॥

टी०.– सूर्याचें जें तेज कांसें आदिकरूनच्या पात्रांत प्रतिबिंबित झालें असून नंतर तें गृहांत प्रविष्ट झालें असतां अन्य पदार्थांस जसें प्रकाशित करतें.

चित्प्रतिबिंबस्तद्वद्बुद्धिषु यो जीवितं प्राप्तः ॥ नेत्रादींद्रियमार्गैर्बहिरर्थान् सोवभासयति ॥११८॥

टी०.– तद्वत् बुद्धींत जीवदशेला प्राप्त झालेलें जें चित्प्रतिबिंब तें नेत्रादिक इंद्रियमार्गांनीं बाह्यपदार्थांस प्रकाशित करतें.

इतिलिंगदेहप्रकरणम्

अथाद्वैतप्रकरणम्

तदिदं य एवमार्यो वेद ब्रह्माहमस्मीति ॥ स इदं सर्वं च स्यात्तस्य च देवाश्च नेशते भूत्या ॥ ११९ ॥

टी०.– जो श्रेष्ठ हें सर्व जग ब्रह्मरूप असून मीही ब्रह्म आहें असें जाणतो तो हें सकल विश्वरूप असून सर्व देव स्वसंपत्तीनें त्यावर सत्ता चालविण्यास समर्थ नाहींत.

एषां स भवत्यात्मा योऽन्यामथ देवतामुपास्ते यः ॥ अ-
हमन्यो सावन्यश्चेत्थं यो वेद पशुवत् सः ॥ १२० ॥

टी०.– कारण जो पूर्वोक्त ज्ञानी तो त्या देवांचा आत्मा होतो आणि जो अन्यदेवतेची उपासना करतो, मी अन्य व देव अन्य असें जो जाणतो तो पशुवत् अज्ञानी समजावा.

इत्युपनिषदामुक्तिस्तथा श्रुतिर्भगवदुक्तिश्च ॥ ज्ञा-
नी त्वात्मैवेयं मतिर्ममेत्यत्र युक्तिरपि ॥ १२१ ॥

टी०.– अशी उपनिषदांची उक्ति असून तशी याविषयीं श्रुति व गीतेंत भगवदुक्तिही आहे ती अशी कीं, ज्ञानी तर माझा आत्माच आहे अशी माझी मति आहे आणि याविषयीं ही पुढील युक्ति ही आहे.

ऋजुवक्रं वो काष्ठं हुताशदग्धं सदग्नितां याति ॥
तत् किं हस्तग्राह्यं ऋजुवक्राकारसत्वेऽपि ॥ १२२ ॥

टी०.– ती अशी कीं, सरळ किंवा वक्र असें काष्ठ अग्नीनें दग्ध झालें असतां तें अग्निरूपाला पावतें नंतर तें सरळ अथवा वक्र अशा आकारानें युक्त असलें तरी तें पूर्ववत् हस्तानें ग्रहण करतां येईल काय?

एवं य आत्मनिष्ठो ह्यात्माकारश्च जायते पुरुषः ॥
देहीव दृश्यते ऽसौ परं त्वसौ केवलो ह्यात्मा ॥ १२३ ॥

टी०.– अशा रीतीनें जो पुरुष आत्मज्ञाननिष्ठ झाल्यानें आत्मस्वरूप होतो तो देहधारी जीवासारखा जरी दिसला तथापि तो केवळ आत्माच जाणावा.

प्रतिफलति भानुरेकोऽनेकशरावोदकेषु यथा ॥ त-
द्वदसौ परमात्मा ह्येकोऽनेकेषु देहेषु ॥ १२४ ॥

टी०.– जसा सूर्य एक असून तो अनेक परळांतील उदकांत अनेक रूपानीं प्रतिबिंबित होतो तसा हा परमात्मा एक असून तो अनेक देहांत अनेक रूपानीं भासतो.

दैवादेकशरावे भग्ने किंवा विलीयते सूर्यः ॥ प्रति-
बिंबचंचलत्वादर्कः किं चंचलो भवति ॥ १२५ ॥

टी०.– आणि दैवयोगानें त्या परळांतील एक परळ फुटला असतां

त्यांतील सूर्य नाश पावतो कीं काय? अथवा त्या परळांतील सूर्य प्रतिबिंब चंचल झाल्यानें आकाशस्थित सूर्य चंचल होतो काय?

स्वव्यापारं कुरुते यथैकसवितुः प्रकाशेन लोकः॥ तद्वच्चराचरमिदमेकात्मसत्तया परं चलति॥१२६॥

टी०- जसा लोक एका सूर्याच्या प्रकाशानें आपापला व्यापार करितात तसें हें चराचर एका आत्म्याच्या सत्तेनें उत्तम प्रकारें चालतें.

येनोदकेन कदलीचंपकजात्यादयः प्रवर्धंते॥ मूलकपलांडुलशुनास्तेनैवेते विभिन्नरसगंधाः॥१२७॥

टी०- केळी, चांफा व जाई आदिकरून वृक्ष ज्या उदकानें वाढतात त्याच उदकानें मुळे, कांदे व लसूण हे अतिभिन्न रस व गंध यानीं युक्त असे पदार्थ वाढतात.

एको हि सूत्रधारः काष्ठप्रकृतीरनेकशो युगपत्॥ स्तंभाग्रपट्टिकायां नर्तयतीह प्रगूढतया॥१२८॥

टी०- तसाच एक सूत्रधार अनेक काष्ठपुतळ्या एककालीं खांबाच्या अग्रपट्टिकेवर गुप्तरूपानें या लोकीं नाचवितो.

गुडखंडशर्कराद्या भिन्नाः स्युर्विकृतयो यथैकस्योः॥ केयूरकंकणाद्या यथैकहेम्नो ऽभिधाश्च पृथक्॥१२९॥

टी०- गूळ व खडिसाखर हे भिन्न विकार जसे एकाच उंसापासून होतात आणि बाहुभूषणें व कंकणें इत्यादिक अनेक नांवाचे अलंकार जसे एका सुवर्णाचे निरनिराळे होतात.

एवं पृथक्स्वभावं पृथगाकारं पृथग्वृत्ति॥ जगदुच्चावचमुच्चैरेकेनैवात्मना चरति॥१३०॥

टी०- या प्रमाणेंच भिन्न स्वभाव, भिन्न आकार व निरनिराळ्या वृत्ति यानीं युक्त असें उच्च नीच जग एकाच आत्म्याच्या योगानें उत्तम प्रकारें संचार करतें.

स्कंधोत्थतसिद्धचरुं यावन्नाप्नोति मार्गगस्तावत्॥ स्पर्शभयं क्षुत्पीडा तस्मिन् भुक्ते न सा भवति॥१३१॥

टी०:– मार्गस्थ मनुष्य आपल्या खांद्यावर घेतलेला शिजलेला भा
त जों पर्यंत भक्षीत नाहीं तों पर्यंत त्यास विटाळाचें भय व क्षुधेची
पीडा हीं होतात आणि तो भात भक्षिल्यावर ती क्षुधेची पीडा व वि
टाळाचें भय हीं होत नाहींत.

मनुजमतंगजमहिषश्वसूकरादिष्वनुस्यूतं ॥ यः प
श्यति जगदीशं भुंक्ते सोऽद्वयानंदं ॥ १३२ ॥

टी०:– मनुष्य, हत्ती, रेडे, श्वान व डुकर इत्यादिकांच्या ठिकाणीं सर्व ज-
ग ईश्वररूप आहे असें जो पाहतो तो अद्वैतानंद भोगतो.

इति द्वैतप्रकरणम्

अथाकर्तृत्वाभोक्तृत्वप्रकरणं

यद्वत् सूर्ये ऽभ्युदिते स्वव्यवहारं जनः कुरुते ॥ तं
न्ने करोति विवस्वान्नो कारयति तद्वदात्मापि ॥ १३३ ॥

टी०:– सूर्य उदय पावला असतां जन आपला व्यवहार जो करतो तेंज
सें सूर्य करीत नाहीं व करवीत नाहीं तद्वत् आत्माही स्वतः किमपि क
रीत नाहीं व करवीतही नाहीं.

लोहे हुतभुग्व्याप्ते लोहांतस्ताड्यमानेपि ॥ तस्यां
तर्गतवन्हेः किं स्यान्निर्घातजं दुःखं ॥ १३४ ॥

टी०:– लोखंड अग्नीनें तापवून लाल केलें असून त्यास वरून किंवा
त्याच्या गर्भांत ताडन केलें तरी त्याच्या आंतल्या अग्नीस ताडनज
न्य दुःख आहे काय?

निष्ठुरकुठारघातैः काष्ठे संछेद्यमाने ऽपि ॥ तस्या-
भ्यंतरवर्ती वन्हिः किंछिद्यते तद्वत् ॥ १३५ ॥

टी०:– त्याच प्रमाणें कुऱ्हाडीच्या कठोर प्रहारानीं काष्ठ तोडलें तरी
त्यांतील अग्नि तुटला जातो काय? नाहीं तद्वत् आत्मा अभोक्ता
समजावा.

तनुसंबंधाज्जातैः सुखदुःखैर्लिप्यते नात्मा ॥ ब्रू
ते श्रुतिरपि स्फुटयोऽनश्नन्नन्योऽभिचाकशीत्यादि
॥ १३६ ॥

टी०.– तसा आत्मा देहसंबंधानें झालेल्या सुखदुःखानीं लिप्त होत नाहीं आणि अन्य जो आत्मा तो सुखदुःख न भोगतां स्वमहिम्यानें प्रकाशमान मात्र असतो इत्यादि अर्थ श्रुतीही वारंवार बोलत्ये.

निशि वेश्मनि प्रदीपो दीप्यति चौरस्तु वित्तमपहर-
ति ॥ ईरयति वारयति वा तं दीपः किं तथाऽत्मापि
॥१३७॥

टी०.– जसा दीप रात्री घरांत प्रकाशित असून चोर तर द्रव्य हरण करतो त्यास दीप चोरीविषयीं प्रेरणा करतो किंवा निवारण करतो काय ? नाहीं. तसा आत्माही अकर्ता जाणावा.

गेहांतर्दैववशात् कस्मिंश्चित् समुदिते विपन्नेवा
दीपस्य शुष्यत्यथवा खिद्यति किं तद्वदात्मापि १३८

टी०.– गृहांत दैववशात् कोणी उत्पन्न झाला अथवा मृत्यु पावला किंवा विपत्तिग्रस्त झाला तरी दीप शुष्क होतो किंवा खिन्न होतो काय ? तद्वत् आत्माही जाणावा.

इत्यकर्तृत्वाभोक्तृत्वप्रकरणं

अथस्वप्रकाशप्रकरणं

रविचंद्रवन्हिदीपप्रमुखाः स्वपरप्रकाशाः स्युः ॥ यद्य-
पितथाऽप्यमीभिः प्रकाशते क्वापि नैवात्मा ॥१३९॥

टी०.– जरी सूर्य, चंद्र, अग्नि व दीप इत्यादिक आपणास व इतरांस प्रकाशकरणारे आहेत तथापि त्यांच्या योगानें आत्मा कोठेंही प्रकाशित होत नाहींच.

चक्षुर्द्वारेव स्यात् परात्मनो भानमेतेषां ॥ यद्वाऽन्ये
पि पदार्था न ज्ञायंतेऽथ केवलालोकात् ॥ १४० ॥

टी०.– आणि सूर्यचंद्रादिकांचा प्रकाश परमात्म्याच्या नेत्रद्वाराच होतो अथवा घटपटादिक अन्य पदार्थही केवल प्रकाशानें जाणले जात नाहींत.

नेत्राण्यक्षिद्वारा सहायभूतो न नेंद्रात्मा ॥ नोचेत्
सत्यालोके पश्यत्यंधः कथं नार्थान् ॥ १४१ ॥

टी०.– तेथेंही नेत्रद्वारा अवलोकना विषयीं आत्मा जर साहाय्य न सेल तर पदार्थ दर्शन होणार नाहीं याविषयीं प्रमाणभूत अनुभवअ साकीं, प्रकाश असतां अंध मनुष्य पदार्थास कसा पहात नाहीं ?

सत्यात्मन्यपि किन्नो ज्ञानं तच्चेंद्रियांतरेण स्यात्
अंधे प्रनिद्दग्बंधे करेसंबंधे पदार्थभानं हि ॥ १४२ ॥

टी०.– आणि आत्मा असूनही ज्ञान कां होत नाहीं ? तर तें ज्ञान आत्मा असतां अन्य इंद्रियानें होतें. याचा अनुभव असा कीं, अंधमनुष्याच्या ठिकाणीं दृष्टीचा प्रतिबंध असून त्यास हस्तसंबंध झालाअसतां पदार्थज्ञान होतें.

जानाति येन सर्वं केन च तं वा विजानीयात् ॥ इत्युपनिषदामुक्तिर्बुध्येत आत्मात्मना वे स्यात् ॥ १४३

टी०.– तसेंच ज्याच्या योगें सर्व जाणतो त्यास कशानें जाणावें ? तर त्यास जाणण्या विषयीं कोणतें साधन समर्थ नाहीं अशी उपनिषदांची उक्ति आहे तस्मात् आत्मा स्वयमेव आपणास जाणतो.

इतिस्वप्रकाशप्रकरणं
अथनादानुप्रकरणं

यावत् क्षणं क्षणार्धं स्वरूपपरिचिंतनं क्रियते ॥
तावद्दक्षिणकर्णे त्वनाहतः श्रूयते शब्दः ॥ १४४ ॥

टी०.– क्षण किंवा अर्धक्षण परिमित जो कालपर्यंत आत्मस्वरूपाचें चिंतन केलें जातें तोंपर्यंत उजव्या कानांत आपल्या आपण होणारा शब्द ऐकण्यांत येतो.

चित्तं विषयोपरमाद्यथा यथा याति नैश्चल्यं ॥ वेणोरिव दीर्घतरं तथा तथा श्रूयते नादः ॥ १४५ ॥

टी०.– चित्त विषयां पासून जसजसें परावृत्त होऊन स्थिर होतें तसतसा वेणुनादा सारखा अतिदीर्घ नाद दक्षिण कर्णांत होणारा ऐकण्यांत येतो. १४५.

सिद्ध्यारंभे स्थिरता विश्रमविश्वासबीजशुद्धीनां ॥
उपलक्षणं हि मनसः परमं नादानुसंधानं ॥ १४६ ॥

टी०.- सिद्धिप्राप्तीच्या उपायांचे आरंभीं मनास ओंकार संबंधि नादाचें अनुसंधान असणें हें उत्तम साधन असून मनास स्थिरता, विश्रांति, विश्वास व बीजशुद्धि या साधनांचें उपलक्षण आहे.

भेरीमृदंगशंखाद्याहतिनादे मनः क्षणं रमते॥
किं पुनरनाहतेऽस्मिन् मधुमधुरेऽखंडिते स्वस्थे ॥ १४७॥

टी०.- नौबद, मृदंग व शंख यांपासून होणाऱ्या नादाच्या ठिकाणीं मन क्षणमात्र रमतें तेव्हां आत्मस्वरूपस्थ, अखंडित व मधुरापेक्षांही मधुर अशा या स्वयमेव होणाऱ्या ध्वनीच्या ठिकाणीं मन रमतें हें पुनः काय सांगावें.

नादाभ्यंतरवर्ति ज्योतिर्यद्वर्तते हि चिरं॥ तत्र मनो लीनं चेन्न पुनः संसारबंधाय॥ १४८॥

टी०.- आणि त्या नादाच्या अभ्यंतरीं वर्तणारें जें ज्योतिरूप ब्रह्म बहुकाल असतें त्या स्वरूपीं जर मन लीन झालें तर तें पुनः संसारबंधास कारण होत नाहीं.

परमानंदानुभवात् सुचिरं नादानुसंधानात्॥
श्रेष्ठश्चित्तलयोऽयं सत्स्वन्यलयेष्वनेकेषु॥१४९

टी०.- अतिचिरकाल पर्यंत त्या नादाच्या अनुसंधानानें होणाऱ्या परमानंदाच्या अनुभवें करून जो चित्ताचा लय होतो हा अनेक अन्य-लय असतां त्यांत श्रेष्ठ आहे.

इतिनादानुप्रकरणं

अथमनोलयप्रकरणम्

संसारतापतप्तं नानायोनिभ्रमात् परिश्रांतं॥
लब्ध्वा परमानंदं न चलति चेतः कदा क्वापि॥१५०

टी०.- संसारसंबंधि दुःखानीं ताप पावलेलें असून अनेक योनींतील भ्रमणामुळें अत्यंत श्रम पावलेलें अंतःकरण परमानंद पावून कोणत्या कालीं कोठेंही चलन पावत नाहीं.

अहैतानंदभरात् किमिदं कोऽहं च कस्यायं॥ इ

ति मंथरतां याति यदा तदा मूर्छितं चेतः ॥१५१॥

टी०- अद्वैतानंदातिशयामुळें हें काय मी कोण व हा कोणाचा अशा रीतीनें मंद्गतीला चित्त जेव्हां प्राप्त होतें तेव्हां तें मूर्छित होतें.

चिरतरमात्मानुभवादात्माकारं प्रजायते चेतः ॥ सरिदिव सागरयाता समुद्रभावं प्रयात्युच्चैः॥ ॥१५२॥

टी०- अंतःकरण, अतिशयें करून चिरकाल पर्यंत आत्मस्वरूपाच्या अनुभवानें आत्मस्वरूपाकार होतें. यास दृष्टांत. समुद्रास प्राप्त झालेली नदी जशी उत्तम प्रकारें समुद्ररूपाला पावते तद्वत्.

आत्मन्यनुप्रविष्टं चित्तं नापेक्षते पुनर्विषयान् ॥ क्षीरादुद्धृतमाज्यं यथा पुनः क्षीरतां न यातीह॥१५३॥

टी०- आत्मस्वरूपीं प्रविष्ट झालेलें चित्त पुनः विषयांस इच्छीत नाहीं यास दृष्टांत दुधापासून काढलेलें तूप जसें पुनः दुग्धत्वाला पावत नाहीं तसें या चित्ताविषयीं समजावें.

दृष्टौ द्रष्टरि दृश्ये यदनुस्यूतं हि भानमात्रं स्यात् ॥ तत्रोपक्षीणं चेच्चेतस्तन्मूर्छितं भवति ॥१५४

टी०- दृष्टि, पाहणारा व दृश्य पदार्थ या त्रिपुटींत व्याप्त जें प्रमाणभूत आत्मस्वरूप आहे त्यांत अंतःकरण जर लीन झालें तर तें मूर्छित होतें म्हणजे पुनः विषयांवर जात नाहीं.

याति स्वसन्मुखत्वं दृङ्मात्रं वा यदा तदा भवति ॥ दृश्यद्रष्टृविभेदो ह्यसन्मुखेऽस्मिन्न तद्भवति ॥१५५॥

टी०- ज्या कालीं दृष्टिमात्र आपल्या सन्मुख येतें तेव्हां दृश्य व पाहणारा यांत अत्यंत भेद दिसतो आणि तें दृङ्मात्र जेव्हां समोर नसे त्या वेळेस त्या दृश्य द्रष्ट्यांतील भेद दिसत नाहीं.

एकस्मिन् दृङ्मात्रे तत्र द्रष्ट्रादिकं हि समुदेति॥ लीने द्रष्टरि दृश्ये दृङ्मात्रमेव शिष्यते पश्चा-

न् ॥१५६॥

टी०- एक दृङ्मात्र असतां त्यांत द्रष्टा व दृश्यपदार्थ हे उत्तम प्रकारें उद्यास येतात आणि द्रष्टा व दृश्य हे लयास गेले असतां पश्चात् तें दृष्टिरूपच राहतें.

दर्पणतः प्राक् पश्चादस्ति मुखं प्रतिमुखे तदाभा-
से ॥ आदर्शेऽपि च नष्टे मुखमस्ति मुखे तथैवा-
त्मा ॥ १५७ ॥

टी०- मुख, आरशाच्या पूर्वी आपल्या ठिकाणीं असून तें पश्चात् प्र तिबिंबरूप आभासांत असतें आणि आरसा नाश पावला असतां प्रतिबिंबरूप मुख आपल्या बिंबरूप मुखांत जसें असतें तद्वतच आत्माही जाणावा.

इतिमनोलयप्रकरणं

अथप्रबोधप्रकरणम्

माधुर्यं गुडपिंडे यत्तत्तस्यांशकेऽणुमात्रेऽपि ॥ ए-
वं न पृथग्भावो गुडत्वमधुरत्वयोरस्ति ॥ १५८ ॥

टी०- गुळाच्या गोळ्यांत जें माधुर्य तें त्याच्या अणुमात्र अंशांतही अ सतें या प्रकारें गूळ व त्याचें मधुरत्व यांमध्यें निराळेपणा नाहीं.

अथवा न भिन्नभावः कर्पूरामोदयोरेवं ॥ आ
त्मत्वभावमनसां पुंसां जगदात्मतां याति ॥१५९

टी०- किंवा जसा कापुर व तत्संबंधि सुगंध यांचा भिन्नभाव ना- हीं त्या प्रमाणें आत्मत्वभावना झालेल्या मनयुक्त पुरुषांस सर्वज- ग आत्मस्वरूप भासतें.

यद्भावानुभवः स्यान्निद्रादौ जागरस्यांते ॥ अंतः
संचेत् स्थिरः स्यात्तदा लभेदद्वयानंदं ॥१६०॥

टी०- निद्रेच्या आरंभीं व जागृतीच्या अंतीं ज्या वृत्तीचा अनुभव होतो ती वृत्ति जर अंतःकरणांत स्थिर होईल तर त्या कालीं अद्वैतानं द पावेल.

अतिगंभीरेऽपारे ज्ञानचिदानंदसागरेऽनंते ॥ क

मेसमीरणतरला जीवतरंगावलिः स्फुरति ॥१६१॥

टी०- अत्यंत खोल, अपार व नाशरहित अशा ज्ञानचैतन्यानंदसागरांत कर्मरूप वायूच्या वेगानें चंचल होणारी जीवरूप लाटांची पंक्ति स्फुरण पावल्ये.

खरतरकरैः प्रदीप्ते ऽभ्युदिते चैतन्यतिग्मांशौ ॥
स्फुरति मृषैव समंतादनेकविधजीवमृगतृष्णा ॥१६२

टी०- अतितीक्ष्ण किरणानीं प्रदीप्त असा चैतन्यस्वरूप तीव्र किरण युक्त सूर्य उदयास आला असतां मिथ्याभूतच अनेक प्रकारचे जीव हेंच कांहींएक मृगजल सर्वत्र स्फुरण पावतें.

अंतरदृष्टे यस्मिन् जगदिदमारात् परिस्फुरति ॥
दृष्टे यस्मिन् सकृदपि विलीयते क्वाप्यसद्रूपं ॥१६३

टी०- अंतःकरणांत जें आत्मस्वरूप न पाहिलें असतां हें जग समीपभागीं स्फुरण पावतें असें दिसतें आणि जें आत्मस्वरूप एकवार तरी पाहिलें असतां मिथ्यारूप जग कोठेंतरी लयास जातें.

बाह्याभ्यंतरपूर्णे परमानंदार्णवे निमग्नो यः ॥ चिरमाप्लुत इव कलशो महाह्रदे जह्नुतनया याः ॥१६४॥

टी०- सबाह्याभ्यंतरीं पूर्ण अशा परमानंद समुद्रांत जो निमग्न होईल तो जान्हवीच्या महाडोहांत चिरकाल बुडालेल्या कलशासारखा समजावा.

संपूर्णावरणांबुतैलनिवहे ब्रह्मांडभांडोदरे सूत्रे सत्त्रिगुणात्मके समुदिते शश्वत् परंज्योतिषः॥ अज्ञानांधतमोनिवारणपटौ बोधप्रदीपोदये शश्वज्ज्ञानवतां पतंत्यनुदिनं चेतः पतंगा इह ॥१६५॥

टी०- ब्रह्मांडरूप भांड्यांत पृथिव्यादिक सप्तावरणरूप तेलसमुदायामध्यें उत्तम त्रिगुणात्मक सूत्राच्या पुंजावर निरंतर परब्रह्माच्या अज्ञानरूप अंधकाराच्या निवारणाविषयीं समर्थ असा ज्ञानरूप

दीपाचा उत्तम प्रकारें उदय झाला असतां शुद्धज्ञानवंत पुरुषांचे अं तःकरणरूप पतंग येथें प्रतिदिवशीं पतन पावतात.

पूर्णात्पूर्णतरे परात् परतरे ऽप्यज्ञातपारे हरौ संविल्स्फारसुधार्णवे ऽविरहिते वीचीतरंगादिभिः॥ भास्वत्कोटिविकाशसोज्ज्वलदिगाकाशे ऽवकाशे नृणामानंदैकरसे निमग्नमनसां न त्वं न चाहं जगत्॥१६६॥

टी०- पूर्णापेक्षां अतिपूर्ण, पराहून ही अत्यंत पर, ज्याचा अंत कोणा सही समजत नसून लाटा व तरंग इत्यादिकानीं रहित, ज्ञानवृद्धिरूप अमृतसमुद्ररूपी अशा हरीविषयीं मनःपूर्वक निमग्न झालेल्या पुरुषांस तूं, मी व जग असे भिन्नभाव असत नाहींत.

इतिप्रबोधप्रकरणं

अथद्विधाभक्तिप्रकरणं

चित्ते सत्वोत्पन्नो तडिदिव बोधोदयो भवति॥ तद्व्येव संस्थिरः स्याद्यदि चित्तं शुद्धिमुपयाति॥१६७॥

टी०- चित्तांत सत्वगुणाची उत्पत्ति झाली असतां त्यांत विद्युल्लतेसारखा ज्ञानांचा उदय होतो. परंतु जर चित्त शुद्धीला पावलें तरच तो स्थिर होतो.

शुध्यति हि नांतरात्मा कृष्णपदांभोजभक्तिमृते॥ वसनमिव क्षारोदैर्भक्त्या प्रक्षाल्यते चेतः॥१६८

टी०- त्या चित्तशुद्धीचा उपाय असा कीं, अंतःकरण कृष्णाचरणकमलभक्तीवांचून शुद्ध होत नाहीं. क्षारयुक्त उदकानें वस्त्र जसें शुद्ध होतें तसें चित्त भक्तीनें शुद्ध होतें.

यद्वत् समलादर्शो सुचिरं भस्मादिना शुद्धे॥ प्रतिफलति वक्त्रमुच्चैः शुद्धे चित्ते तथा ज्ञानं॥१६९

टी०- दुसरा दृष्टांत. मलिन आरसा भस्मादि पदार्थांनीं निर्मलझाला असतां त्यांत जसें उत्तमरीतीनें मुखाचें प्रतिबिंब बहुकाल दि-

सतें तसें चित्त शुद्ध झालें असतां त्यांत ज्ञान प्रगट होतें.

ज्ञाने तु तत्र बीजं हरिभक्त्या ज्ञानिता योस्यात् ॥ मूर्तं चैवामूर्तं द्वे एवं ब्रह्मणो रूपे ॥ १७० ॥ इत्यु पनिषत्तयोर्वा द्वौ भक्तो भगवदुपदिष्टो ॥ क्लेशाद क्लेशाद्वा मुक्तिः स्यादेतयोर्मध्ये ॥ १७१ ॥

टी०- परंतु जी हरिभक्तीनें ज्ञानसंपन्नता प्राप्त होईल तें त्या ज्ञान-प्राप्तीविषयीं कारण आहे आणि मूर्त व अमूर्त अशीं दोनच रूपें ब्रह्माचीं आहेत. अशी उपनिषदांची उक्ति असून त्या दोन रूपांचे दोन भक्त भगवानानें सांगितलेले आहेत त्यांमध्यें कितीएकांस क्लेशानें मुक्ति होते किंवा कित्येकांस अक्लेशानें मोक्ष होतो.

स्थूला सूक्ष्मा चेति द्विधा च हरिभक्तिरुद्दिष्टा ॥ प्रारंभे स्थूला स्यात् सूक्ष्मा तस्याः सकाशाच्च ॥ १७२ ॥

टी०- तशीच हरिभक्ति स्थूल व सूक्ष्म अशी दोन प्रकारची आहे; त्यांत प्रारंभीं स्थूलभक्ति व नंतर तिजपासून सूक्ष्मभक्ति प्राप्त होते.

स्वाश्रमधर्माचरणं कृष्णप्रतिमोत्सवो नित्यं ॥ विविधोपचारकरणैर्हरिदासैः संगमः शश्वत् ॥ १७३

टी०- त्या स्थूलसूक्ष्म भक्तींचा प्रकार असा कीं, नित्यशः आपल्या आश्रमसंबंधि धर्माचें आचरण, अनेक उपचाररूप साधनानीं कृष्णप्रतिमेचा उत्सव आणि निरंतर हरिदासांशीं समागम करावा.

कृष्णकथासंश्रवणे महोत्सवः सत्यवादश्च ॥ परयुवतौ द्रविणे वा परापवादे पराङ्मुखता ॥ १७४

टी०- तसाच कृष्णकथांच्या उत्तम श्रवणाविषयीं महान् उत्सव, सत्य भाषण आणि तरुण परस्त्री, परधन व परनिंदा यां विषयीं पराङ्मुखता असणें.

ग्राम्यकथासूद्वेगः सुतीर्थगमनेषु तात्पर्यं ॥ यदुपतिकथावियोगे व्यर्थं गतमायुरिति चिंता ॥ १७५

टी०- त्याच प्रमाणें लोकवार्ता विषयीं त्रास, उत्तम तीर्थयात्रां विष-

यीं आदर आणि श्रीकृष्णकथेच्या वियोगानीं आयुष्य व्यर्थ गेलें अशी चिंता लागणें.

एकां कुर्वति भक्तिं कृष्णकथानुग्रहोत्पन्नां ॥ स मुदेति सूक्ष्मभक्तिर्यस्यां हरिरंतराविशति ॥ १७६

टी०- कृष्णकथेच्या अनुग्रहानें प्राप्त झालेली मुख्य अनन्यभक्ति करीत असतां सूक्ष्मभक्ति प्राप्त होते. ती प्राप्त झाली असतां हरि अंतःकरणांत प्रविष्ट होतो.

स्मृतिराप्तपुराणवाक्यैर्यथाश्रुतायां हरेर्मूर्तौ ॥ मानसपूजाभ्यासो विजननिवासेऽपि तात्पर्यं ॥ १७७

टी०- यथार्थ प्रतिपादक पुराणवाक्यानीं यथासांग श्रवण केलेल्या हरिमूर्तीच्या ठिकाणीं मानस पूजेचा अभ्यास, हरिमूर्तीचें स्मरण व एकांतवास यां विषयीं ही आस्था असणें.

सत्यं समस्तजंतुषु कृष्णस्यावस्थितेर्ज्ञानं ॥ अद्रोहो भूतगणे ततस्तु भूतानुकंपा स्यात् ॥ १७८ ॥

टी०- सत्य भाषण करणें, सर्वप्राणिमात्रांचे ठिकाणीं कृष्णाच्या स्थितीचें ज्ञान, भूतमात्रीं द्रोह न करणें, तंतर सर्व प्राण्यांविषयीं दया करणें हें विहित आहे.

प्रमितयदृच्छालाभे संतुष्टिर्दारपुत्रादौ ॥ ममतायाशून्यत्वमतो निरहंकारत्वमक्रोधः ॥ १७९ ॥

टी०- सिद्ध ईश्वरेच्छेनें होणाऱ्या लाभांत संतोष असून स्त्रीपुत्रादिकांविषयीं ममतारहित असावें आणि या पुढें निरभिमानित्व व क्रोध वर्जित असावें.

मृदुभाषिता प्रसादो निजनिंदायांस्तुतौ समता ॥ सुखदुःखशीतलोष्णद्वंद्वसहिष्णुत्वमापदो न भयं ॥ १८० ॥

टी०- मृदुभाषण करणें, चित्तप्रसन्नता, आपल्या निंदास्तुतीं विषयीं समबुद्धि, सुख, दुःख, शीतल व उष्ण इत्यादि द्वंद्वें सहन करणें आणि विपत्तीचें भय न मानणें.

निद्राहारविहारेष्वनादरः संगराहित्यं ॥ वचने
चानवकाशो नृहरिस्मरणेन शाश्वती शांतिः ॥१८१

टी०- निद्रा, आहार, क्रीडा यां विषयीं अनादर, संगहीनत्व, वृथा भाषणाविषयींही अवकाश नसणें व नृसिंहाच्या ध्यानानें शाश्वती शांति प्राप्त होते.

केनापि गीयमाने हरिगीते वेणुनादे वा ॥ आ
नंदाविर्भावाद्युगपत् स्यादष्टसात्विकोद्रेकः ॥१८२

टी०- कोणीही हरीचें गीत किंवा वेणुनाद गायन केला असतां आनंदाच्या आविर्भावानें तत्काल आठ सात्विक भावांचें अतिशयित आधिक्य होतें.

तस्मिन्ननुभवति मनः प्रगृह्यमाणं परात्मसु
खं ॥ स्थिरतां याते तस्मिन् याति मदोन्मत्तदंति
दशां ॥ १८३ ॥

टी०- त्या अष्टसात्विक भावांचा अनुभव घेत असून मन परमात्मसुख घेऊन तें स्थिरतेला प्राप्त झालें असतां मदोन्मत्त हत्तीच्या अवस्थेला पावतें.

जंतुषु भगवद्भावं भगवति भूतानि पश्यति क्र
मशः ॥ एतादृशी दशा चेत्तदेव हरिदासवर्यः
स्यात् ॥ १८४ ॥

टी०- प्राणिमात्रांच्या ठिकाणीं भगवानाची सत्ता व भगवत्स्वरूपीं भूतें असें क्रमानें पाहतो अशी दशा जर अंगीं आली तर तो त्या कालींच हरिदास चर्येनें युक्त झाला असें समजावें.

इतिद्विधाभक्तिप्रकरणं

अथध्यानविधिप्रकरणं

यमुनातटनिकटस्थितवृंदावनकानने महारम्ये
॥ कल्पद्रुमतलभूमौ चरणं चरणोपरि स्थाप्य
॥१८५॥

टी०- यमुनातीरासमीप असणारें जें वृंदावन नामक अरण्य तें

महारम्य असून त्यांतील कल्पवृक्षा खालच्या भूमीवर चरण च-
रणावर स्थापन करून

तिष्ठंतं घननीलं स्वतेजसा भासयंतमिह विश्वं
॥ पीतांबरपरिधानं चंदनकर्पूरलिप्तसर्वांगं ॥ १८६

टी०.- उभा राहिला असून स्वकीय तेजानें या ब्रह्मांडांत जगास
भासविणारा, पीतांबर धारी, चंदन व कापूर यांनीं सर्वांगीं लेपन
युक्त व सजल मेघासमान श्यामवर्ण असणारा.

आकर्णपूर्णनेत्रं कुंडलयुगमंडितश्रवणं ॥ मंद
स्मितमुखकमलं सकौस्तुभोदारमणिहारं ॥ १८७॥

टी०.- आकर्ण विशाल नेत्र असून कुंडलद्वयानें शोभित कर्णयुक्त,
मंदहास्य सहितमुखकमल व कौस्तुभमणिसहित उदार नवरत्न
मणिहार यांनीं शोभायमान.

वलयांगुलीयकाद्यानुज्ज्वलयंतं स्वलंकारान् ॥
गलविलुलितवनमालं स्वतेोऽरन्यस्तकलिका-
लम् ॥ १८८ ॥

टी०.- कडीं, तोडे व आंगठ्या इत्यादिक उत्तम अलंकारास आपल्या
कांतीनें शोभविणारा आणि गळ्यांत लंबायमान वनमालेनें युक्तअ
सून आपल्या पायांतील तोडर (तोरड्या) यांच्या ठिकाणीं कलिका
लास स्थापन करणारा.

गुंजारवालिकलितं गुंजापुंजान्वितं शिरसि ॥ भुं
जानं सह गोपैः कुंजांतर्वर्तिनं हरिं स्मरत ॥ १८९॥

टी०.- गुंजारव करणाऱ्या भ्रमरानीं वर्णित असून मस्तकावर गुं-
जांचे शिरोभूषणानें युक्त, गोपगणासह भोजन करणारा व कुंजव
नांत लीला करणारा अशा हरीला स्मरा.

मंदारपुष्पवासेर्मंदानिलसेवितं परानंदं ॥ मंदा
किनीयुतपदं स्रमहानंदप्रदं महापुरुषं ॥ १९० ॥

टी०.- मंदारपुष्पांच्या सुगंधानें युक्त अशा मंदवायूनीं सेवित अ-
सून स्वयें पमानंदरूप, चरणीं भागीरथीच्या प्रवाहानें युक्त अशा

उत्कृष्ट महानंददायक महापुरुषरूप श्रीकृष्णास आह्मी ध्यातों.

स्फुरभीकृतदिग्वलयं स्फुरभिशतैरावृतं परितः
॥स्फुरभीतिक्षपणमिहास्फुरभीमं यादवं नमत॥
॥१९१॥

टी०- सर्व दिशांचें वर्तुल ज्यानें सुगंधयुक्त केलें असून जो सभों वती शेंकडो गायींनीं वेष्टित देवांच्या भीतीचा नाश करणारा व अ सुरांस भयंकर अशा श्रीकृष्णास या लोकीं नमस्कार करा.

कंदर्पकोटिसुभगं वांछितफलदं दयाघनं कृष्णं
॥त्यक्त्वा कमन्यविषयं नेत्रयुगं द्रष्टुमुत्सहते॥१९२॥

टी०- कोटिमदनासमान सुंदर, इच्छितफलदाता व दयाघन अशा कृष्णास त्यजून नेत्रद्वय कोणत्या अन्यविषयास पाहण्या विषयीं उत्साह पावतें.

पुण्यतमाममलरसां मनोभिरामां हरेः कथां त्य-
क्त्वा॥ श्रोतुं श्रवणद्वंद्वं ग्राम्यंकथामादरं वहति॥१९३

टी०- अतिपुण्य कारक, अत्यंत सुरस, मनास आल्हाद दायक अशी हरीची कथा टाकून कर्णद्वय लोकवार्ता श्रवण करण्यासाठीं आसक्त होतें.

दौर्भाग्यमिंद्रियाणां कृष्णे विषये त्वसंस्तु सर्वेषु
॥क्षणिकेषु पापकरणेष्वपि सज्जंते यदन्यविष
येषु॥१९४॥

टी०- कृष्णपरमात्मा हा उत्तम विषय असून क्षणभंगुर पापसाध न अशाही अमंगल सर्व अन्यविषयांच्या ठिकाणीं इंद्रियें जीं आ सक्त होतात तें इंद्रियांचें मंदभाग्य जाणावें.

इतिध्यानविधिप्रकरणम्

अथसगुणनिर्गुणयोरैक्यप्रकरणम्

श्रुतिभिर्महापुराणैः सगुणगुणातीतयोरैक्यं॥यत्
प्रोक्तंगूढतया तदहं वक्ष्ये ऽतिविशदार्थं॥१९५॥

टी०- वेद व अष्टादश पुराणें यांनीं सगुण व निर्गुण यांचें ऐक्य गुप्त

रीतीनें जें सांगितलें आहे तें मी अतिस्पष्टार्थ रीतीनें सांगतों.

भूतेष्वंतर्यामी ज्ञानमयः सच्चिदानंदः॥ प्रकृतेः परः
परात्मा यदुकुलतिलकः स एवायं॥ १९६॥

टी०- ज्ञानस्वरूप, सच्चिदानंद, प्रकृतीहून पर, परमात्मा असा जो प्राणिमात्रांच्या ठिकाणीं अंतर्यामी तोच हा यादवकुलभूषण श्रीकृष्ण जाणावा.

ननु सगुणो दृश्यतनुस्तथैकदेशाधिवासश्च॥ स
कथं भवेत् परात्मा प्राकृतवद्रागरोषयुतः॥ १९७॥

टी०- परंतु सगुण, दृश्यतनु, तसाच एक देशांत असणारा व प्राकृत मानवां सारखा विषयप्रीति व रोष यानीं युक्त असून तो परमात्मा कसा होईल.

इतरे दृश्यं पदार्था लक्ष्यंते येन चक्षुषा सततं॥ भ
गवांस्तु तया दृष्ट्या न लक्ष्यते ज्ञानदृगवगम्यः॥ १९८

टी०- ज्या नेत्रानें इतर दृश्यपदार्थ निरंतर दिसतात त्या दृष्टीनें भगवान् दिसत नाहीं; कारण तो केवळ ज्ञानदृष्टीनेंच दृष्टिगोचर होणारा आहे.

यद्विश्वरूपदर्शनसमये पार्थाय दत्तवान् भगवा-
न्॥ दिव्यं चक्षुस्तस्माददृश्यता युज्यते नृहरेः॥ १९९

टी०- याचा अनुभव असा कीं, भगवानानें आपल्या विश्वरूपाच्या अवलोकन समयीं ज्या पेक्षां अर्जुनास दिव्यदृष्टि दिली यावरून पुरुषश्रेष्ठ श्रीकृष्णाच्या स्वरूपीं अदृश्यता युक्तच आहे.

साक्षाद्यथैकदेशे वर्तुलमुपलभ्यते रवेर्बिंबं॥ वि
श्वं प्रकाशयति तत् सर्वैः सर्वत्र दृश्यते युगपत्
॥ २००॥

टी०- आणि वर्तुलाकृति साक्षात् सूर्याचें बिंब जसें एकदेशांत असतें व तें सकल जगास प्रकाशित करीत असून एककालीं सर्वत्र सर्वांस दिसतें.

यद्यपि साकारोयं तथैकदेशीव भाति यदुनाथः

॥सर्वगतः सर्वात्मा तथापि सोयं चिदानंदः॥२०१

टी०- याच प्रमाणें हा यदुनाथ श्रीकृष्ण यद्यपि साकार, तसाच एकदेशी असल्या सारखा भासतो तथापि तो सर्व व्यापक, सर्वांचा आत्मा असा हा कृष्ण सच्चिदानंद स्वरूपच जाणावा.

एको भगवान् रेमे युगपत् गोपीष्वनेकासु॥अथवा जगाम गेहे जनकश्रुतदेवयोर्युगपत्॥२०२॥

टी०- यास प्रमाण असें कीं, कृष्ण भगवान् एक असून एककालीं अनेक गोपींशीं रमला अथवा जनक व श्रुतदेव या उभयतांच्या गृहीं एककालीं गेला.

अथवा कृष्णाकारां स्वचमूं दुर्योधनोऽपश्यत्॥ तस्माद्व्यापक आत्मा भगवान् हरिरीश्वरः कृष्णः॥ २०३॥

टी०- अथवा दुर्योधनानें आपली सेना कृष्णाकार पाहिली यावरून कृष्ण, संसारबंध हरण करणारा भगवान् ईश्वर व व्यापक आत्मा असा आहे.

वक्षसि पद्भ्यां जघान श्रीवत्सः श्रीपतेः स किं द्वेष्यः॥ भक्तानामक्रूराणामन्येषां वा फलं सदृशम्॥ २०४॥

टी०- लक्ष्मीपतीच्या हृदयावर पायानें ताडन केलें म्हणून तें श्रीवत्सचिन्ह त्यास द्वेषास्पद झालें काय? नाहीं. तस्मात् भक्त, अक्रूर किंवा अन्य या सर्वांस त्या पासून फल सारखेंच प्राप्त होतें.

तस्मान्न कोपि शत्रुर्नो मित्रं नाप्युदासीनः॥नृहरिः सन्मार्गस्थः सफलः शाखीव यदुनाथः॥२०५

टी०- यावरून त्या भगवानास कोणीही शत्रु नाहीं, मित्र नाहीं व उपेक्षा योग्यही नाहीं. तस्मात् पुरुषश्रेष्ठ श्रीकृष्ण सन्मार्गगामी ल, फलें व शाखा यानीं युक्त अशा वृक्षासारखा आहे.

लोहशलाकानिवहैः स्पर्शाश्मनि भिद्यमानेऽपि॥स्वर्णत्वमेति लोहं द्वेषादपि विद्विषां तथा

प्राप्तिः ॥२०६॥

टी०:- लोखंडी सळयांच्या समुदायानीं परिसाच्या दगडास जरी फोडिलें तरी तें लोखंड सुवर्णत्वाला जसें प्राप्त होतें तशी द्वेष कर णारांस द्वेषानेंही कृष्णप्राप्ति होते.

नन्वात्मनः सकाशादुत्पन्ना जीवसंततिश्चेयं ॥ ज गतः प्रियतम आत्मा तत् प्रकृते चैं संभवति ॥२०७

टी०:- ही जीवसंतति आत्म्यापासूनच उत्पन्न झाली आणि जगा स आत्मा अत्यंत प्रिय आहे असें जें आहे तें प्रस्तुत कृष्णा विष यीं संभवतें.

वत्साहरणावसरे पृथग्वयोरूपवासनाभूषान् ॥ हरिरजमोहं हर्तुं स्ववत्सगोपान् विनिर्ममे स्व स्मात् ॥२०८॥

टी०:- तें असें कीं, गोकुलांतील वत्सहरण समयीं ब्रह्मदेवाचा मोह दूर करण्यासाठीं निरनिराळें वय, रूप, वासना व भूषणें यानीं युक्त अ से स्वकीय वत्स व गोपबालक यांस कृष्णानें आपल्या स्वरूपापासू- न निर्माण केलें.

अग्नेर्यथा स्फुलिंगाः क्षुद्रास्तु व्युच्चरंतीति ॥ श्रु त्यर्थं दर्शयितुं स्वतनोरतनोत् स जीवसंदोहं ॥२०९

टी०:- जशा लहान ठिणग्या अग्नीपासून उत्पन्न होतात तसे जीव ब्रह्मापासून उत्पन्न होतात असा श्रुत्यर्थ दर्शविण्यासाठीं श्री कृष्णानें स्वतनूपासून जीवसमूहास उत्पन्न केलें.

यमुनातीरनिकुंजे कदाचिदपि वत्सकानि चार यति ॥ कृष्णे तथार्यगोपे संत्सु च गाश्चारयत्सु दूरात् ॥२१०॥

टी०:- यमुनातीरावरील लतावेष्टित गृहांत एके समयीं श्रीकृष्ण, त साच बलराम वासरांस चारीत असतां आणि अन्य गोपाल गायींस दूर चारीत असतां

वत्सान्निरीक्ष्य दूरात् गावः स्नेहेन संभ्रांताः ॥ त

दभिमुखं धावंत्यः प्रयेयुर्गोपैश्च दुर्वार्याः ॥२११॥

टी०- त्या वांसरांस दुरून पाहून गायी प्रेमानें अत्यंत व्याप्त झाल्या आणि त्या गोपालांस अनिवार्य होत्सात्या वासरांसन्मुख धांवत आल्या.

प्रस्नवभरेण भूयः स्नुतस्तन्यः प्राप्य पूर्ववत्सानि
पृथुरसनया लिहंत्यस्तर्णकवत्योऽप्यपाययन्
प्रमुदा ॥ २१२ ॥

टी०- आणि त्या गायी लहान वत्सानीं युक्त असूनही दुग्धस्त्रावाच्या अतिशयामुळें स्तनाच्या ठिकाणीं पान्ह्यानें युक्त होत्सात्या पूर्वीच्या वांसरांकडे येऊन मोठ्या जिव्हेनें त्यांस चाटीत अतिप्रमानें पुनः पाजूं लागल्या.

गोपा अपि निजबालान् जगृहुर्मूर्धानमाघ्राय ॥
इत्थमलौकिकलोभस्तेषां तत्र क्षणं ववृधे ॥२१३॥

टी०- तसेंच गोपालानींही मस्तकीं अवघ्राण करून त्या आपल्या बालकांस घेतलें असा त्या गोपालांचा अद्भुत प्रेमा त्या कृष्णरूप बालकांच्या ठिकाणीं प्रतिक्षणीं वृद्धिंगत होऊं लागला.

गोपा वत्सानि यथा पूर्वं कृष्णात्मकान्यभवन् ॥
तेनात्मनः प्रियत्वं दर्शितमेतेषु कृष्णेन ॥२१४॥

टी०- गोपबालक व वासरें हीं पूर्वी ब्रह्मदेवानें जीं हरण केलीं होतीं तशीं तीं कृष्णरूप झालीं तेणेंकरून कृष्णानें आत्मस्वरूपाचें प्रियत्व त्या गोपबालक वत्सांच्या ठिकाणीं दर्शविलें.

प्रेयः पुत्राद्वित्तात् प्रेयोऽन्यस्माच्च सर्वस्मात् ॥
अंतरतरोऽयमात्मेत्युपनिषदा सत्यताऽभिहिता
॥२१५॥

टी०- पुत्रापेक्षां प्रिय, द्रव्यापेक्षां प्रिय व सर्व अन्यवस्तूंपेक्षांही हा आत्मा अतिशयें प्रिय अशी उपनिषदानीं जी सत्यता वर्णिली ती यथार्थ आहे.

उच्चावचभूतेष्वात्मा सम एव वर्ततेऽथ हरिः ॥
दुर्योधनेऽर्जुने वा तरतमभावं कथं गतवान् ॥२१६

टी०- उत्तम व अधम अशा सर्वभूतीं जो आत्मस्वरूप हरि आहे तो सर्वत्र समच आहे असें असून तो दुर्योधन व अर्जुन यांत तारतम्यभाव कसा पावला.

बधिरांधपंगुमूका दीर्घाः खर्वाः कुरूपाश्च ॥ सर्वैर्विधिना दृष्टाः सगोपवत्साश्चतुर्भुजास्तेन २१७

टी०- बहिरे, अंध, पंगु, मुके, लांब, ठेंगणे व कुरूप असे जे गोपाळ व वासरें हे सर्वही त्या ब्रह्मदेवानें चतुर्भुज पाहिले.

प्लुतसमल्लं नृहरेः समोहि मशकेन नागेन ॥ लोकैः समस्त्रिभिर्वत्युपनिषदा भाषितः साक्षात् ॥ २१८ ॥

टी०- पुरुषश्रेष्ठ श्रीकृष्णास सर्वभूतीं समत्व आहे यावरून तो परमात्मा मशक, नाग ( हत्ती किंवा सर्प ) तीन लोक यांशीं सम आहे असें साक्षात् उपनिषदांनीं सांगितलें आहे.

आत्मा तावदभोक्ता तथैव ननु वासुदेवश्चेत् ॥ नानाकैतवयत्नैः परयुवतीभिः कथं रेमे ॥ २१९ ॥

टी०- तसाच आत्मा जर भोक्ता नाहीं आणि तो जर निश्चयें करून वासुदेव आहे तर तो अनेक कपट यत्नानीं परस्त्रियांशीं कसा रमला.

सुंदरमभिनवरूपं कृष्णं दृष्ट्वा विमोहिता गोप्यः ॥ तमभिलषंत्यो मनसा कामाद्विरहव्यथां प्रापुः ॥ २२० ॥

टी०- सुंदर आणि अतिनूतनरूप अशा कृष्णास पाहून गोपी अत्यंत मोहित होत्सात्या त्यास मनानें इच्छित असून कामामुळें त्याविषयीं विरहजन्य दुःखास पावल्या.

गच्छंत्यस्तिष्ठंत्यो गृहकृत्यपराश्च भुंजानाः ॥ कृष्णं विनान्यविषयं समक्षमपि जातु नाविंदन् ॥ २२१

टी०- आणि गोपी चालतांना, उभ्या राहतांना, गृहकृत्यांत असतांना, भोजन करीत असतांना त्यांनीं कृष्णावांचून अन्यविषयास

समक्ष असूनही कदापि जाणलें नाहीं.

दुःसहविरहभ्रांत्या स्वपतीन् द्रुमपुरुषान्नराँश्च पशून्॥ हरिरयमिति सप्रीताः सरभसमालिंगयांचक्रुः॥२२२॥

टी०- अशा असह्य विरहाच्या भ्रांतीमुळें गोपींनीं आपले पति, वृक्ष, मनुष्य व पशु यांस पाहिलें आणि त्यांनीं त्यांस हा श्रीकृष्ण असें मानून अतिप्रीतियुक्ततेमुळे बहु उत्सुक होऊन आलिंगन केलें.

कोपि च कृष्णायंती कस्याश्चित्पूतनायत्याः॥ अपिबत् स्तनमिति साक्षाद्व्यासो नारायणः प्राह॥२२३

टी०- तसेंच कृष्णासारखी लीला करणाऱ्या कोणे एके गोपीनें, पूतने सारखें चरित्र प्रदर्शित करणाऱ्या कोणे एके अन्य गोपीचें स्तन पान केलें असें साक्षात् व्यासरूपि नारायणानें कथन केलें आहे.

तस्मिन्निजनिजदयितान् कृष्णाकारान् व्रजस्त्रियो वीक्ष्य॥ आपुरमृतमिति तासामंतर्यामी हरिः साक्षात्॥२२४॥

टी०- व्रजस्त्रिया आपापल्या पतींस कृष्णाकार पाहून त्या कृष्णाच्या ठिकाणीं मोक्ष पावल्या यावरून श्रीकृष्ण त्यांचा साक्षात् अंतर्यामी आहे.

परमार्थतो विचारे गुडतन्मधुरत्वदृष्टांतात्॥ नश्वरमपि नरदेहं परमात्माकारतां समायाति॥२२५॥

टी०- परमार्थ दृष्टीनें विचार केला असतां गूळ व त्याच्या मधुरत्व दृष्टांतानें नाशिवंत नरदेह आत्मध्यानानें तदाकारतेला प्राप्त होतो.

किं पुनरनंतशक्तेर्लीलावपुरीश्वरस्येह॥ कर्माण्यलौकिकानि स्वमायया विदधतो नृहरेः॥२२६॥

टी०- स्वकीय मायेनें अलौकिक कर्मे करणाऱ्या अनंतशक्ति पुरुषश्रेष्ठ ईश्वररूप श्रीकृष्णानें या लोकीं धारण केलेली लीलातनु अप्राकृत हें पुनः काय सांगावें.

मृद्भक्षणेन कुपितां विकाश्य वदनं स्वमातरं

तस्मिन्॥ विश्वमदर्शयदखिलं किं पुनरथं विश्वरूपोऽसौ॥२२७॥

टी०- मृत्तिका भक्षणामुळें क्रुद्ध झालेल्या आपल्या मातेला मुख दाखविण्यासाठीं कृष्णानें आपलें मुख तिजपुढें विकसित करून त्यांत यशोदेला सर्वजग दाखविलें तेव्हां तो हा विश्वरूपी कृष्ण अप्राकृतस्वरूप आहे हें पुनः काय सांगावें?

इति सगुणनिर्गुणयोरैक्यप्रकरणम्

अथानुग्रहप्रकरणं

विषविषमस्तनयुगलं पाययितुं पूतना गृहं प्राप्ता॥ तस्याः पृथुभाग्यायाऽऽसीत् कृष्णार्पणो देहः॥२२८॥

टी०-पूतना विषानें तीक्ष्ण असें आपलें स्तनद्वय कृष्णास पाजण्यासाठीं नंदगृहास आली परंतु तिच्या कांहीं मोठ्या महाभाग्यामुळें तिचा देह कृष्णास अर्पित झाला.

अनयत्पृथुतरशकटं निर्जनिकटं तं कृतापराधमपि॥ कंठाश्लेषविशेषादवधीद्वात्याऽसुरं कृष्णः॥२२९॥

टी०- त्याच प्रमाणें कृष्णानें अतिशयित मोठ्या शकटासुरास यमसदनीं पाठविलें आणि वावटळीच्या रूपानें आपणाजवळ येऊन अपराध करणाऱ्या तृणावर्तासुराच्या गळ्यास मिठी घालून दाबून त्याचा वध केला.

यमलार्जुनौ तरुवरावुन्मूल्योलूखलेन चिरखिन्नौ॥ रिंगन्नंगणभूमौ स्वालयमप्रापयन्नृहरिः॥२३०

टी०- पुरुषश्रेष्ठ कृष्ण अंगणसंबंधि भूमीवर रांगत जाऊन बहुकाल दुःख पावलेले जुळे अर्जुननांवाचे मोठे वृक्ष, कंबरेला बांधलेल्या उखळानें पाडून त्यांस स्वलोकीं पाठविलें.

नित्यं त्रिदशद्वेषी येन च मृत्युवशीकृतः केशी॥ कांकः कोऽपि वराको बकोऽप्यशोके गतो लोके २३१

टी०—निरंतर देवांचा द्वेष करणारा असून ज्यानें मृत्यूही स्वाधी-
न केला असा केशी दैत्य तसाच कोणीएक अधम काक व बकासु
रही शोकरहित अशा मोक्षसुखयुक्त लोकास गेले.

गोवत्सगोपनिकरान्नुदरे पीडयंतमपि वेगात्
॥ अनघमघासुरमकरोत् पृथुतरमुरगेश्वरं भ
गवान् ॥ २३२ ॥

टी०—गायी, गोपी व गोपाल यांच्या समुदायास पोटांत विषवेगा
नें पीडा देणारा व अतिमोठा आहे देह ज्याचा अशा महासर्परूप
अघासुरासही कृष्णानें निष्पाप केलें.

पीत्वाऽरण्यहुताशं हताशमकरोत्तदोजसा निर्ह
तान् ॥ दग्धान् मुग्धानखिलान् जुगोप गोपान्
कृपासिंधुः ॥ २३३ ॥

टी०—कृपासागर कृष्णानें अरण्य संबंधि अग्नीला प्राशून त्याचीआ
शा कुंठित केली आणि त्याच्या तेजानें ताडित होऊन दग्ध प्राय हो
णाऱ्या सर्व अज्ञ गोपांस रक्षिलें.

पोतुं गोकुलमाकुलमनिलतडिद्वर्षणैः कृष्णः ॥
असहाय एकहस्ताद्गोवर्धनमुद्धारोच्चैः ॥ २३४ ॥

टी०—वायु, विजा व पर्जन्य यांनीं व्याकुल झालेल्या गोकुलाच्या
रक्षणार्थ एकाकि कृष्णानें महागोवर्धन पर्वतास एकहस्तानें उत्त-
मप्रकारें धारण केलें.

हत्वा मुमोच भवंता मृधे नु कं धेनुकं दनुजं ॥ अ
करोत् कालियमबलं व्यालेशं गलगलद्गरलं ॥ २३५

टी०—तसेंच आपण युद्धांत कोणीएका धेनुक नामक दानवास मा
रून मुक्त केलें आणि कालिय नामक सर्पराजास कंठांतून विष ओ
कवून बलहीन केलें.

यांवे पुरस्य भार्या पन्नगलक्ष्या नु तत्र किं चित्रं ॥
तदगण्यपुण्यनिचयैः पृच्छ ब्रह्मा गोमद्रुहं ॥ २३६

टी०—तथाज्या गोकुलांतील गोपस्त्रिया कृष्णाच्या शोधासाठीं का

लियाच्या डोहाजवळ येऊन त्या नागाच्या दृष्टीस पडल्या यांत आश्चर्य काय ? परंतु कालियाच्या अगणित पुण्यसमुदायामुळें कृष्णापरब्रह्म त्याच्या घरीं विचारीत गेलें हें आश्चर्य आहे.

वासोलोभाकलितं धावद्रजकं करांगुलेर्हत्वा ॥ विस्मृत्य तदपराधं विकुंठवासोऽर्पितस्तस्मै ॥ २३७

टी०- वस्त्रांच्या लोभानें युक्त असून पळणाऱ्या रजकास करांगुलाघातानें वधून त्याचा अपराध विसरून त्यास वैकुंठांतील वास दिला.

त्रेधा वक्रशरीरामतिलंबोष्ठीं स्खलद्वपुर्वचनां ॥ स्त्रक्चंदनपरितोषात् कुब्जामृज्वंगनामकरोत् ॥ २३८ ॥

टी०- तीन ठिकाणीं वक्र शरीर, अत्यंत लांब ओष्ठानीं युक्त आणि स्खलन पावणारें शरीर व भाषण यानीं युक्त अशा कुब्जेला माळा व चंदन यांच्या संतोषामुळें सरलांगयुक्त केली.

समरपराङ्मुखमाराद्दिषुमेवाग्रे समीरयति ॥ नित्यं प्रतिकूलत्वात् कोदंडं दंडयामास ॥ २३९ ॥

टी०- बाण युद्धाविषयीं पराङ्मुख असून त्यासच पुढें दूर पाडवितो; आणि कंसाच्या धनुर्यागसंबंधि धनुष्य आपणास सर्वदा प्रतिकूल असल्यामुळें त्यास कृष्णानें भग्न केलें.

निहतः पपात हरिणा हरिच्चरणाग्रे कुवलयापीडः ॥ तुंगोन्मत्तमतंगः पतंगइव दीपकस्याग्रे ॥ २४०

टी०- कृष्णानें मारलेला महान् कुवलयापीड नामक उन्मत्त गज कृष्णाचरणाच्या अग्रभागीं पडला. यास दृष्टांत पतंग जसा दीपाच्या पुढें पडतो तद्वत्.

युद्धमिषात् सहरंगो श्रीरंगेनांगसंगमं प्राप्य ॥ मुष्टिकचाणूराख्यौ ययतुर्निःश्रेयसं सपदि ॥ ॥ २४१ ॥

टी०- मुष्टिक व चाणूर या नांवांचे मल्ल युद्ध मिषानें रंगसभेंत श्रीकृष्णासह अंग संग पावून तत्काल मोक्षास प्राप्त झाले.

देहकृतादपराधाद्वैकुंठोत्कंठितांतरात्मानं ॥ यदुवरकुलावतंसः कंसं विध्वंसयामास ॥ २४२ ॥

टी०- यदूंच्या श्रेष्ठकुलास भूषित करणाऱ्या कृष्णानें वैकुंठप्राप्तीविषयीं अंतःकरणांत उत्कंठित झालेल्या कंसास देहकृत अपराधामुळें मारिलें.

हरिसंदर्शनयोगात् धारातीर्थे निमज्जतो भगवान् ॥ प्रादादनवद्योयः सद्यश्चैद्याय सायुज्यं ॥ २४३

टी०- युद्धांत निमग्न झालेल्या वीरांस हरीच्या उत्तम दर्शनाच्या योगामुळें ज्या निर्दोष कृष्णानें सायुज्य मुक्ति दिली. आणि शिशुपालास तर तत्काल सायुज्यमुक्ति दिली.

उपेंद्रवज्रामिश्रवृत्तं ॥ हिरण्यकेशो रजसो विकार इत्यालपद्भिर्निगमैर्निरुक्तं ॥ दुश्चक्रवाताद्यसुराभिघाताच्छ्रीकृष्णमाहात्म्यमतीव गुह्यं ॥ २४४

टी०- हिरण्यकेश हें ईश्वराचें रूप रजोगुणाचें विकारभूत आहे असें प्रतिपादन करणाऱ्या वेदांनीं निर्णय केला आहे कीं, वायधुळीच्या रूपानें आलेल्या तृणावर्तादि असुरांच्या वधावरून श्रीकृष्णाचें माहात्म्य अत्यंत गुह्य आहे.

मूर्तित्रयं यस्य हरेर्विभूतिस्तत्र प्रमाणं भगवद्वचांसि ॥ स विश्वभृत् विश्वमयः परात्मा कृष्णः परं ब्रह्म किमत्र चित्रं ॥ २४५ ॥

टी०- ब्रह्मादि अथवा विश्व, तैजस, प्राज्ञ हें मूर्तित्रय ज्या हरीचें विभूतिरूप आहे त्या विषयीं भगवंताचीं वचनें प्रमाण आहेत यावरून तो विश्वरूपी विश्वंभर, विश्वमय तैजस व प्राज्ञ परात्मा असा कृष्ण परब्रह्म आहे यांत आश्चर्य काय आहे ?

मीनादिभिरवतारैर्निहताः सुरविद्विषो बहवः ॥ ते ययुरासुरयोनिं तत्र च मोक्षस्य का वार्ता ॥ २४६

टी०- मत्स्यादिक अवतारानीं बहुत देवशत्रु मारले; ते, असुरयोनीला गेले त्याविषयीं मोक्षाची वार्ता कोठून असेल.

ये यदुनंदनेन निहतास्ते पुनरभवं ध्रुवं प्रापुः ॥ तस्मादवताराणामंतर्यामी प्रवर्तकः कृष्णः ॥ २४७

टी०- जे श्रीकृष्णानें मारिले ते निश्चयें करून मोक्षास पावले यावरून मत्स्यादि अवतारांचा अंतर्यामी प्रेरक श्रीकृष्ण आहे हें सिद्ध झालें.

शार्दूलविक्रीडितं ॥ ब्रह्मांडानि बहूनि पंकजभवान् प्रत्यंडमत्यद्भुतान् गोपान् वत्सयुतानदर्शयदजं विष्णूनशेषांश्च यः ॥ शंभुर्यच्चरणोदकं स्वशिरसा धत्ते स मूर्तित्रयादुत्कृष्टः पृथगस्ति कोप्यविकृतः सच्चिन्मयो नीलिमा ॥ २४८ ॥

टी०- ज्यानें बहुत ब्रह्मांडें, प्रत्येक ब्रह्मांडास ब्रह्मदेव असे अनेक ब्रह्मदेव आणि सर्व वासरांसहित अद्भुत चतुर्भुज गोपबालक असें जें ब्रह्मदेवास दाखविलें व शंकर स्वमस्तकानें ज्याचें चरणोदक धारण करतो तो कोणीएक विकाररहित श्यामसुंदर सच्चिदानंदरूपी श्रीकृष्ण मूर्तित्रयापेक्षां उत्कृष्ट असून सर्वांहून भिन्न आहे.

शिखरिणी ॥ कृपापात्रं यस्य त्रिपुररिपुरंभोजवसतिः सुतो जन्होः कन्या चरणयुगनिर्णेजनजलं ॥ अयादानं यस्य त्रिभुवनपतित्वं वपुरपि प्रदानं सोस्माकं जयति कुलदेवो यदुपतिः ॥ २४९ ॥

टी०- ज्याचा कृपापात्र भूत शंकर, ब्रह्मदेव पुत्र, जान्हवी ज्याच्या चरणद्वयाचें प्रक्षालनोदक आणि बलीचें त्रिभुवनपालकत्व हरण केलें ही ज्याची ग्रहणशक्ति व आपलें स्वरूप देणें ही ज्याची दानशक्ति आहे असा आमचा कुलदैवतरूप यादवपालक श्रीकृष्ण सर्वोत्कर्षानें वर्तत आहे.

स्रग्धरा० ॥ मायाहस्तेऽर्पयित्वा यदि भरणकृते मोहमूलोद्भवं मां मातः कृष्णाभिधाने चिरसमयमुदासीनभावं गतासि ॥ कारुण्यैकाधिवासे सकृदपि वदनं नेक्षसे यन्मदीयं तत्सर्वज्ञेन कर्तुं

प्रभवति भवती किं नु मूलस्य शांतिं ॥ २५० ॥

टी०– हे कारुण्यैकनिधिभूते कृष्णानामक मातः, मी मोहमूला पासून उत्पन्न झालों असून माझें भरण करण्यासाठीं मला मायेच्या हातांत देऊन मजविषयीं जर बहुकाल उदासीन झालीस आणि तूं एकवारही माझें मुख पहात नाहींस यावरून असें भासतें कीं, तूं सर्वज्ञ असून माझ्या मोहमूलाची शांति करण्यास समर्थ नाहींस काय ?

शिखरिणी ॥ उदासीनः स्तब्धः सततमगुणः संगरहितो भवांस्तातः कांतः परमिह भवेज्जीवनगतिः ॥ अकस्मादस्माकं न यदि कुरुते स्नेहमथ तद्वहस्व स्वीयांतर्विमलजठरे स्मान् पुनरपि ॥ २५१ ॥

टी०– हे कृष्णा तूं उदासीन, स्तब्ध, निरंतर निर्गुण, असंग, सुंदर, पिता असून यालोकीं उत्कृष्ट गतिरूप आहेस असें असून तूं अकस्मात् आह्मांवर जर प्रीति न करशील तर पुनः आह्मांस आपल्या निर्मल उदरांत वहा.

लोकाधीशे त्वयीशे किमिति भवभवा वेदना स्वाश्रितानां संकोचः पंकजानां किमिह समुदिते मंडले चंडरश्मेः ॥ भोगः पूर्वार्जितानां भवति भुवि नृणां कर्मणां चेदवश्यं तन्मे दुष्टैरदृष्टैर्ननु दनुजरिपोरूर्जितं निर्जितं ते ॥ २५२ ॥

टी०– हे कृष्णा, तूं सर्व लोकांचा अधीश असल्यामुळें माझा स्वामी असून तुझ्या स्वकीय आश्रितांस दुःख होतें हें काय ? कारण या लोकीं तीक्ष्णकिरणयुक्त सूर्यमंडल उदयास आलें असतां सूर्यविकासि कमलें प्रफुल्लित होत नाहींत काय ? असें असून पृथ्वीवरील, मनुष्यांस प्रारब्ध कर्मांचें फल जर अवश्य भोगलें पाहिजे तर हे दानवशत्रो तुझें बलिष्ठ ऐश्वर्य माझ्या दुष्ट अदृष्ट कर्मांनीं जिंकलेंच कीं काय ? असें भासतें.

नित्यानंदस्सुधानिधेरधिगतः सन्नीलमेघः सता

मोत्कंठ्य प्रबलप्रभंजनभरेराकर्षितो वर्षति ॥ विज्ञानामृतमद्भुतं निजवचोधाराभिरारादिदं चेतश्चातकवन्न वांछसि तृषाक्रांतोपि सन्मोसि किं ॥ २५३ ॥

टी०- नित्यानंदरूप अमृतसमुद्रा पासून आलेला उत्तम नीलमेघसा धूंच्या उत्कंठतेमुळें अत्यंत प्रबल वायूच्या वेगानीं आकर्षित होऊन समीप स्वकीय वागमृत धारानीं अद्भुत विज्ञानामृताची दृष्टि करीत असतां हे चित्ता तूं चातकासमान तृषाक्रांत असून त्या अमृतप्राशनाची वांछा कां करीत नाहींस यावरून तूं निजलें आहेस काय ?

चेतश्चंचलतां विहाय पुरतः संधाय कोटिद्वयं तत्रैकत्र निधेहि सर्वविषयानन्यत्र च श्रीपतिं ॥ विश्रांतिर्हितमप्यहो क्व नु तयोर्मध्ये तदालोच्यतां युक्त्या चानुभवेन यत्र परमानंदश्च तत्सेव्यतां ॥ २५४ ॥

टी०- हे चित्ता, चंचलत्वाचा त्याग करून आपल्या पुढें दोन कोट्या-स्थापन करून त्यांत एकत्र सर्व विषय ठेवावे व अन्यत्र श्रीपति स्थापावा आणि त्यांमध्यें विश्रांति व हित हीं दोन्ही कोठें आहेत तें युक्ति व अनुभव यानीं विचार करून पहावें आणि जेथें परमानंदप्राप्ति होईल त्याचें सेवन उत्तम प्रकारें करावें.

पुत्रान् पौत्रमथ स्त्रियोन्ययुवतीर्वित्तान्यथान्यद्धनं भोज्यादिष्वपि तारतम्यवशतो नोत्तमुत्कंठता ॥ नैतादृग्यदुनायके समुदिते चेतस्यनंते विभौ सांद्रानंदसुधार्णवे विहरति स्वैरं यतो निर्भयं ॥ २५५ ॥

टी०- पुत्र, पौत्र, स्त्रिया, इतर तरुणस्त्रिया, स्वधनें, परकीय धन व भोज्यादिक पदार्थ यांविषयींही तारतम्यानुसार वर्तावें त्यां विषयीं अत्यंत उत्कंठा नसावी आणि श्रीकृष्णाविषयीं असें न वर्ततां अधिकाधिक प्रेम करावें. कारण सर्व व्यापक अनंत अंतःकरणांत उत्तम प्रकारें प्रगट झाला असतां पूर्णानंदामृतसागरांत जीव यथेच्छ

निर्भय अतिशयें क्रीडा करतो.

काम्योपासनयाऽर्थयंत्यनुदिनं किंचित्फलं स्वेप्सितं केचित् स्वर्गमथापवर्गमपरे योगादियज्ञादिभिः॥ अस्माकं यदुनंदनांघ्रियुगलध्यानावधानार्थिनां किं लोकेन धनेन किं नृपतिना स्वर्गापवर्गैश्च किं ॥२५६॥

टी०- काम्य उपासनेनें कोणी आपलें इच्छित किंचित् फल निरंतर इच्छितात. तसेच इतर, स्वर्ग किंवा मोक्ष एतद्रूप किंचित् फल योगादिक व यज्ञादिक साधनानीं इच्छितात परंतु श्रीकृष्णा चरणद्वय संबंधि ध्यानाविषयीं सतत युक्तस्वरूप अर्थच इच्छिणाऱ्या आह्मास लोक व इंद्रियनिग्रह यानीं काय कर्तव्य, राज्य काय कर्तव्य आणि स्वर्ग व मोक्ष यानीं काय कर्तव्य आहे ?

आश्रितमात्रं पुरुषं स्वाभिमुखं कर्षति श्रीशः॥ लोहमपि चुंबकाश्म संमुखमात्रं जडं यद्वत्॥ ॥२५७॥

टी०- सर्व भक्त पुरुष भक्तीनें श्रीकृष्णाचे आश्रित झाले असतां - श्री कृष्ण त्यांस आपल्या सन्मुख आकर्षण करितो. यास दृष्टांत, लोखंड जड असूनही तें जसें लोहचुंबक पाषाणासंमुख आलें असतां चलन पावतें तद्वत्.

अयमुत्तमोऽयमधमो जात्या रूपेण संपदा वयसा॥ श्लाघ्योऽश्लाघ्यो वेत्थं न वेत्ति भगवाननुग्रहावसरे॥२५८॥

टी०- जाति, रूप, संपत्ति व वय या कारणानीं हा उत्तम आहे व हा - अधम आहे अशी स्तुति किंवा निंदा भगवान् अनुग्रह समयीं जाणत नाहीं.

अंतस्थभावभोक्ता ततोंऽतरात्मा यथा महामेघः॥ खदिरे चंपकइव वा प्रवर्षणे किं विचारयति २५९

टी०- श्रीकृष्ण अंतःकरणांतील भावाचा भोक्ता असल्यावरून स-

र्वाचा अंतरात्मा आहे जसा महान् मेघ रेंवर व चांफा यांवर दृष्टि करण्या विषयीं विचार करतो काय तद्वत् श्रीकृष्ण जाणावा.

यद्यपि सर्वत्र सम स्तथापि नृहरे रथानन्याः॥ भ-
क्ताःपरमानंदे रमंति सदयावलोकेन॥२६०॥

टी०–पुरुषश्रेष्ठ कृष्ण यद्यपि सर्वां विषयीं सम आहे तथापि त्याच्या द-यायुक्त अवलोकनानें हे त्याचे अनन्यभक्त परमानंदांत रमतात.

सुतरा मनन्यशरणाः क्षीराद्याहार मंतेरा यद्वत्॥ के
वलया स्नेह दृशा कूर्मी तनयाः प्रजीवंति॥ २६१॥

टी०–अत्यंत अनन्य शरण कांसवीचीं पिल्लें दुग्धादिक आहारा वांचून ति-च्या केवल प्रेमयुक्त दृष्टीनें जशीं वांचतात.

यद्यपि गगनं शून्यं तथापि जलदा मृतांश रूपेण॥
चातक चकोर नाम्नो र्दृढ भावात्पूरयत्याशाम्॥२६२

टी०–त्याच प्रमाणें आकाश जरी शून्य आहे तरी तें मेघ आणि चंद्र यांच्या योगानें चातक व चकोर या नांवाच्या पक्ष्यांची आशा त्यांच्याअ-नन्य भावा मुळें जसें पुरवितें.

तद्वत् भजतां पुंसां दृग्वाङ्मनसामगोचरोपिहरिः
कृपया फलत्य कस्मात् सत्यानंदामृतेन विपुलेन२६३

टी०–तद्वत् हरि, दृष्टि, वाणी, व मन यांस जरी अगोचर आहे तरी अन न्य भक्ति करणाऱ्या जीवांस कृपेमुळें विपुल सत्य, आनंद व अमृत यानीं अकस्मात् भक्तांस फलद्रूप होतो.

## इत्यनुग्रहप्रकरणम्

इतिश्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमच्छंकराचार्य विरचितः प्रबोधसुधा-करो नाम ग्रंथः समाप्तिमगमत्॥ श्रीमद्दाशरथीश्री सीता रामचंद्रायनमः॥

---

## श्रीमन्मयूरकविकृत मुक्तामालेंतील रामपर
## आर्या.

पुण्यश्लोकशिखामणि–चरणं शरणं सताम् तापकरं;
वंदे नतनरकपिसख, मखिलजितं मखभुजांमहः प्रथमं १

टी०—पुण्यकीर्तिमंतांच्या शिरवांवर मण्यासमान अलंकारभूत चरणांनीं शोभायमान असून साधूंस आश्रय व आल्हादकारक, नम्र जन व वानर यांचें मित्र, सर्वांस स्वाधीन वर्तविणारें आणि यज्ञभाग घेणाऱ्या देवांत प्रथम तेजोरूप अशा श्रीरामरूप तत्वास मी वंदन करितों.

वरदानव्रतवित्तं, वंदे करुणासुधैकघनचित्तम्॥ निस्पृहनिर्भयवित्तं, श्यामलमतिशयितदयितमनिर्भित्तं २

टी०—वरदानरूप व्रतानेंप्रसिद्ध असून करुणामृताचीच वृष्टि करणाऱ्या मेघरूप चित्तानें युक्त आणि निस्पृह जनांचें निर्भय द्रव्यरूप व निर्भिन्न अतिशयें प्रिय अशा श्यामसुंदर रामचंद्रास मी नमितों.

बहुभिः कृतं चतुर्भिः पंक्तिरथः पुत्रिणामभूत्प्रथमः बहुदानामपिपुत्रौ, धर्मार्थिमसौ ददौ यदोदारात्॥३॥

टी०—बहुत पुत्रांचा उपयोग नाहीं तर दशरथ चार पुत्रांनीं पुत्रवंतांत श्रेष्ठ झाला. आणि यानें आपले दोन पुत्र राम लक्ष्मण हे विश्वामित्रास यज्ञसंरक्षणासाठीं उदारपणानें धर्मार्थि दिले; यास्तव तो बहुदानशूरांतही श्रेष्ठ झाला.

गाधिज भवतोऽधीतं, शिष्यैः कतिभिर्न गालवप्रमुखैः॥ वरमेको दाशरथिः पिबतासुदधेरपांबुदोत्यधिकः ४

टी०—हे विश्वामित्रा तुझापाशीं गालवप्रभृति किती एक शिष्यांनीं अध्ययन केलें नाहीं काय? केलें. परंतु त्या शिष्यांत एक रामच श्रेष्ठ आहे. यास दृष्टांत समुद्राचें उदक प्राशन करणारांत मेघ जसा श्रेष्ठ तद्वत्.

मातरहल्ये स्पृष्टा येन पदातमपि पूजयसि बालं॥ नूनं स तव सतीर्थ्यः पदाहतो प्युरसि यो ननाम भृगुं ५

टी०—हे मातोश्री अहल्ये, तुला ज्यानें चरणें करून स्पर्श केला त्या बालकासही तूं पूजित्येस. यावरून त्यानें तुझ्याच गुरूपाशीं अध्ययन केलें असेल असें भासतें; कारण भृगुऋषीनें त्याच्या हृदयावर लत्ताप्रहार केला तरी त्यानें तुझ्या साररवेंच त्या मुनीला वंदन केलें.

अबलाकृष्टमपि सदसि धनुरेषां हा कथं नु भग्नमिति॥ भीतमिवानतकंधरमाश्लिष्य ददाविवाभयं भंग

वान् ॥ ६ ॥

टी० – शंकराचें धनुष्य सभेंत सीतेनें आणिलें असूनही कसें भंगलें. तस्मात् ही गोष्ट निश्चयें करून खेदास्पद झाली अशा भयभीत झाल्यासारख्या मान खाली केलेल्या जनकास परशुराम भगवानानें आलिंगन केल्या सारखें करून अभय दिलें.

सर्वंसहापि धनुष, स्तस्यच कंपे रवेण घोरेण ॥ बाला पिश्रृशं मुमुदे सीता मृदुनेव वेणुनादेन ॥ ७ ॥ ७

टी० – त्या काली सर्व सहन करणारी पृथ्वी ही त्या धनुष्याच्या भयंकर नादानें कंपायमान झाली; परंतु सीता, बालवयांत असूनही मंजुल वेणु नादा प्रमाणें त्या शब्दश्रवणानें अत्यंत आनंद पावली.

गुरुणा योगं कर्तुं, संजीविन्येव सीतया ः तुलया ॥ सर्वमतेनैव विनाश, श्चापेनांगी कृतः कचे नेव ॥ ८ ॥

टी० – संजीवनी विद्या बृहस्पतीस प्राप्त होण्या साठीं कचानें आपला नाश सर्वांच्या संमतें करून जसा अंगीकारिला तसा अप्रतिम सीतेचा योग रामाशीं करण्या साठीं शिवधनुष्यानें आपला भंगरूप नाश स्वीकारिला.

बहुभुजमरिमजयमिति, किमनेन दैवं तु हेतुरत्रैकं, ग्रसते सहस्रकरमपि काले राहुर्हि बाहुविकलोपि ९

टी० – सहस्रार्जुन हा शत्रु बहु बाहुयुक्त असूनमीं (परशुरामानें) जिंकला अशा समजण्यानें उपयोग काय ? कारण जय पराजय यां विषयीं एक दैवच कारण आहे. याचा अनुभव असा कीं, राहु बाहुरहित असूनही तो ग्रहण कालीं सहस्रकिरणयुक्त सूर्य चंद्रांसही आच्छादित करितो.

भगवन् वसिष्ठ कथमिद, मधुनैव मुहूर्त मीदृशं दत्तम् ॥ केवन प्रयाण महह क्व च युवराज्याभिषेक महकालः ॥ १० ॥

टीका:– हे योगेश्वर्य संपन्न वसिष्ठा, आपण याच कालीं हा असा कसा मुहूर्त दिला ? कारण युवराज्य संबंधी अभिषेकाचा उत्सव काल कोणी-

कडे आणि या समयीं दुःखकारक वनवासास प्रयाण करणें कोणीकडे.

पंकेरुहदृशमध्वनि तं, केवलमंगनानुजानुगतं ॥ शं-
के धाविता मीक्षितुमंके विस्मृत्य शिशुमपि स्त्रीभिः ११

टी०—मागून चालणारे सीता व लक्ष्मण यांसहित एकाकी कमलनयन रामास मार्गांत पाहण्या साठीं मांडीवरील बालकासही विसरून स्त्रिया धांवल्या. या आश्चर्यानें मी सनांत शंकित होतों.

नृत्यन्मयूर परिवृत-मेणकुलानुगत मलिभिरुपन्न-
ष्टम् ॥ तं घनदूर्वापुंज-श्यामलमब्जाननं भजेऽध्व-
न्यम् ॥ १२ ॥

टीका—रामचंद्र मेघा समान श्यामसुंदर असल्या मुळें मोर येऊन त्याच्या सभोंवतीं नृत्य करूं लागले; आणि तो दूर्वांच्या समुदाया सारखा श्यामवर्ण असल्या मुळें त्याच्या मागें हरिणांचे समूह येत असत. व त्याचें मुख कमलतुल्य होतें; यास्तव त्याच्या आसमंताद्भागीं भ्रमर येऊं लागले. अशा मार्गांतील रामास मी भजतों.

सौरावप्यमृतकरौ, यौ राजवरैः सदा शिरोधार्यौ ॥
गौरासितौ वरमणी, पौरा बत हारितौ प्रमादेन ॥ १३

टी०—राम लक्ष्मण सूर्या सारखे तेजस्वी असून अमृतकिरण चंद्रासमान आल्हादकारक आहेत. आणि श्रेष्ठ राजांनीं सर्वदा मस्तकांनीं धारण करण्यास योग्य असे शुभ्र मणितुल्य लक्ष्मण व नीलमणि सदृश राम असे हे श्रेष्ठ मणीच काय अहो नागरिक जनहो, प्रमादानें हरवल्या सारखे वनांत गेले हे मग दुःखकारक झालें.

मात्रा मा ऽस्त्वोऽस्त्विति, प्रहितो वनमालयान्निजं धर्मम् ॥
पित्रापित्रा तु यं, स्वधर्मज्ञोऽसौ मम जगुः कवयः ॥ १४ ॥

टी०—घरीं राहूं नको असें कैकयीनें व दशरथानेंही आज्ञा करून पाठविलेला राम स्वधर्मपालन करण्या साठीं गृहांतून वनांत गेला; यास्तव कविजन त्यास धर्मज्ञांत श्रेष्ठ ह्मणतात.

किमिति निषादविषादः, पश्य कुमारो यमर्ककुलपो-
लः ॥ वनमागतोपि, वल्कधपि जटिलोपि नृपान्तमश्रिया

श्लिष्टः॥१५॥

टी० – हे गुहा, हा सूर्यवंशपालक कुमार वनांत आला तरी, वल्कलें धारण केलीं असूनही, जटाधारी झाला तथापि सार्वभौम शोभेनें युक्त आहे हें पहा. तस्मात् तूं खेद कां करतोस.

कुशलीनेः स्तिकुमारो, मारोदीरंबते बहोः कालात्॥
तृषिताः पिबंतु वन्याः, संन्यासिन उत्सुकाः सुकार्श्यमिताः१६

टी० – हे मातः कौसल्ये, तुझा पुत्र सुखी आहे. तूं रोदन करूं नको. आणि वानप्रस्थ व संन्यासी हे तुझ्या पुत्राच्या दर्शनार्थ अति उत्सुक असल्यामुळें अत्यंत कृश होऊन बहु कालापासून तृषाक्रांत झाले आहेत, यास्तव ते रामाचें मुखामृत नेत्रांनीं प्राशन करोत.

वनेपि तुरुत्संगे, संगे मातुः पुरे पुरेव सुखं॥ इतिभव
दात्मजमनमत आत्मानं देवि काननेः मंस्थाः॥१७ ॥

टी० – मी वनांत असूनही अयोध्येंत मातेच्या समीप पित्याच्या मांडीवर पूर्ववत् सुखानें आहें असें तुझ्या पुत्राचें मत आहे; यास्तव हे कौसल्ये, मी अरण्यांत रामाजवळ आहें अशी तूं भावना कर.

नंदन वनं व्रजेति, त्वमवोचः सत्यमज कुलोत्तंस॥ सं-
तु वनं मगांस्तमीक्षितु, मविचार्य गतोसि नंदनं हंत१८

टी० – हे पुत्रा, वनांत जा असें हे अजकुल भूषणा दशरथा, तूं सत्य बोललास. त्याप्रमाणें राम वनांत गेला त्यास पाहण्यासाठीं तूं विचार न करितां नंदनवनांत गेलास हें परम खेदास्पद झालें.

अमृतमपि नाम पिबत स्तापो बहुली भवत्यंदः किं-
मिति॥ प्रष्टुं नु दशरथत्वं दस्रौ वस्त्रौ कुलेक्षणोयातः१९

टी० – अमृततुल्य रामनाम प्राशन करणारासही ताप बहुत होतो हें काय! असा प्रश्न करण्यासाठींच काय हे दशरथा, तूं अश्रुपूर्ण नयन होत्साता निश्चयें करून अश्विनीकुमारांकडे गेलास काय?

स्त्रैणं त्वामूचुरहो, रहोगता मंत्रिणो न मुनयोपि॥
सांकममरपतिना, कैनाकेपि भवनं मागतं वीक्ष्य२०

टी० – हे दशरथा, तूं स्त्रीजित आहेस असें एकांत स्थानचे मंत्रीच ह्मणाले

असें नाहीं तर कोण ह्मणतात अशी शंका आली असतां सांगतात कीं; स्वर्गांतही इंद्रसहित मुनि देखील तूं आलेला पाहून तुला कोण ह्मणाले, हें आश्चर्य आहे.

शोच्यासि त्वमयोध्ये, पत्युर्हृतमटव्या त्वदीयसौभाग्यं
पतिमिच्छंत्या भाव्यं, त्वयापि मातर्विपक्षवेषयुजा॥२१

टी०—हे अयोध्ये, तुझें रामरूप सौभाग्य दंडकारण्यानें हरण केलें ह्मणून तूं निंद्य झालीस; यास्तव हे मातः अयोध्ये, तूंही आपला पति प्राप्त होण्याच्या इच्छेनें अरण्य समान वेषानें युक्त व्हावेंस.

मा मातरमवमंस्था भरत स्वगुणप्रकाशहेतुभिमां
सेकादधिकमशोके कुशलं पादाहतेर्यदि वरं सा॥२२

टी०—हे भरता तुझी माता तुझ्या भक्ति वैराग्यादिक गुणांच्या प्रकाशास कारणभूत असल्या मुळें तूं हिचा अवमान करूं नको. यास दृष्टांत-अशोक वृक्षास पाणी घालण्या पेक्षां पादताडनच अधिक हितकारक जर आहे तर तेंच श्रेष्ठ होतें.

विषयविरक्तिर्गुरुपदभक्तिरखिलसज्जनेषु महितत्वं॥ कुत्य सत्यं वद पदपद्मे मा जातु मातुरवमंस्थाः२३

टी०—हे भरता विषयां विषयीं वैराग्य, रामचरणीं भक्ति व सर्व सज्जनांविषयीं पूज्यबुद्धि हे तुझे गुण कैकयीनें असें केलें नसतें तर कोठून प्रसिद्ध झाले असते हें सत्य सांग! तस्मात् तूं मातेच्या चरण कमलांचीअमर्यादा कदापि करूं नको.

मातः कैकयि जगति, कृतिषु कृतोपकृतिषु त्वमेव वरं
यदखिललोकहितं कृतं, मुरारी कृत्यापि दुःसहं व्यसनं२४

टीका—हे मातः कैकयि, वैधव्यरूप असत्य दुःखही अंगीकारून सर्व लोकांचें हित केलेंस. तस्मात् जगांतील उपकार करणाऱ्या पुण्यशीलांत तूंच श्रेष्ठ आहेस.

कास्यान्यास्याब्जासव, मधुपी त्वत्तोनृपस्य बहुमान्या॥
दास्या हास्यास्पदतां, सरलेनीतासि देवि मंथरया२५

टी०—हे निष्कपट कैकयि, या दशरथाच्या मुखकमल संबंधि मकरंद मा-

शन करणारी अशी तुझ्यापेक्षां अन्य कोण स्त्री बहुमान्य आहे? तर कोणीही नाहीं, असें असून मंथरा दासीनें तुला हास्यास्पदत्वास प्राप्त केलें.

**उदितं नीतिमदमतं, मुदितं सिद्धिं समीक्ष्य भोक्तुमलं॥ उदितं फलमनयतरो, रुदितं बत मंथरे त्वया किंमिति॥२६॥**

टी० — हे मंथरे, नीतिमंत लोकांस अमान्य असें भाषण केलेंस आणि त्याप्रमाणें रामाचें दंडकारण्यगमन सिद्ध झालेलें पाहून हर्ष झाला. मग त्या अनीति वृक्षास आलेलें फळ अतिशयें भोगण्यास प्राप्त झालें असतां तूं किमर्थ रोदन करित्येस बरें?

**शोकदवज्वलनावृत-शुद्धांतवनैकसंश्रया मृग्यः॥ बाष्पस्नाता स्तिष्ठत, जीवनदः क नु स सांप्रतं मृग्यः२७**

टी० — शोकरूप दावाग्नीनें व्याप्त झालेल्या अंतःपुररूप वनांतच वास करणाऱ्या हरिणी समान कौसल्यादिक स्त्रियाहो, तुह्मी अश्रुपातानीं युक्त होत्साल्या रहा; कारण तुह्मांस जीवन देणारा तो राम सांप्रत काळीं निश्चयें करून कोठें शोधावा?

**दीपक इव निश्वासै, र्नहि शोकशिखी प्रयाति निर्वाणम्॥ बत वर्धनेऽश्रुसलिलै, रपि तूष्णीकैस्त्वयं सुखंजेयः॥२८॥**

टी० — स्त्रियाहो, शोकाग्नि दीपासारखा श्वासोच्छ्वासांनीं नाश पावत नाहीं, आणि अश्रुजलानेंही वृद्धिंगत होतो; तर हा उगाच बसण्यानें सुखें करून जिंकण्यास योग्य आहे हें आश्चर्य आहे.

**चिंते किं नो विषयै, र्ध्यातैः क्षणभंगुरै र्विषादफलैः दास्यति लब्ध्वा कामं, कामं को मंगला मुदं संपत्२९**

टी० — हे चिंते, तुला क्षणभंगुर विषयांचें चिंतन करून काय फल आहे! आणि अत्यंत मनोरथ पूर्ण करून संतोष देईल अशी मंगलकारक संपत्ति कोणती?

**मूर्तः सदयः सदयः सरसः सरसः सुधैकपरिपूर्णात् शमयन्नमतां ममतां शमलं शमलं ददाति कोपि जरी३०**

टी०-मूर्तिमान् सदय व साधु यांस मंगलदायक प्राप्तीचा निधि असून केवल अमृत पूर्ण सरोवरा पेक्षां सरस असा कोणी एक जटाधारी रामचंद्र नम्र झालेल्या भक्तांचें पाप व ममता पाश यांचा नाश करून त्यांस अत्यंत मोक्ष सुख देतो.

कापि तपस्विजनानां तपसां सिद्धिर्महेशगलमाला
नीलापीलांधरमुपहसति गुणैरिंदुमपि पयोधिमपि ३१

टी०-तपस्वी जनांच्या तपांची कोणी एक उत्कृष्ट सिद्धिरूप असून शंकराच्या कंठांतील मालारूप अशी राममूर्ति नीलवर्ण असून ही आपल्या औदार्य गुणानें राजास हसते. आल्हादक गुणानें चंद्राचा उपहास करिते. व गांभीर्यानें समुद्रास हसते.

अवने पटुस्त्रिजगतां, मवनेराद्यः प्रियोपि जामाता
भवने विधातुरीड्यः सवने सवने तृनायको जयति ३२

टी०-त्रैलोक्याचे रक्षणाविषयीं कुशल व पृथ्वीचा मुख्य प्रिय असून जामाता ब्रह्मदेवाच्या लोकांत स्तुत्य असा तो यज्ञदेवतांचा नायक रामचंद्र वनांत सर्वोत्कर्षानें वर्ततो.

रक्षोबलदलनविधौ दक्षो वक्षोजगिरिहरिर्लक्ष्म्याः॥ प-
क्षो जयति वलक्षो, स्माकमधि क्षोणि शक्रनीलनिभः ३३

टी०-राक्षस सैन्याच्या नाशा विषयीं दक्ष व लक्ष्मीच्या स्तन पर्वता वरील सिंहरूपी असून पृथ्वीवर इंद्रनीलमण्या सारखा श्यामसुंदर असा आमचा शुद्ध पक्षपाती राम सर्वोत्कर्षानें वर्ततो.

अव्ययमदस्युगोचर, मुर्वपि न मदप्रदं पदं प्रमुदाम्
वित्तमनीहमनो हरमस्माकं चित्तमात्मसात्कुरुते ३४

टी०-रामरूप धन व्ययरहित, चोरांस प्राप्त न होणारें, बहुत असून ही मदकारक नसणारें, अति आनंदाचें स्थान, निरिच्छ लोकांच्या मनास हरण करणारें असें रामरूप धन आमच्या चित्तास आपणाकडे आकर्षण करितें.

अंकरहितममृतकरं, शंकरहितमनिशमेधमानकलं
मित्रं स्वया श्रियाप्युप-कुर्वाणमहं भजे चकोरशिशुः ३५

अर्थः- कलंकरहित, अमृतकर, शंकराचा हितकारी, सर्वदा वृद्धिंगतकलानीं पूर्ण व स्वकीय संपत्तीनेंही मित्रावर ( पक्षीं सूर्यावर ) उपकार करणारा अशा रामचंद्रास चकोर बालकरूपी मी भजतों.

कति न जटिला घटा इव धन्वधराः कति न काननेशबराः
एकः कोप्यजकुलजः कपर्दिकामधन्वनोः श्रियं हरति॥३६॥

अर्थः- वटवृक्षासारखे जटाधारी किती एक नाहींत? तसेच अरण्यांत धनुर्धारी भिल्ल किती एक नाहींत! बहुत आहेत; परंतु अजकुलोत्पन्न कोणी एक राम हा जटाधनुर्धारी असून शंकर व मदन यांच्याही शोभेला हरण करीत आहे.

यामे रजनेश्वरमे या मेघनिभा फनिस्पृहैश्चिंत्या॥
सा मेंतरेरूपायैः सा मे मूर्तिर्न कैश्चिदपि लभ्या॥३७॥

अर्थः- रात्रीच्या अंत्यप्रहरीं जी मेघश्याम राममूर्ति अतिनिष्कामानीं चिंतन करण्यास योग्य आहे ती माझी संपत्ति सामावांचून अन्य उपायांनीं कोणासही प्राप्त होण्याजोगी नाहीं.

द्यावाभूमिभ्यामिव याभ्यां स्त्रीभ्यामपि प्रजाःसुचिरं
निर्भयमराजकेऽपि त्राता वां पादुके नमस्यामः॥३८॥

अर्थः- द्यो ( स्वर्ग ) व पृथिवी यां प्रमाणें ज्यांनीं स्त्रिया असूनही अराजकस्थितींतही! बहुकाल प्रजा निर्भयरीतीनें रक्षिल्या म्हणून हे पादुकानो त्या तुम्हांस आम्ही नमस्कार करितों.

भरत भगवता गुरुणा सुशिक्षितनयो युवाप्यधीरस्त्वम्॥ मन्ये धन्ये त्वत्तो जडेपि खलु पादुके समे व्यसने ३९

अर्थः- हे भरता तुला योगेश्वर्य संपन्न वसिष्ठानें उत्तम नीतिशास्त्राची शिक्षा केली असून व तूं तरुण असूनही अधीर आहेस आणि पादुका चैतन्यरहित असूनही व्यसनकालीं सम ( स्वस्थ ) असल्यामुळें तुझ्या पेक्षां धन्यच आहेत, असें मी मानितों.

भो याज्ञवल्क्यशिष्य त्वां नैवं यथा जहाति सन्निष्ठा
जामातरं तथा ते कन्याऽनन्या सती वने भवने॥४०॥

अर्थः- हे याज्ञवल्क्यशिष्य जनका, तुला उत्तम निष्ठा जशी सोडीतच नाहीं तशी तुझी कन्या सीता पतिव्रता असल्यामुळें ती तुझ्या जामात्यास

वनांत व मंदिरांत अनन्यभावानें सेवीत असून त्याग करीत नाहीं ॥ ७ ॥

लब्ध्वा विराध भवता सीता ऽ पात्रेण मृत्यवे न मुदे ॥
कपटपटुना क्षणं सुरपंक्ताविव राहुणा सुधाधारा ४१

अर्थ:- कपट करण्याविषयीं कुशल अशा राहूनें क्षणमात्र देवपंक्तींत बसून अमृताची धारा जशी मिळविली तशी हे विराध राक्षसा, तूं अयोग्य असल्यामुळें सीता तुजसमीप प्राप्त झाली ती तुला मृत्युकारक झाली. हर्षास कारण झाली नाहीं.

जंगमनिर्जरतरुणा तरुणारुणपादपल्लवेन सह ॥
दृष्टा कनकव्रततिर्व्रततीर्थतपःफलप्रदा वनिभिः ४२

अर्थ:- ज्याचे चरणरूपपल्लव बालारुणाप्रमाणें आरक्त आहेत अशा जंगम कल्पवृक्षा (रामा) बरोबर व्रतें तीर्थें आणि तपें हीं फलें प्रसवणारी सुवर्णवल्ली (सीता) वनांत राहणाऱ्या ऋषींनीं अवलोकन केली. ॥ ७ ॥

धन्वी जटी फलाशी तन्वीरत्नेन सादरं सततम् ॥ अन्वीयमान ईदृक् सन् वीतभयः सतामगादुटजम् ४३

अर्थ- धनुर्धारी जटाधर फलाहार करणारा असून सीतारूप स्त्रीरत्नानें आदरें करून निरंतर अनुसरला जाणारा असतांही निर्भय असा रामचंद्र साधूंच्या पर्णशालेंत गेला.

अम्भोमलदीप्ति महो बभ्राम चिराय दंडकाभूमौ ॥
दम्भारम्भश्चक्रे श्वभ्रामयमलिनशशधरज्योत्स्नां ४४

अर्थ:- सजलमेघासमान स्वच्छ श्यामकांतियुक्त तेज (रामचंद्र) बहुकाल दंडकारण्यांत संचार करीत होतें. त्यानें सच्छिद्र व क्षयरोगामुळें मलिन अशा चंद्राचे कांतीला तुच्छ केलें.

सेहसैव पंचवट्यां हरिणा हरिणानुयायिना स्वगुहा
सापि च मुक्ता मुक्ता नीता बत वंचकेन केनापि ॥ ४५ ॥

अर्थ:- पंचवटी क्षेत्रामध्यें हरिणाच्या मागें जाणाऱ्या हरीनें (सिंहानें पक्षीं रामानें) आपली गुहा आणि ती मुक्ता (गजकुंभस्थलांतील मोतीं पक्षीं स्त्रीरत्नभूत सीता) ही सोडिली. तेव्हां कोणी एक वंचकानें (धूर्तकोल्ह्यानें पक्षीं रावणानें) अकस्मात् नेली. हर हर !!

नीता शून्यताश्रौता नाशाया त्वमेव एवासि पुत्रिके मोहात् ॥
हास्यति तिनो निधनमृते नमृते स्वयमत्र किं तवोत्कर्षः ४६ ॥

अर्थ:- हे असिपुत्रिका ( सुरी ) रूप सीते, तुला श्वानासमान रावणानें अविवेकें करून आपल्याच शीघ्रनाशार्थ नेलें. आणि तो आपल्या मरणावांचून तुला सोडणार नाहीं, त्या पेक्षां तो स्वतः जर मेला नाहीं तर यांत तुझा उत्कर्ष काय!

तदिदमुपस्थितमचिराद्यदवोचो ऽनागसं किमप्येवं ॥ पात्रे दानं क्षेत्रे बीजं बहु भवति गुप्तमुप्तमपि ॥ ४७

अर्थ:- हे मातः सीते, तूं निरपराध लक्ष्मणास जें कांहीं बोललीस त्यामुळें हें अनिष्ट त्वरितच प्राप्त झालें. कारण पात्रीं केलेलें गुप्त दान व क्षेत्रांत ( शेतांत ) पेरलेलें बीज ही बहुत होतें.

तप्तो वाचा लतया विषमय्या भक्षयेव बालमृगः
शप्तो वाचालतया कथमनघोप्येष देवरो देवि ॥ ४८

अर्थ:- हे सीते, तूं वाचालपणानें या निरपराधी अशाही दीरास कसा शाप दिलास? तेणें करून तो भक्षण केलेल्या विषरूप लतेनें बालहरिणासारखा तुझ्या वाणीनें ताप पावला.

एकक्षणमपि धीरैरपि नूनमसह्यवेदना वाचः ॥ संयदपससार सहसा सौमित्रिः साश्रुराश्रमादाशु ॥ ४९

अर्थ:- कारण धीर पुरुषांनीं देखील एक क्षणमात्रही त्या वाणी निश्चयें करून सहन करण्यास अशक्य अशा व्यथेला देणाऱ्या झाल्या. अतएव तो लक्ष्मण अश्रुपातानीं युक्त होऊन आश्रमांतून शीघ्र अकस्मात् निघून गेला.

दस्यो क्व त्वं यास्यसि हृत्वा रत्नं जगन्निवासस्य ॥ कुत्र निलीय स्थेयं मत्स्येनागस्कृता पयोराशेः ॥ ५० ॥

अर्थ:- हे चोरा रावणा, तूं जगद्व्यापक रामाचें सीतारत्न हरण करून कोठें जाशील? कारण समुद्राचा अपराध करणाऱ्या मत्स्यानें कोठें लपून राहावें.

श्रद्दध्यां कथमनया त्यक्तां छायामिव स्ववत्सलताम्

गरलप्रसवां कथयस्यमृतमयीमादितोऽपि वत्सलता ५१

अर्थ:- हे वत्सा लक्ष्मणा, सीतेनें छायेसारखी आपली स्वभावसिद्ध द-यालुता टाकली हें मीं सत्य कसें मानावें? कारण उत्पत्तीपासूनही अ-मृतरूप लता विषाला प्रसवली असें कथन करीत आहेस.

सौकुम्र्ये पर्णशाले मालेहाद्येव या मया निहिता॥ ल-

ब्धा मिथिलाजानेर्जनेन्यासापहारिणीं त्वाऽहम् ५२॥

अर्थ:- हे पर्णशाले, जनकापासून मिळाली जी मालेसारखी सीता, मीं आ-तांच येथें ठेविली ती कोठें आहे? (ती नाहींशी झाली) यावरून ठेवलेले वस्तूचा अपहार करणारी तूं आहेस असें मी जाणतों.

गोदावरिसा ह्ंगता जगता सत्येति संस्कृता त्वमसि॥

तमसि च्युतरत्नं जनमंजनदानेन मामनुग्रहाण॥५३॥

अर्थ:- हे गोदावरि, तूं जगानें सत्य अशी उत्तम प्रकारें स्तविलेली आहे-स तर ती सीता कोठें गेली? अंधकारांत रत्न हरवलेल्या जनासारखा मी स्त्रीरत्नाशीं वियोग पावलों आहें या साठीं अंजन देऊन सीता दृष्टी प-डण्या विषयीं मजवर अनुग्रह कर.

कासारकुंदकदलीकरिकेसरिकृष्णसारकेकिपिकैः॥

अलिचंपकबंधूकैः शून्येवन सुंदरी विभज्य हृता ५४

अर्थ:- सरोवरांनीं मुख, कुंदांनीं दंत, केळींनीं मांड्या, गजांनीं मंदगति, सिंहांनीं कंबर, हरिणांनीं नेत्र, मोरांनीं वाणी, कोकिलांनीं स्वर, भ्र-मरांनीं अंगगंध, चांफ्यांनीं पीतवर्ण व दुपारीच्या फुलांनीं नेत्रादिअ-वयवांतील आरक्तता अशी या सर्वांनीं विभागून शून्य अरण्यांत सीता हरण केली.

अयि ते दयिते मयि तेऽमी संनिकृतप्रतिक्रियाः कृतिनः

गुणलवजितोऽमृतद्युति हरिणाः करिणस्तथैव केसरिणः ५५

अर्थ:- हे प्राणप्रिये, तुझ्या गुणांच्या लेशास जिंकणारे जे चंद्र, हरिण तसेच हत्ती आणि सिंह ते हे माझ्या ठिकाणीं तुझा सूड उगवून प्रस्तु-त कृतकृत्य झाले आहेत.

यद्यपि गणांरात्रं गतमद्येवाहं समागतोस्मि वनं॥ यंद्र-

हिनोभद्रहितोत्संवसकवसत्या श्रिया तया सत्या ॥ ५६॥

अर्थ:- वनवासास येऊन जरी बहुत दिवस गेले तरी आजच मी वनांत आलों आहें असें मला वाटतें. कारण कल्याण, हित व उत्सव यांचें उत्तम वसतिस्थानच अशा त्या साध्वी सीतेशीं विरहित झालों.

मृगयामीक्षणविजितः शक्यसि नोर्दाक्षितुं बंत त्रपया
मृगयामि कं नु तां वद मित्रमहं ते वनेचरो रामः ॥५७॥

अर्थ:- हे हरिणा तूं जिच्या नेत्रांनीं पराजित झाल्यामुळें लज्जेनें जिला पहाण्याविषयीं समर्थ होत नाहींस, त्या सीतेला कोठें बरें पाहूं? तें मला निश्चयें करून सांग; कारण मी वनांत संचार करणारा राम तुझा मित्र आहें.

लीनासि किमेकांते कांते कां तें व्यलंघयं वाचम् ॥ विरहज्वरविपदयिते दयिते दयिते ऽति दुःसहाधीरे ॥५८

अर्थ:- हे कांते तूं एकांतीं लपून राहिलीस काय? तुझ्या कोणत्या वचनाचें मी उल्लंघन केलें? हे प्रिये तुला मी प्रिय असून अधीर आहें यास्तव तुझ्या विरहज्वरसंबंधि दुःख मला अत्यंत असह्य झालें आहे. ॥७॥

सत्यंतके ऽप्यरातौ सत्यं सोढुं क्षमोऽस्म्यहं धीरः ॥ सत्यंचितांगि दूये सत्यंचलतो ऽन्तरे ऽपि किं विरहे ॥५९॥ ७ ॥

अर्थ:- यम जरी शत्रु झाला तरी त्यासही सहन करण्यास मी खरोखर समर्थ आहें. परंतु हे सुंदरांगि साध्वि तुझ्याशीं वस्त्राचे पदरानें जरी अंतर पडलें तरी मी दुःखित होतों तेव्हां विरह झाला असतां कायसां.

दृष्टं यत् सत्या ऽगो वत्स त्यागोचितं मयि प्रियया ॥
तत् किं त्वया न लक्षितं मक्षि तवाप्यनलसं मदाचरणे ६०

अर्थ- हे लक्ष्मणा प्रिय आणि साध्वी अशा सीतेनें त्याग करण्यास योग्य असा जो अपराध माझ्या ठिकाणीं पाहिला तो तूं पाहिला नाहींस काय? कारण तुझीही आलस्यरहित दृष्टि माझ्या आचरणावर असते.

वीजय मामंचलतः पंचलतः पल्लवो ऽमृतेव्रततेः ॥ स्कंदति शयस्ते व्यंजनान्मुदतिशयस्येकहेतुरञ्जनात् ६१

अर्थ:- हे सुंदरि पदरानें मला वारा घाल. कारण तूं केवळ अमृतवल्लिरू-

प असल्यामुळें तुझा पांच (अंगुलिरूप) डाहाळ्यांनीं युक्त शाखेसारखा हात कमलाच्या केलेल्या विंझण्यापेक्षां अतिशयित आनंद होण्यास अद्वितीय हेतु आहे.

काननं त्वदोऽसि नंदनमधुना पितृकाननं स्फुटं स्पष्टम्
अहमपि हरिरभवं तां मृते विदोर्नीं श्रियं महाभूतः ६२

अर्थ.- हे अरण्या, सीता होती त्या काळीं तूं इंद्राच्या नंदन वनासमान भासत होतेंस आणि तिच्या वियोगानें सांप्रत श्मशानासारखें अगदीं स्पष्ट रीतीनें भासत आहेस. तसा मीही सीतासंयोगकाळीं इंद्रासारखा शोभत होतों व आतां त्या सीतेवांचून मी महाभूतासारखा झालों. ॥७॥७॥

नित्यं निरंतराभ्यां स्फुरदंति गुरुभ्यां निसर्गकठिनाभ्याम्
ध्रुवमुपदिष्टं हृदयं तव स्तनाभ्यां स्वभावमृदुलमपि ६३

अर्थ.- हे सुंदरि सर्वदा अंतर रहित व मोठे असून स्वभावतः कठोर अशा तुझ्या स्तनांनीं स्वभावानें कोमल अशाही हृदयास निष्ठुरपणाचा उपदेश निश्चयें करून केला.

किं दोषाकर वच्म्यहमिंदो निंदोचितं कुरु स्वैरम्॥ येस्य श्रियासि स्फुभगस्तस्मिन्मित्रे गते ऽस्तमुल्लससि ६४

अर्थ- हे दोषाकरा (रात्र करणारा किंवा दोषांची खाण) चंद्रा मी काय बोलूं? निंदेला उचित तें यथेच्छ कर. कारण ज्याच्या कांतीनें तूं शोभायमान आहेस तो मित्र (सूर्य, पक्षीं स्नेही) अस्तास गेल्यावर देदीप्यमान दिसतोस.

वत्स न यदि ललना किं लोलेनालिंगिता मया लतिका
अस्तु तदनुकृति दयिता मैहमेनां झरिति नोत्सहे हातुं ६५

अर्थ- हे लक्ष्मणा ही जर स्त्री नाहीं तर मी आसक्त होऊन लता आलिंगिली काय? असो तथापि सीतेसमान कृति केल्यामुळें अतिप्रिय अशा या लतेस शीघ्र सोडण्यास मी उत्साह पावत नाहीं.

असवः कं सवः प्रियसख एकाकी जनं इतो गतो दूरं
अलसा जलसारसयोर्न हि शोभा जीवनं मित्रो विरहे ६६

अर्थ- अहो आलस्ययुक्त प्राणहो, तुमचा प्रियमित्र तो एकाकी जन (सी-

ता) येथून दूर कोठें गेला? कारण जल व सारसपक्षी यांचा परस्पर वियोग झाला असतां जलास शोभा नाहीं व सारसास जीवन नाहीं असें होतें.

नीतावधूर्न दस्योस्त्रातेत्यलं मार्य तेन तापेन॥ शापेनेव सखा ते ऽधर्मेण हतोस्य तेन पापेन॥६७॥ ७॥ ७॥

अर्थः- हे जटायो आपली स्नुषा (सीता) रावणानें नेली तिचें त्या चोरापासून रक्षण करण्यास मी समर्थ झालों नाहीं, असा तो ताप पुरे; कारण तुझा सखा दशरथ जसा श्रावणपित्याच्या शापानें मरण पावला तसा तूं त्या पापरूप रावणाच्या हातून अधर्मानें मरण पावलास.॥७॥ ७॥

कश्चन युवा तपस्वी विरही परिषस्वजे तरुव्रततीः॥ व्रततीर्थपरा मुनयो ऽनुनयोदारोक्तयस्तमानर्चुः॥६८॥

अर्थः- कोणी एक तरुण स्त्री-विरहानें युक्त असून तपस्वी तो (राम) वृक्षव वेली यांस आलिंगन करूं लागला, तरी व्रतें व तीर्थें यां विषयीं अत्यंततत्पर आणि विनययुक्त उदार भाषण करणारे असे मुनि त्याची (रामचंद्राची) पूजा करूं लागले.

अमृतममृतफलवदरं बदरं प्रेम्णा बभक्ष चित्रमिदं तदपि च शबरीदत्तं मत्तं मध्वं नमामि यं मुनिवाक्६९

अर्थः- अमृतानें (अविनाशी रामचंद्रानें) बोर तेंही शबरीनें (भिल्लिणीनें) दिलेलें अमृतफला सारखें अत्यंत प्रेमें करून भक्षिलें. हें आश्चर्यआहे. या विषयीं अशीही मुनींची वाणी पुराणांत प्रसिद्ध आहे; यास्तवमला मत्त मानूं नका.

किमधिकमतोस्ति चित्रं मित्रं विपिनौकसां श्रुतिरहस्यं यद्दर्शनाय यतिभिः पतिभिः पृथ्व्या मृगायित मरण्ये ७०

अर्थः- यति व पृथ्वीचे पालक राजे यानीं ज्याच्या दर्शनासाठीं अरण्यांत हरिणा प्रमाणें आचरण केलें. तें श्रुतीचें गोप्य तत्व (राम) अरण्यवासि वानरांचें मित्र झालें या पेक्षां अधिक आश्चर्य काय आहे?॥७॥ ७

वासववैभव मूनं चक्रुः कपयो प्यहो ऽद्भुतं शृणुत॥ यत्पुर मृतेमार्गेलं दद्दुरगनगेरवगमृगारिपुण्य उत्सवेतः॥७१

अर्थः- वानरानींही इंद्राचें वैभव न्यून केलें हें परमाश्चर्य श्रवण करा. तें

असें कीं, त्यानीं स्वतः अमृत आकंठ मर्याद प्राशन केलें. आणि वृक्ष, पर्वत, पक्षी, मृग व शत्रु यांस आनंदानें दिलें.

पत्युः करेन स्वो मय्युटजान्माभिर्व कथं बलाद्धृतवान् ॥
नं समुद्रेऽत्रे से मुद्रे नौ नौ वत्त्रातु मागतः कस्मात् ॥७२

अर्थः– हे मुद्रे, तुलाही पतीच्या हस्तापासून पर्णशालेंतून मज सारिखें कसें बलात्कारानें हरण केलें. आणि तो पति या समुद्रांत नौके प्रमाणें आपणांस रक्षण करण्या साठीं कोणत्या कारणास्तव आला नाहीं?

स्वेपतिस्त्वसतां हंताहं ताहं तापमनुभवाम्यबला ॥ तुल्ये वांधिसमुद्रे मुद्रे मुद्रेखया लिखितया ऽप्के ॥ ७३ ॥

अर्थः– हे मुद्रिके, आपला पति दुष्टांचा वध करणारा असून मी अबला तापाचा अनुभव घेत आहेना! असो. अशा या चिंता समुद्रांत तुझ्या दर्शनानें जो हर्ष झाला हा उदकावर लिहिलेल्या रेषे समानच आहे.

अखिलप्रश्रयपात्रं सखि लक्ष्मीवान् सलक्ष्मणः कुशली
नखिलक्ष गुरुर्हरिरिव मखिलब्धास्त्रः स चापि वीरमणिः

अर्थः– हे सखि सर्वांच्या प्रीतीचें पात्र, वीरश्रीयुक्त, तीक्ष्ण नखयुक्त लक्षावधि पशूंत श्रेष्ठ अशा सिंहासमान असून विश्वामित्रा पासून अस्त्रविद्या पावलेला तो लक्ष्मणासहित वीरश्रेष्ठ राम सुखी आहेना?

स्वं भोगमिवादातुं हरिरिव हरिणेष्विहागमिष्यति किं
मां सांत्वयितुमनाथां नूनं त्वं प्रेषितासि दयितेन ॥ ७५

अर्थः– हे मुद्रिके, पतीनें मज अनाथेचें सांत्वन करण्या साठीं तुला निश्चयें करून पाठविलें आहे या वरून असें वाटतें कीं, तो सिंहासारखा स्वकीयभागतुल्य मला ग्रहण करण्या साठीं येथें या हरिणसदृश राक्षसांत येईल काय?

द्रष्टुं मानरिहत्वामार्य प्रहितोहमागतो दूतः ॥ सूतः प्रथमं रविणा नलिनीमिव जयति सोस्त्रिपुरुहूतः ॥७६

अर्थः– हे मानः सीते, तुला पाहण्या साठीं मी रामानें पाठविलेला दूत येथें आलों. सूर्यानें पाठविलेला सारथि जसा कमलिनीचा विकास करण्या साठीं प्रथमतः पुढें येतो तद्वत्. तो धनुर्धारि श्रेष्ठ माझा स्वामी राम

सर्वोत्कर्षानें वर्तत आहे. ७६

> ग्रीष्मे गज इव सरसीं त्वां सीतां काननेष्व-
> नासाद्य ॥ भ्रांतः श्रांतस्वांतः कांतः कां तद्व्य-
> थांब्रवीम्यंब ॥७७॥

**अर्थ**- हे मातः ग्रीष्मऋतूमध्यें पुष्करिणी प्राप्त न होतां जसा गज तसा राम. तूं सीता अरण्यांत प्राप्त न झाल्यामुळें भ्रांत होऊन अंतःकरणांत श्रमी झाला. तेव्हां कोणती त्याची व्यथा मी तुला सांगूं. ७७

> गोष्पदमिव तीर्णं उदधिमयं मेहमबलोपि-
> यस्यदासेचरः ॥ कथमर्णवभेकमरिं पत्रिपि
> निजवत्सेरन्ने तस्य शरः ॥७८॥

**अर्थ**- ज्याच्या दासांत संचारणारा हा मी (मारुति) बलहीन असून-ही समुद्राप्रत गोष्पदा (गायीच्या खुरांत सांचलेलें पाणी) साररवा तरलों. त्यापेक्षां त्याचा गरुडासमान वेगवान् बाण या समुद्रांतील बेडका साररव्या शत्रूस (रावणास) कसा जिंकणार नाहीं? ७८॥ श्रीराम्

> अंदृहजभवप्रहितोऽनंतबलोऽरिपुरमाशुग-
> गः सहरिः ॥ अयमपि तथैव दूतः पश्यत पी-
> तांबरः श्रियाश्लिष्टः ॥७९॥

**अर्थ**- ब्रह्मदेव आणि शंकर यांनीं प्रेरित असून अपार बलवत्तर पीतांबरधारी, श्रीनें आलिंगित असा तो विष्णुरूप शीघ्रगामी बाण त्रिपुरासुराचें पुर दग्ध करिता जाहला. हाही दूत (मारुति) तसाच आहे तो असाकीं, अजराजकुलांत उत्पन्न अशा रामानें प्रेरित असून अपार बलवान्, शीघ्रगामी, आपल्या उड्डानवेगानें आकाश प्राशनच करीत आहे काय? किंवा आपल्या सुवर्णसम अंगकांतीनें आकाशपीतवर्ण करणारा, वीरश्रीनें युक्त अशा वानररूप त्या मारुतीनें रावणाचें लंकापुर जाळिलें. ७९

> कोप्याहं यतो धर्मस्ततो जयः सत्येमिति कवि-
> प्रवरः ॥ यत खलु विजितः सदनुगकपिना

से पिनाकिवर-स्मरोन्मत्तः॥ ८० ॥

**अर्थ.**- रामसेवक मारुतीनें शंकराचा वर हीच कोणी एक स्मरा तिणें उन्मत्त झालेला रावण ज्यापेक्षां निश्चयें करून जिंकला तस्मात् जिकडे धर्म तिकडे जय असें जें कोणीही कविश्रेष्ठ बोलला तें सत्य आहे. ८०॥

नें कपिरनुज्ञोग्निरपि नें परवान् वनभंगम-
रिपुरीदाहं॥ किंतु क्षुब्धाः सत्या निःश्वासा
एवं चक्रुरत्युष्णाः॥ ८१॥

**अर्थ**- आज्ञा न दिलेला मारुति, रावणाच्या वनभंगा विषयीं समर्थ नाहीं. परतंत्र अग्नीनेंही रावणाच्या लंकापुरीचें दहन केलें नाहीं, काय? तर, सीतेचे अति उष्ण क्षोभ पावलेल्या श्वासानींच वनभंग व लंकापुरी दहन हीं कृत्यें केलीं. ८१॥

असत्प्रियाभिरारात् पाखंडोक्तिभिरशं-
कमशिवाभिः॥ रुद्धावनें कलावुपनिषदिवें
कुटिलाशयाभिरेकसती ८२

**अर्थ.**- कुटिलांतःकरणयुक्त असल्यामुळें निःशंक पाखंड परभाषणें करणाऱ्या अत एव अमंगल अशा असत्‌ स्त्रियांनीं अशोक वनांत एकाकी सीता आसमंतात् वेष्टिली होती. यास दृष्टांत;- असत्‌ांस प्रिय असून कुटिल भावयुक्त निःशंक अमंगल अशा पाखंडोक्तीनीं कलियुगांत उपनिषत् जशी रुद्ध होते तद्वत्. ८२

आर्यामपश्यमहितस्त्रीरुद्धांतां नितांततां
ततनुम्॥ अधिकंटकारिकावृतिघर्म इवो-
त्वांतरोपितां जातिम्॥ ८३॥

**अर्थ.**- हे रामा, ग्रीष्मऋतूंत कंटकी वृक्षांच्या आवरणांत उपटून लावलेल्या जाई प्रमाणें राक्षसीनीं रुद्ध असून अत्यंत कृश तनु अशा त्या सीतेला मीं पाहिलें. ८३

कृपयः से पयः केवलमब्धेस्तीर्णःसरवानें
बाहुभ्यां॥ व्यक्तं नक्तंचरवरबलमपिकपि-

सैन्यदैन्यहरतेजाः॥८४॥

अर्थ:- अहो वानरानो, तुमचा तो सखा मारुति केवल समुद्रोदकच तरला असें नाहीं; तर वानरसैन्याचें दैन्य हरण करणाऱ्या तेजानें युक्त असा मारुति स्वबाहूनीं राक्षसश्रेष्ठ रावणाच्या सैन्यासही निश्चयें करून तरला. ८४

रक्षति कथमपि तन्वी देहादधिकं श्रुती दृशा-वपि सा॥ अरिसुंदरी विलापं मधुरं त्वामपि च पातुममृतमिव॥८५॥

अर्थ:- हे रामा, रावणप्रभृति शत्रूंच्या सुंदरींचा विलाप ऐकण्यासाठीं कान आणि अमृततुल्य मधुर स्वरूप तुह्मांसही अवलोकन करण्यासाठीं नेत्रही कृश झालेली ती सीता देहापेक्षां अधिक रीतीनें कसें तरी रक्षण करीत आहे. ८५

दग्धुमना अप्यबला बालतृणानि क्षणाद-नार्द्राणि॥ दहन-शिखेव सखायं त्वामेवास्ते सतीप्रतीक्षंती॥८६॥

अर्थ:- सीता शुष्क बालतृणासमान राक्षसांस क्षणांत अग्निज्वाले प्रमाणें दग्ध करण्या विषयीं मनानें उद्युक्त जरी आहे तरी ती अबला असल्यामुळें मित्र जो तूं त्या तुझीच वाट पहात आहे.॥८६॥ ७॥

बंधुरपि दस्युवेश्यः संश्रयदः संजडधीरिपोरि-ष्टः॥ किंप्रार्थ्यते ऽतिवेलं बध्यो लंघ्यस्त्वया-जैनैश्चान्यैः ८७

अर्थ:- हे रामा, जो सागर तुमचा बंधु (ज्ञाति) असूनही रावणास आश्रय देणारा असल्यामुळें तो तुमच्या शत्रूचा मित्र आहे यास्तव त्या मूढबुद्धि समुद्राची बहुकाल प्रार्थना काय करतां? तर आपण व अन्य जनांनीं उल्लंघन करण्यासाठीं यास बंधन करावें॥८७॥७॥

राज्ञा गुरुणा त्यक्तो न विषयसक्तः सतां मतो त्यर्थम्॥ दैवान्खलु समशीलव्यसनः प्राप्तः सखा विभीषण ते ८८॥

अर्थ- हे बिभीषणा, गुरुस्थानीय राजा दशरथानें टाकलेला, विषया सक्त नसणारा व साधूंस अतिशयें मान्य असा समानशील व्यसनमित्र (राम) तुला निश्चयें करून दैववशात् प्राप्त झाला आहे. ॥८८॥ ७

जीवेत्याशीरुचिता दातुं नमते विचार्य दत्ता-
श्रीः॥ नेमनोकृपात्रविचारोनमनात् सर्वस्व-
दानमाश्चर्यं ८९

अर्थ- नमस्कार करणाऱ्या बिभीषणास 'जीव' असा आशीर्वाद देण्यास उचितच आहे. परंतु त्यास राज्यसंपत्ति विचार न करितां दिली. यावरून असें वाटतें कीं, किंचितही पात्रविचार नसून केवल नमस्कारानेंच सर्व संपत्ति देणें हें आश्चर्य आहे. ॥८९॥

राम त्वया लेभात् खलु समदुःखसुखः स-
खा समासादि॥ व्यसनसमुद्रधिसुदुस्तरमन्यो-
न्यबलेन यत् सुखं तीर्णो ९०

अर्थ- हे रामा, तूं तर भाग्योदयामुळें समदुःखसुखी असा सखा (सुग्रीव) निश्चयें करून मिळविलास तेणें करून तुम्ही उभयतां परस्पर बलानें अति दुस्तर अशा संकट-समुद्रांतून सुखानें तरलांत ९०

अविलंघितमर्यादं बबंध बंधुं गुरुं ललंघ
बली॥ भक्तं जघान शंभोर्मुनिसुतमपिको-
पि हंत दारकृते॥९१॥

अर्थ- कोणी एका बलिष्ठानें (रामानें) स्त्रीसाठीं मर्यादा उल्लंघन न करणारा असून बंधु व गुरु अशा समुद्रास बंधन करून त्याचें उल्लंघनही केलें. आणि ऋषिपुत्र असून शंकराचा भक्त अशाही रावणास मारिलें हें आश्चर्य आहे. ९१

वंदे तं देवीनां हृतशोकं राक्षसीविलापगुरुं
जेगुरुं छवृत्तयोयं तापापहमस्त्रभोगिनाम
गुरुम्॥९२॥

अर्थ- उंच्छवृत्तीनें उपजीविका करणारे मुनि ज्यास वर्णिते झाले जो तापाचा नाशक असून अस्त्ररूपी सर्पाचा निवासस्थान कृष्णा-

गरु (चंदन) च, तसाच जो देवस्त्रियांचा शोक हरण करणारा असून राक्षसींच्या विलापाविषयीं गुरु त्या रामास मी वंदितों. ९२

जटिलस्तमालनीलो वनवासिसखः पतंग-
कुलपालः॥कश्चन ददाह खेचर भूभृतम-
धिजलधितापहादावः९३

अर्थः- जटाधारी, वृक्षवत् तमालनीलवर्ण, वानरमित्र, सूर्यवंशपालक व तापनाशक असा कोणी अद्भुत दावाग्नि (राम) समुद्राच्या आश्रयानें खेचर भूधरास (आकाशांतील पर्वतास पक्षीं राक्षसराज रावणास) दग्ध करिता जाहला. ९३

मेघेन केनचिदहो धनुष्मता भूगतेन शरवृ-
ष्ट्या॥ जलपूर्णा वाहिन्यः खगमा निर्जीव-
नीकृताः सिंधो ॥९४॥

अर्थः- काय हें आश्चर्य! पहा;- धनुर्धारि व पृथ्वीवर असणाऱ्या कोणी एक मेघानें (रामानें) शरवृष्टि करून आकाशगामी व जलानीं भरलेल्या वाहिनी ह्मणजे नद्या, पक्षीं जड जे राक्षस त्यांणीं भरलेल्या सेना, समुद्राच्या ठिकाणीं निर्जीवन ह्म० निर्जल पक्षीं प्राणरहित केल्या!

तृणकाननं ददाह न कीलालनदीः ससर्ज
तापहरः॥कश्चन पतंगकुलज स्तमालनील
स्तनूनपात् तरुणः९५

अर्थः- सूर्यवंशांत जन्मलेला असून तमालनीलवर्ण व ताप हरण करणारा अशा कोणी एका तरुण अग्नीनें (रामानें) तृणाचें अरण्य जाळिलें नाहीं. आणि राक्षसांचें रक्त हेंच कोणी एक उदक याच्या नद्या उत्पन्न केल्या. ९५

कपिसख एकः कश्चन चक्रेनाकौकसां क्षणात्
कुशलम्॥ यत् कुलिशकरस्य दुष्करमकाल
कूटाशशूलशिखिसाध्यं९६

अर्थः- जें इंद्रास अत्यंत दुष्कर आणि शंकराचा त्रिशूल व अग्नियांस असाध्य असें स्वर्गवासी देवांचें कल्याण तें कोणी एका वानर

मित्रानें (रामानें) क्षणांत केलें. ९६

आस्तां येहूधमकरो रक्षोधिपते रणे पणेनत्वं
सोपि प्राज्यं राज्यं प्राणान् प्रजहो न तु प्रतिज्ञां
स्वां ॥९७॥

अर्थ:- हे रामा, तूं संग्रामांत प्रतिज्ञेनें रावणाचा जो वध केलास तो असो. रावणानेंही महद्राज्य व प्राण यांचा त्याग केला; परंतु आपल्या प्रतिज्ञेचा त्याग केला नाहीं. ९७

आपदमांसु प्रेक्सोपदमुग्रंकेथं परकलत्रम्॥
पापदवानलदग्धो ह्यो पदमखिलश्रियांत्वमपि
वीर ॥९८॥

अर्थ:- हे वीरा रावणा, तूं संपूर्ण संपत्तींचा स्थानभूत असूनही पापरूप दावाग्नीनें दग्ध होऊन विपत्ति प्राप्त होण्यासाठीं भयंकर व नापदायक अशा परस्त्रीला (सीतेला) कसा स्पर्श केलास? हर हर!!९८

अन्यकलत्रं विषमं विषवन्हेरपि तमां यदामूलम्॥ स्पृष्ट्वैकदैव दग्धो गुणदोषज्ञोपि बत
समन्त्रिकुलः९९

अर्थ- परस्त्रीही मूळापासून विषाग्नीपेक्षांही अतिशय कठिण आहे. कारण;- प्रधानसमुदायासहित 'रावण' गुणदोष जाणता असूनही एकदांच परस्त्री जो सीता तिला स्पर्श करून दग्ध झाला!! ॥ ९९॥

नक्तमिवाशोकवनेप्यनिरीक्ष्यप्रियुतमंतमां
तांता दृष्ट्वा तुं वन्हिकुंडेऽप्यहनीव सरोजि
नी बभौकांता १००॥

अर्थ- परमप्रिय जो रामचंद्र त्यास न पाहिल्यामुळें अशोकवनांत देखील रात्रींच्या कमलिनी प्रमाणें अत्यंत म्लान झालेली सुंदरी सीता त्यास पाहिल्यानंतर अग्निकुंडांतही दिवसाच्या कमलिनी प्रमाणें प्रफुल्लित अशी भासूं लागली. १००

सुहृदोयोगवियोगो नान्यो स्त्रस्तापतोषयो
हेतू॥ प्रमद वने ग्लानिमिता तुष्टिं दहनेपि

यत् प्रिये दृष्टे ॥१०१॥

अर्थ- ज्यापेक्षां सीता अशोकवनांत ग्लानि पावली आणि राम अवलोकन केला असतां अग्नींतही संतोष पावली. तस्मात् सुहृदाचा समागम संतोषास कारण आहे व सुहृदांचा वियोग दुःखास कारण आहे. सुखदुःखास अन्यकारण नाहीं. १०१

विमलकनकमूर्तिरिवज्वलनेप्योसिदेविलब्ध परभागा ॥ मागाः विषादमधिकोनुतिमाप्ता-त्वंजगत्सुयदनागाः१०२

अर्थ- हे सीते, तूं निष्पाप असल्यामुळें अग्नींतही निर्मल सुवर्णमूर्तीसारखी परम शोभा पावलीस तेणें करून जगांत अधिक स्तुतीला प्राप्त झालीस यास्तव खेद पावूं नको. १०२

अवतादिह्विभीषणस्त्वां लंकेयं केसरीव मेरुगुहां ॥ आकल्पमचलपदभागेषपतिर्ध्रुवसखस्त्वंवास्तुसुखी १०३

अर्थ- हे लंके, मेरुगुहेला जसा सिंह त्या प्रमाणें हा बिभीषण तुला रक्षो. आणि चिरंजीवी असल्यामुळें ध्रुव-मित्र असा तुझा हा पालक कल्पपर्यंत निश्चलपणें या स्थानचें राज्य करून सुखी असो. १०३

भवमिव दुस्तर मुदधिं तीर्णास्त्वां देवि सुगतिमिच्छवः ॥ अवलंब्य स्वोत्पादित मचलात्मानं सुपुत्र मिव सेतुं १०४

अर्थ- उत्तम गतीची इच्छा करणारे स्वयें उत्पन्न केलेल्या निश्चलांतःकरण सुपुत्राचा आश्रय करून जसे संसारांत तरतात तसे हे लंके राम व वानर स्वतः बांधलेल्या शिलामयसेतूचा आश्रय करून दुस्तर समुद्रास तरले. १०४.

सुषमोज्झितघनशंपे पंपेयं पेयवारि चिरमस्यां ॥ सुदति रुदंति मयि शिखिभिर्नृत्यद्भिरसद्भिरिवभृशंमुमुदे १०५

अर्थ- उत्कृष्ट शोभेनें मेघसंबंधि विद्युल्लतेला पराजित करणा-

चे, हे उत्तम दंतपंक्तिशोभित सीते ही पंपा (सरोवर) असून इच्या ठिकाणीं प्राशन करण्यास योग्य उदक बहुकाल आहे. तुझ्या वियोगानंतर मी रुदन करीत असतां नृत्य करणाऱ्या उन्मत्तासारख्या मयूरांच्या योगानेंही पंपा अत्यंत हर्ष पावत होती. १०५॥

पंचवटि त्वय्युषिताः शर्मयोध्यायामिवांब लब्धाः स्मः॥ मामियमिताऽरिकीर्त्या सहसिंधुं स्वरपगेव कालिंद्या १०६

अर्थ– हे पंचवटिमातः, आम्हीं तुझ्या ठिकाणीं पूर्वीं बहुत दिवसवास केला तेव्हां आम्हांस अयोध्येसमान सुख प्राप्त झालें. जशी गंगा यमुनेसह समुद्रास प्राप्त होते तद्वत् सीता शत्रूच्या कीर्तीसह मला प्राप्त झाली. १०६

भो मातर्गोदावरि यावरि करिहरिपती सतीसहितौ॥ सुचिरं मुषितौ नवांके कौसल्याया इवांब तौ वेत्तौ १०७॥

अर्थ– हे माते गोदावरि जे शत्रुरूप गजांस सिंहश्रेष्ठासारखे सीतेसहित आम्ही कौसल्येच्या अंका प्रमाणें तुझ्या नीरीं बहुकाल राहिलों. हे आई, ते आम्ही, असें जाण. १०७.

तुभ्यं बद्धोंजलिरयमीशशिरःसारसासने देवि॥ गुर्वीमुल्लंघ्य त्वां तीर्णाः कथमापदं प्रतिज्ञां स्वां १०८

अर्थ– शंकर मस्तकरूप कमलासनस्थित हे देवि गंगे, तूं श्रेष्ठ असून तुझें उल्लंघन करून आम्ही विपत्ति व स्वकीय प्रतिज्ञा यांत कसे तरलों; यास्तव अपराधक्षमेसाठीं आम्ही तुला हा अंजलि जोडला आहे. १०८.

तृषितोसि बाल–चातक तात करुणे–यागतोद्य जीवनदः॥ पश्योन्मील्य नयने नयनेहामृतमनेहसं पातुं १०९

अर्थ– हे बालचातका (भरता) तूं तृषाक्रांत आहेस यास्तव हे बाप्पा,

जीवन देणारा (रामरूपी मेघ) दयेनें आतां आला आहे तर नेत्रांच्या इच्छेस अमृतासारखा आल्हादक जो हा काल (पक्षी वर्षाऋतु) तो पाहण्या करितां नेत्र उघड आणि पहा. १०९.

भृणुत मयूरा यं प्रियमीक्षितुमत्यंतमुत्कंका मुदिरम् ॥ स महाभागत आगत उत्सव ऐकांतिको द्य नृत्येध्वं॥११०

अर्थ- हे मयूरानो, ऐका. ज्या प्रियमेघास पाहण्याकरितां तुह्मी फार उत्कंठित झालेले आहां. तो तुमच्या महाभाग्यानें आला आहे ह्मणून आज मोठा उत्सव आहे यास्तव तुह्मी नृत्य करा. ११० ॥

सिंहासन किं हो स नं पतिरद्य स्मर्यते महेंद्र सखः येनास्यखिल- नृपतिपति नति भाजनममृत पायिपीतयशाः१११

अर्थ- हे सिंहासना, ज्याच्या योगानें तूं सकल नृपश्रेष्ठांच्या नमस्कारास पात्र होऊन राहिलेस व अमृतपान कर्ते जे देव तेही तुझें यश वर्णन करीत होते. तें तूं आतां (रामाभिषेककालीं) तो महेंद्राचा सखा जो स्व पति (दशरथ) त्याची आठवणही करीत नाहींस काय! अरेरे! 'खरंच आहे, मुलगा अधिक पराक्रमी निघाला ह्मणजे बापाची आठवण बुजविते.' ११२.

नाके साकेतयशोः रुचिममृतरसेः मृतांधसामकरोत्॥ सत्ये रत्येकपदं स्वं तांडवपंडितं मृडानीशं ॥११२॥

अर्थ- अयोध्येच्या कीर्तीनें स्वर्गांत देवांना अमृतरसाचे ठिकाणीं अरुचि उत्पन्न केली. सत्यलोकीं प्रीतीचें स्थान काय तें आपणच होऊन राहिली- आणि कैलासीं तर महेश्वरास तिणें नृत्यामध्यें पंडित केलें. ॥११२॥ ७॥

परस्पर्शा पदा साध्वीं विश्वंस्तं वीरमपि जंघान वने॥ तत्यांज सतीं कोपीनेवंशजानां सतां मतः कुपतिः॥११३॥

अर्थ- कोणी एक सूर्यवंशांतील सज्जनांस मान्य असा कुपति (पृथ्वीप-

ति पक्षी वाईट राजा ) साध्वी जी अहल्या तीस पायानें स्पर्श करिता झाला. विश्वास पावलेल्या वीरास (वाळीसही) वनांत मारिता झाला. आणि पतिव्रता जी स्त्री (सीता) तीसही टाकिता झाहला. ११३॥

यदमृतममृतकृषामपि यच्च सुखं योगसंपदामतुलम्॥ उपनिषदां यत्तत्त्वं तदयोध्यावासिनां विधेयमहो ११४.

अर्थ:- जें अमृत सेवन करणाऱ्या देवांसही अमृत होय. आणि जें योगसंपत्तीचें अतुळ सुखच. तसेंच जें उपनिषदांचें मुख्य तत्व तें (श्रीराम) अयोध्यावासी जनांच्या अगदीं स्वाधीन आहे. कायहो हें आश्चर्य !! ११४॥

मातरयोध्ये भुक्ताः पतयः पारेशतं त्वया सत्या स्मरसि कथं न तदधुना मधुना ननु मोहितासि मुना पत्या ११५॥

अर्थ-हे माते, अयोध्ये, प्रस्तुत विद्यमानजी तूं आहेस त्या त्वां शेंकडों पति आजपर्यंत भोगिलेस ते तुला आतां कसें आठवत नाहीं? मला वाटतें सांप्रत मद्या सारखा मोहक जो हा पति (रामचंद्र) यानें तुला मोहित केलें आहे. ११५॥ ॥ इतिश्रीमद्रामनंदन मयूरविरचिता आर्यामुक्तामाला सं०

## अथ गंगार्याप्रारंभः

जय जय भगवति गंगे त्वं गेयगुणा प्रतीपसुतकांते॥ अयि तेऽस्तु दया त्वत्तो येऽन्ये दीने नाहि क्षमा मपि ते ॥१॥

अर्थ:- हे ऐश्वर्यवति गंगे, तुझा जयजयकार असो. हे शंतनु स्त्रिये, तुझे गुण गायन करण्यास योग्य आहेत. हे मातः तुझी दया मजवर असो. जे तुझ्याहून इतर आहेत ते मज दीना विषयीं समर्थ नाहींत. १॥ ७ ॥

बलिना कलिना मलिनानुद्धर्तुमसि त्वमेव सत्ये मलम्॥ गायंति यशः कवयस्तव यत्पीयूषतोऽपि संश्रमलं ॥२॥

अर्थ- बलवान जो कलि त्याच्या योगानें मलिन(पापी) अशा जीवांस उ-

रण्या विषयीं खरोखर तूंच समर्थ आहेस. ह्मणून हे साध्वि, कविजन अ-मृतापेक्षांही जें तुझें निर्मल यश तें गातात. २॥

भविता त्वयि मज्जनतः शुचिराशु न तथा तप-
स्तं गंगे ऽहम्॥ रुचिरमपि वपुः पापं हेयमिह य-
था सर्पेत्तगं गेहम्॥३॥

अर्थः- हे गंगे, मी तुझ्यांत स्नान केलें असतां शीघ्र शुद्ध होईन, तसा तपश्चर्या करून होणार नाहीं. यास्तव सुंदर जरी आहे तरी पापरूप असें शरीर सर्पयुक्त गृहा प्रमाणें तुझ्या या उदकांत त्याग करण्यास योग्य आहे. ३

शरणागतो दयावति दीनस्त्याज्य स्त्वयाऽनु गंगेऽयं
कः स्मरतु त्वां हित्वा सन्तानं विषयिणां नगं गेयं४

अर्थः- हे दयालो, गंगे, शरण आलेला हा दीन तुझ्याकडून टाकला जाऊं नये. तुला सोडून विषयि जनांस मात्र वर्णन करावयास योग्य अशा कल्पवृक्षास कोण स्मरेल ? ४॥

भागीरथि तव दृष्टिः प्रभवति पुरुषार्थ संपदे वि-
नते॥ ईषन्मात्रमपि श्रुतमौदासीन्यं जनेषु देवि
न ते॥ ५ ॥

अर्थः- हे भागीरथि नम्र झालेल्या पुरुषाच्या ठिकाणीं जी तुझी दृष्टि ती चतुर्विध पुरुषार्थांची संपत्ति देण्यास समर्थ आहे; हे देवि गंगे, नत जनाविषयीं तुझें किंचिन्मात्रही उदासीनत्व आह्मी ऐकलें नाहीं. ॥ ५ ॥

मूर्तिमती त्वमसि दया देवस्य हरेर्जगन्त्ययादव-
तः॥ त्रातं हि लीलयेदं विश्वं संसारतस्त्वया द-
वतः॥ ६ ॥

अर्थ- हे गंगे तूं, सर्व जगास भयापासून रक्षण करणारा देव जो विष्णु त्याची मूर्तिमंत दयाच आहेस. कारण त्वां लीलेनें हें विश्व संसाररूप दावाग्नीपासून रक्षण केलेंस. ६

जय देवि जन्हु-कन्ये जगदघ-संहार सद्व्रते धन्ये
सन्तु बहवः किमन्यैस्त्वामेवं जगद्धितावहां मन्ये ७

अर्थ- हे देवि, जगांतील पातकांच्या संहाराविषयीं जिणें उत्तम व्रत-च धारण केलें आहे असे, हे पावनि जान्हवि, तुझा जयजयकार असो. दुसरे पुष्कळ असोत त्यांच्याशीं काय करावयाचें आहे? मी एक तुलाच जगाचें हित करणारी समजतों. ७॥

वससि विशंकं शंभोः कृतसिंजितविहितमर्म-
रा शिरसि॥ दुर्गाया अपि तेन त्वं भगवत्यतु-
लशर्मराशिरसि ८

अर्थ- हे गंगे, तूं भूषणांचा व वस्त्रपत्रांचा शब्द करून शंभूच्या मस्तकावर निःशंकपणानें राहतेस. हे भगवति, त्या योगानें तूं पार्वतीलाही (सपत्नी असतां) अनुपम सुखाची रासच होत आहेस. ८॥

शरणागतजीवानां प्रक्षालितसर्वपापजंबालां
वंदे हरेर्हरंतीं भीसं त्वां त्रिविधतापजं बालां ९

अर्थ- शरण आलेल्या जीवांचा पापरूपी पंक (चिखल) जिणें धुवून टाकिला आहे आणि त्रिविध (आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधि-दैविक) तापापासून होणारे भीतीस हरण करणारी, जी विष्णूची क-न्या तूं त्या तुला मी वंदन करितों. ९॥

पतितः काकोऽपि भवति पयसि भवत्याः सुराप-
गे हंसः॥ भजति यशस्सुकृतौघस्त्वयि कृतम-
ज्जनसुरापगेहं सः १०

अर्थ- हे सुरनदि भागीरथि, तुझ्या उदकांत पडलेला कावळाही हंस (राजहंस पक्षी मुक्त) होतो. तसेंच प्रसिद्धि यश आणि सुकृत (पुण्य) यांचा समूह, तुझ्या उदकांत स्नान केलेला जो मद्यपी त्याच्या गृहास प्राप्त होतो. १०

हरितां ददासि जान्हवि त्वं जंतुभ्यस्तथा मुदा ह-
रतां॥ किं मे न दर्शनं वा कुसत्याः स्कं यशः कथा
मुदाहरतां ११

अर्थ- हे जन्हुकन्ये, तूं प्राणिमात्राला स्नानपानें करून आनंदानें विष्णुपणा तसाच शिवपणा देत्येस आणि मला दर्शनही नाहीं काय? तु-

ज्या यशाची कथा वर्णन करणारे पुरुषांची ती वरील वाणी (हरिहरत्वदाना-विषयींची) सत्य असो. ११.

उत्तम ईशितुरंगे नर्तसि नटीश्वरि नटी यथो रंगे॥
कृतजगदघनगभंगे सन्मतसंगे नमोस्तु ते गंगे १२॥

अर्थ– हे नटीश्वरि, शिवप्रिये, अथवा हे चंचल तरंगे, जशी रंगसभेंत नटी नृत्य करित्ये त्या प्रमाणें तूं शंकराच्या मस्तकावर नृत्य करित्येस. हे जगाच्या पापपर्वताचा भंग करणारे व सज्जनप्रिय समागमे गंगे, तुला नमस्कार असो. १२

स्वेस्तुत्यनभिज्ञेऽपि त्वत्करुणा मयि कृतोननतावेस्तु॥ वस्तु प्राप्नोत्वयमपि जलजंतुभिरपि तवाप्यते स्वस्तु॥१३

अर्थः– तुझ्या स्तुतीविषयीं अज्ञानी जरी आहें तरी तुला मी अति नम्र आहें म्हणून मजवर तुझी दया असो. आणि हा (मी) परमार्थ वस्तूप्रत प्राप्त होवो. स्वर्गादिकांची मला इच्छा नाहीं. कारण स्वर्ग हा तर तुझ्या जलजंतूंसही प्राप्त होतो. १३

दयमानमानसे त्वं पुष्णास्यपि दर्दुरं बकं मीनम्॥
पीनं कुरुषे मकरं धनहीनं त्यजसि किं द्विजं दीनं १४

अर्थः– हे दयार्द्रचित्ते गंगे, तूं बेडूक, बगळा व मासा यांचेंही पोषण करित्येस. आणि मकरासही पुष्ट करितेस मग धनहीन दीन अशा द्विजाला (पक्ष्याला, पक्षीं ब्राह्मणास) कां टाकतेस? १४

भक्तमयूरघनघटे कुधियामस्माकमुचितमत्यागः॥ स्वयशो मा त्यज मातर्महतां महितो न शंसितमत्यागः १५

अर्थ– भक्त मयूरांस मेघमाले प्रमाणें सुखदात्रि हे गंगे, कुबुद्धि अशा आह्मांस महा अपराध करणें योग्यच आहे; परंतु हे मातुश्री, तूं आपलें यश त्यागूं नकोस. कारण थोर लोकांनां अत्यंत शस्त अशा पदार्थाचा त्याग करणें प्रशस्त नाहीं. १५

विष्णुपदि प्रतिकूलं व्यावर्तयितुं क्षमासि ते-

तदिष्टं ॥ संति संति सामर्थ्येऽपि प्रणमेदनवनं यदे-
वैनं तदिष्टं १६

अर्थ:- हे विष्णुचरणोद्भवे गंगे, तूं शरणागताच्या प्रतिकूळ दैवास निवा-
रण करण्यास समर्थ आहेस. हे सति, सामर्थ्य असतानांही जें प्रणतांचें
रक्षण न करणें हे मातुश्री, तें प्रशस्त नाहीं. १६

कोऽस्तें त्रिविक्रमांघ्रेर्ध्यायिस्वद्रोरिहोऽसजन्मान्या ॥
सर्वास्कि देवतास्क स्वर्धुनि मातस्त्वमेव सन्मान्या ॥
॥१७॥

अर्थ:- या जगांत दुसरी कोणती नदी, ध्यानकर्त्यास कल्पवृक्षाप्रमाणें जो
त्रिविक्रमाचा (वामनाचा) चरण त्या पासून जन्म पावली आहे. तर हे स्व-
र्गंगे मातुश्री, सर्व देवतां मध्यें तूंच साधूंस मान्य आहेस. १७

नमनादमुनांकरुणे देवि भवत्या भवव्यथाःशमि-
ताः ॥ अमिताः प्रजाः कृतार्थाः प्राप्ता भव्यं वरं परं शं-
मिताः ॥ १८ ॥

अर्थ:- हे परम दयाळो गंगे, तुझ्या नमस्काराने॑च संसार दुःखें शांत केलीं.
आणि असंख्य लोक कृतकृत्य होऊन श्रेष्ठ अशा कल्याणास प्राप्त झाले.
व सुखास पावले. १८

स्पृष्ट्वा त्वां मां वातः स्पृशतु सुखं स्वमिव बालकं
तातः ॥ मास्तु मम विपदि पातः संसारात्तारयाऽ
शुभोमातः १९

अर्थ:- हे गंगे, हा वायु, तुला स्पर्श करून जसा बाप आपल्या बालका-
ला स्पर्श करितो त्या प्रमाणें मला स्पर्श करो. व माझें विपत्तीमध्यें पतन
कधीं न होवो. हे मातुश्री, मला या संसारांतून लोकर तार. ॥ १९ ॥ ७ ॥

भवतीं विनाऽत्र मुदितं कर्तारो दीन मातुरं कें
ते ॥ मलिनोऽपि शिशुरंकं सुखमयमपि लुं
ठति मातुरंके ते ॥ २० ॥

अर्थ:- हे गंगे, या जगांत तुजवांचून कोण ते या दुःखित दीनास आनं-
दयुक्त करणार आहेत? या मुळें जसा मलिनही मुलगा स्वच्छंदानेंआ-

पत्या मातुश्रीच्या मांडीवर लोळतो त्या प्रमाणेंच हा (मी) ही तुझ्या मांडीवर लोळत आहे. २०॥

शरणागतस्य मम खलु तव चापि यशस्करीमिमा मुक्तिम्॥ मानय मानय निकटं परिपालय देहि वत्सले मुक्तिं॥२१॥

अर्थ– हे दयावति, शरणागत जो मी त्या माझी तुलाही कीर्तिप्रद अशीही उक्ति खरोखर तूं मान्य कर. आणि मला आपल्या जवळ ने. व पालन कर. आणि शेवटीं मुक्ति दे. २१॥

संतापमपाकर्तुं कादंबिन्या यथा मयूरेण ॥ गंगाया विज्ञप्तिः प्रेम्णैव कृता तथा मयूरेण (२२)

अर्थ– संताप दूर होण्या करितां मोरानें मेघमालेची जशी प्रार्थना करावी त्या प्रमाणेंच गंगेचीही स्तुतीरूप प्रार्थना केवळ प्रेमानेंच मयूरकवीनें केली. २२॥ ॥ इतिश्रीमन्मयूरसत्कविरचिता गंगार्याः समाप्ताः

---

# अथ योगानंदार्याप्रा०

यो दीनान् गोपायति यतितां स्वीकृत्य कृत्यनिर्मुक्तः॥ तं प्रतिपन्नो मनुजो भवति यदप्येनसां खनिर्मुक्तः १

अर्थः- जो (श्रीगुरु) संन्यासित्वाचा स्वीकार करून इतर सांसारिककृत्यां पासून मुक्त होत्साता दीन जनांस पालन करतो, त्या सद्गुरूस शरण गेलेला मनुष्य जरी सकळ पापांची खाण असला तरी जीवन्मुक्त होतो. १.

गाहस्व तदुक्तरसे तरसे तरसे न मज्जनं कुरुतां॥ श्रेयो न भवे ऽत्र भवेत्सः गुरुः स्वसमं नमज्जनं कुरुते॥ २ ॥

अर्थः- हे मुमुक्षु जीवा, त्या सद्गुरूनें उपदेशिलेलें जें आनंदस्वरूप-

परब्रह्म त्याचें ठिकाणींच निमग्न हो. ह्मणनें निःसार अशा संसारांत बुडूं नकोस. कारण या संसारांत खरें कल्याण होणार नाहीं. आणि गुरु तर नम्र जनांस आपल्या सारखें करतो. २

नंदनेतो पुत्राधिकं यः शिष्यान् पात्यागतान् हि वंदेनतः॥ मंदनंतो भव तं प्रति तप्तस्य हितः परो नचंदनेतः ३

अर्थ- जो श्रीगुरु नमस्कार पूर्वक आलेल्या शिष्यांस पुत्रापेक्षां अधिक मानून संरक्षण करितो. हे मंदा, अज्ञानि जीवा, त्या सद्गुरूस नम्र हो. ह्मणजे तुझा ताप नष्ट होईल. खरेंच आहे. उष्णानें तप्त झालेल्यास चंदनापेक्षां अधिक हितकारक कोणी नाहीं. ३

दलति मलं गगनसरिद्गलौस्तापं दीनतां च कमनोऽगः॥ पापं तापं दैन्यं हरति गुरुः सैष भक्तकमनोगः ४

अर्थ- गंगा ही पापाचा नाश करिते. चंद्र ताप आणि कल्पवृक्ष दैन्य नाहींसें करतो. आणि भक्तांच्या हृदयांत वास्तव्य करणारा तो हा श्रीगुरु पाप, ताप आणि दैन्य या तिन्हींचा नाश करितो. ॥४॥

चतुरार्याद्याक्षरघटनो धत्तां वो मनस्य केहस्तम्॥ चतुरार्याद्याक्षरघटनो धत्तां वामनस्य के हस्तं ५

अर्थ- हे चतुरश्रेष्ठा, हे पंडिता, आतां जो दुःखेच्छु अज्ञ असेल तो त्या सद्गुरूस मनांत न चिंतन करो. परंतु सुखेच्छु सुज्ञ असेल त्याणें अवश्य सद्गुरूचें चिंतन करावें. असो. 'या प्रमाणें सद्गुरूचें महत्व वर्णून कवि याच अर्थांत श्लेषानें सद्गुरूच्या नामा विषयीं दिग्दर्शन करून त्यांच्या अनुग्रहा विषयीं प्रार्थना करीत आहे.' त्या वरील चार आर्यांचीं जीं पहिलीं अक्षरें त्यांच्या संयोगानें ज्याची नामरचना होते तो 'योगानंद' नामक सद्गुरु वामनाच्या मस्तकावर पद्महस्त ठेवो!! ॥५॥ ॥इतिश्री वामन विरचिता योगानंदार्याः समाप्ताः॥ ७॥

समाप्त.